## ॥ अथ ग्रंथकर्त्यांची प्रार्थना आणि विषयानुक्रमणिका लिख्यते ॥

## ॥ प्रार्थना ॥

आमचें जन्मस्थान पुण्यस्तंभ ( पुणतांबें ) ह्मणून गोदातीरावरील गांव होय. ॥ **विवाहमर्थमन्नंच जन्ममरणयोस्तथा ॥ कंठबध्वादृढंसूत्रं यत्रस्थंतत्रगच्छते ॥** या सूक्तोक्तीनरूप या नेमाड प्रांतीं खांडवा येथें अन्नोदकऋणानुबंधानें सुमोरें १५ वर्षे झालीं आमचें येणें होऊन ईश्वरकृपेनें या जिल्ह्याचें सरकारी वगैरे छपाईकाम आमचेच कडे छापण्याचें ठरून सर्वत्रांच्या प्रेमानें इतरही स्थाइकपणाच्याच सर्व व्यवस्था लागत गेल्या.

खांडवा येथें **सुबोधसिंधु** नांवाचा छापखाना स्थापन झाल्यावर शास्त्रोक्तकर्माचे इच्छित आणि सद्धर्मीरत्त अशा कित्येक मंडळीचें आमचेमागें नेहमीं म्हणणें "छापखान्याचे सोयीमुळें अनेक शाखांची ब्रह्मकर्मे आजवर दोनदोन तीनतीन आवृत्त्यांनीं निघालीं असून आपल्या कण्वशाखी लोकांकरितां नित्यान्हिका सारखा उपयुक्त असा एकही ग्रंथ निघाला नाहीं, तो आपण काढावा". असें असून, तत्संबंधीं कित्येक अडचणीही मंडळी आम्हांस सप्रमाण दाखवीत राहिली; परंतु उपजीविकेमुळें आम्ही छापखान्याशिवाय एका तालुक्यावर पराधीन ( कमाविसदार ) अस

त्यानें या कामीं पाहिजे तसा वेळ न मिळाल्यामुळें हें काम दिरंगाईनें हातीं धरलें आहे.

॥ सर्ववर्णाश्रमाणांस्यात् स्वधर्मः साधनंपरम् ॥
॥ अर्थेकामेच मोक्षेच तेषामपिचसाधने ॥ आ.पु.

॥ आचारः परमोधर्मो आचारः परमं तपः ॥
॥ आचारः परमंज्ञानमाचारात्किंनसाध्यते ॥

॥ यस्त्वाचारविहीनोपिविद्वान्वेदपरायणः ॥
॥ सर्वधर्मबहिष्कार्योयथाशूद्रस्तथैवसः ॥ स्मृ.सं.

॥ उच्छास्त्रंशास्त्रितंचेति पौरुषंद्विविधंस्मृतं ॥
॥ तत्रोच्छास्त्रमनर्थायपरमार्थायशास्त्रितम् ॥ यो.वा.

॥ श्रुतिस्मृति ममैवाज्ञा यस्तामुल्लिंघ्यवर्तते ॥
॥ आज्ञाच्छेदी ममद्वेषी मद्भक्तोपिविनश्यति ॥ स्मृ.सं.

॥ यःशास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ॥
॥ नससिद्धिमवाप्नोति नसुखं नपरांगतिम् ॥ भ.गी.

॥२॥

आपापल्या धर्माप्रमाणें वागणें हेंच साधन सर्व वर्णाश्रमांत श्रेष्ठ असून त्यापासूनच अर्थ, काम आणि मोक्ष यांची प्राप्ति होते.

आचार हाच मुख्य श्रेष्ठ धर्म, तप आणि ज्ञान असून आचारापासूनच सर्व कांहीं प्राप्त होतें. मनुष्य वेदपरायण असूनही जर तो आचारहीन आहे तर तो सर्वकर्मबहिष्कृत व शुद्रतुल्य जाणावा.

शास्त्र सोडून वागण्यांत संसारामध्यें यालोकीं दुःख व परलोकीं नरकास कारण आहे. आणि यथाशक्ति शास्त्राप्रमाणें वागण्यांत यालोकीं व परलोकीं सौख्यास कारण आहे.

श्रुति ह्मणजे वेद आणि स्मृति ह्मणजे मन्वादिकांच्या उक्ती या परमेश्वराच्या आज्ञा होत. यांचा त्याग करून जो वागतो तो परमेश्वराचा भक्त असतांही नाश पावतो. यासाठीं श्रुतिस्मृतिरूप ज्या परमेश्वराच्या आज्ञा आहेत त्याप्रमाणें वागलें ह्मणजें इह आणि परलोकीं कल्याण होईल.

सारांश सौख्याचें वास्तविक साधन जो धर्म आहे त्याप्रमाणें आपले हातून काय घडतें हें समजून येऊन जर घडत नसेल तर सौख्याचा लय व्हावयाचा हें साहजिक असल्यानें तसें न होण्यास्तव आणि होईल तें क्रियाशुद्ध घडण्यासाठीं वेदप्रणित धर्मास उक्त असा आचार जो कलियुगाकरितां सांगितला आहे तो, स्कंदपुराण, पद्मपुराण, श्रीमद्भागवत, रामायण, महाभारत, बृह-

॥२॥

त्यारावारी, आचारमयूख, निर्णयसिंधु, धर्मसिंधु, मिताक्षरा, प्रयोगचिंतामणि, प्रयोगपारिजातक, पाराशरस्मृति, मनुस्मृति, धर्मप्रवृत्ति, आचारार्क, स्मृत्यर्थसार, वाग्भट, निघंटरत्नाकर, श्राद्धचंद्रिका, कूर्मपुराण, स्मृतिसंग्रह आणि कण्वान्हिक संबंधीं कात्यायनसूत्रादि इतर ग्रंथ इ० ग्रंथांतून मत्स्य महाविष्णूनें, तसेंच वसिष्ठ, पाराशर, याज्ञवल्क्य, गौतम, व्यासादि महर्षि आणि मन्वादि महात्म्यांनीं जो धर्म कथन केला आहे त्याची निवड करून, सर्वांस समजण्यास सार्थ असा संग्रह केला आहे. आणि त्या त्या ठिकाणीं त्या पुराणाचें किंवा ऋषीचें नांव दिलें आहे.

शरीर रक्षणाविषयीं वैद्यशास्त्राचा आणि धर्मशास्त्राचा हेतु अगदीं सारखा असल्यानें सामान्य नियम आणि नित्याचाराचे ठिकाणीं अवश्य असा वाग्भटव निघंटरत्नाकर यांतून संग्रह केला आहे.

या ग्रंथांत उपयुक्त अशा अनेक विषयांचा संग्रह करून व्यवस्था केली आहे ती अशीः—

## सद्धर्ममंजरी

यामध्यें सौख्याचें खरें साधन जो धर्म त्यासंबंधानें श्रुतिस्मृत्योक्त ग्रंथांचें प्रमाण देऊन कलींत साध्य चतुर्विधपुरुषार्थप्रद ( धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांची प्राप्ति देणारे ) अशा अत्युत्तम विषयांचा अत्यंत यत्नपुरस्सर चतुःशाखेंतील सद्धर्मी ( खरे धर्मेच्छु ) अशा सर्व गृह-

स्थाश्रमी आबालवृद्ध स्त्री पुरुषांच्या उपयोगासाठीं निवडक आणि प्रत्येक विषय मूळ घेऊन स्प-
ष्ट समजण्या करितां मराठी सरळ भाषांतरासह संग्रह केला आहे.

## ॥ कण्वान्हिक ॥

यामध्यें कण्वशाखेकरितां स्नानसंध्यादि प्रयोगांचा संग्रह केला आहे. कारण 'सद्धर्ममंजरीं-
त सर्व विषयांचा चतुःशाखेंतील सर्वांस सारखा उपयोग असल्यानें त्यांत कण्वशाखी यांनाही
उपयोग आहे; परंतु सूत्रभिन्नत्वानें सर्व शाखेस उपयोग नसून कण्वशाखेसच उपयोग आहे
असे जे विषय त्यांचें एक परिशिष्ट (पुरवणी) करून सद्धर्ममंजरीस जोडलें आहे. यास्तव ग्रं-
थाचें नांव 'सद्धर्ममंजरी आणि कण्वान्हिक' असें ठेविलें आहे.

वास्तविक पाहतां या ग्रंथाचें काम हातीं घेण्याचा माझा बिलकुल अधिकार नाहीं; परंतु हा ध-
र्मसंबंध ईश्वरविषयक असल्यानें त्याच्या प्रेरितबुद्धीनें सदरीं लिहिलेल्या ग्रंथांतून धर्मसंबंधीं उक्त
वचनांचा आणि तदनुरूप विषयांचा संग्रह करून **भक्त्यातुष्यति केवलैर्नतुगुणैर्भक्तिप्रियः
श्रीपतिः** गुणास न पाहतां भक्ति ज्यास प्रिय असून भक्तीनेंच संतुष्ट होतो असा जो धर्मपालक प्रभु
त्यास अनन्यभावानें अर्पण केला आहे. हा संग्रह करण्यांत तसेंच मुंबई व पुणें येथें छापखान्याच्या संबं-

धानें जशा सोयी आहेत तशा येथें अगदीं नसल्यानें, तसेंच हस्तदोषानें ज्या चुका आणि कमीपणा असेल त्याबद्दल ज्ञानेजन "हंसक्षीर" न्यायानें स्वीकार करून क्षमा करतील आणि त्यांतील दोषादोष कळवितील ह्मणजे पुनरावृत्तीचे वेळीं दुरुस्त करण्यांत येतील.

**आभार-** या ग्रंथाचे कामीं वे. शा. सं. रा. रा. पिलंभटवाल्या डिंगरे नासिककर, वे. शा. रा. रा. सखारामशास्त्री दिक्षीत नासिक संस्कृतशाळेचे अध्यापक, वे. रा. रा. भिकंभट अण्णा मंजूळ पंढरपूरकर, वे. शा. रा. रा. मनोहर गणेश देव रावेरकर यांनीं अगत्यपुरःसर हरतऱ्हेनें साह्यता ठेविली. त्याचप्रमाणें ग्रंथाची साह्यता श्रीमंत रावसाहेब बळवंतराव गोविंदराव भुसकुटे साहेब, रा. रा. रामचंद्र बापूजी माळगुजार ऐमागिर्दे बऱ्हाणपूरकर आणि रा. रा. नारायणराव झोळबा मराठी हेडमास्तर खांडवा या सद्गृहस्थांनीं ठेविली या बद्दल या सर्वांचे आम्ही फारचफार आभारी आहोंत.

खांडवा- मिती मार्गशीर्ष शुा ५ शके १८१६<br>संमत १९५१ तारीख २ माहे डिसेंबर सन १८९४

अत्यंतनम्र<br>मल्हार अनंत प्रयागी

## ॥ सद्धर्ममंजरींतील विषयांची अनुक्रमणिका ॥

या अनुक्रमणिकेंत "नित्याचार, कलौपयुक्त चतुर्विधपुरुषार्थप्रद स्तोत्रें" आणि "स्त्रियाचार" या मोठाल्या प्रकरणांतील त्या त्या प्रकरणांत विषयांची खुलासेवार अनुक्रमणिका दिली असल्यानें या ठिकाणीं त्या प्रकरणांचा संक्षिप्त खुलासा देऊन, लहान प्रकरणांतील विषयांची खुलासेवार अनुक्रमणिका दिली आहे.



॥४॥

३०१ एकुणविषय एकुणपृष्ठें ३०५

ग्रंथाचे मानानें पानें ३०५ व पुस्तकाचे मानानें पानें ६१०

॥ श्रीगणेशायनमः ॥ अथसद्धर्मवर्तनप्रारंभः॥ ( शारिरिक आणिसामान्यनियम )

॥ईशप्रार्थना ॥॥ प्रणम्यशिरसाविष्णुं त्रैलोक्याधिपतिंप्रभुम् ॥

॥ नानाशास्त्रोद्धृतं वक्ष्ये धर्मनीतिसमुच्चयम् ॥१॥

त्रैलोक्यपालक समर्थ विष्णु जो त्यातें नमस्कार करून अनेक शास्त्रांपासून काढिलेला धर्म नीति संग्रह सांगतों.

॥ सुखार्थाः सर्वभूतानां मताः सर्वाः प्रवृत्तयः ॥

॥ सुखंच न विना धर्मात्तस्माद्धर्मपरोभवेत् ॥

सर्व प्राण्यांचे एकंदर उद्योग सुख करितां चालले आहेत, व सुख हें तर धर्मावांचून मिळत नाहीं, ह्मणून निरंतर धर्मपर असावें.

आतां सर्वसामान्य असें धर्मपर वर्तन कोणतें ( जेणें करून सौख्य प्राप्त होईल ) याविषयीं ज्ञात्यांनीं थोडक्यांत सार सांगितलें आहे तें असें:-

॥ हिंसास्तेयान्यथाकामंपैशून्यंपरुषानृते॥

॥ संभिन्नालापव्यापादमभिध्यादृग्विपर्ययम्॥
॥ पापंकर्मेतिदशधाकायवाङ्मानसैस्त्यजेत्॥

हिंसा, चोरी, व्यभिचार, चाहाडी, असत्य, अप्रिय व असंबद्ध भाषण, दुसऱ्याचा नाश करण्याची बुद्धि, मात्सर्य व खोटा समज हीं दहा प्रकारचीं पापकर्में कायावाचा मनें करून सोडून द्यावीं.

॥ भक्त्या कल्याणमित्राणि सेवेतेतरदूरगः॥
॥ अवृत्तिव्याधिशोकार्तानुवर्तेत शक्तितः॥

सज्जन मित्राशीं मोठ्या प्रीतीनें स्नेह करावा, व दुर्जनापासून दूर राहवें. गरीब, व्याधित व दुःखी यांना यथाशक्ति साहाय्य करावें.

॥ आत्मवत्सततंपश्येदपिकीटपिपीलिकाम्॥
॥ अर्चयेद्देवगोविप्र वृद्ध वैद्य नृपातिथीन्॥

किडया मुंगीला देखील आपल्याप्रमाणेंच कृपादृष्टीनें पहावें. देव, गाय, ब्राम्हण, वृद्ध, वैद्य, राजा व अतिथी यांची यथायोग्य पूजा करावी.

॥ विमुखान्नार्थिनः कुर्यान्नावमन्येत नाक्षिपेत् ॥
॥ उपकारप्रधानः स्यादपकारपरेऽप्यरौ ॥

याचकांला कांहीं न देतां घालवूं नये, त्यांचा अवमान करूं नये, व त्यांना कठीण शब्दांनीं बोलूं नये. आपलें नुकसान करणाऱ्या शत्रूवरही प्रायः उपकारच करावा.

॥ संपद्विपत्स्वेकमना हेतावीर्ष्येत्फले न तु ॥
॥ काले हितं मितं ब्रूयादविसंवादि पेशलम् ॥

संपत्ती व विपत्तीमध्यें एकच चित्तवृत्ति ठेवावी. एखाद्याचा चांगला गुण घेण्याची ईर्षा करावी. परंतु तत्साध्य जें द्रव्यादिक (त्या गुणाच्या योगानें त्यानें जो धंदा किंवा उद्योग केला असेल तसाच आपण करून त्यास नुकसान पोंचेल असें) करूं नये. हितकारक थोडें गोड व सत्य भाषण व तेंहीं योग्य कालीं करावें.

॥ पूर्वाभिभाषी सुमुखः सुशीलः करुणामृदुः ॥
॥ नैकः सुखी न सर्वत्र विश्रब्धो न च शंकितः ॥

(कोणी आपलेघरीं आलें असतां) प्रसन्न मुद्रेनें सौजन्यानें व दयाळूपणानें कुशलादिक प्रश्न

सद्धर्म
॥२॥

आपणच सुरू करावेन. जो कोणावरच कधीं विश्वास ठेवीत नाहीं किंवा सर्वांवरच विश्वास ठेवि तो किंवा एकटाच राहतो तो कधींही सुख पावत नाहीं.

॥ नकंचिदात्मनः शत्रुं नात्मानं कस्यचिद्रिपुम् ॥
॥ प्रकाशयेन्नापमानं नच निःस्नेहतां प्रभोः ॥

आपण कोणाचा शत्रु आहों किंवा आपला एखादा शत्रु आहे असें कोणाजवळही प्रगट करूं नये. आपला अपमान झाला असतां किंवा आपल्यावर वरिष्ठाची गैरमर्जी झाली असतां तेंही प्रगट करूं नये.

॥ जनस्याशयमालक्ष्य यो यथा परितुष्यति ॥
॥ तं तथैवानुवर्तेत पराराधनपंडितः ॥

दुसऱ्याचें मन संतुष्ट ठेवण्याविषयीं दक्ष असून दुसऱ्याचा आशय लक्षांत आणून त्याला जसें आवडेल तसें त्याच्याशीं वर्तन ठेवावें.

॥ नपीडयेदिंद्रियाणि नचैतान्यतिलालयेत् ॥
॥ त्रिवर्गशून्यं नारंभं भजेत्तं चाविरोधयन् ॥

वर्तन
॥३॥

इंद्रियांच्या अत्यंत स्वाधीनही होऊं नये व त्यांना अतिक्लेशही देऊं नये. ज्यांत धर्मार्थ कामांपै-कीं कोणताच इतराविरोधी पुरुषार्थ नाहीं असा उद्योग करूं नये.

॥ अनुयायात्प्रतिपदं सर्वधर्मेषु मध्यमाम् ॥
॥ नीचरोमनखस्मश्रु निर्मलांघ्रिमलायनः ॥

सर्व प्रकारच्या धर्माचरणांत मध्यम मार्गानें वर्तन करावें. ( धर्मसंबंधीं गोष्टीं पैकीं कोणत्याच गोष्टींत अत्यासक्ति किंवा अनासक्ति दाखवूं नये.) नखें केंश व दाढी मिशा फार वाढूं देऊं नयेत.

॥ स्नानशीलः सुसुरभिः सुवेषोऽनुल्वणोज्ज्वलः ॥
॥ धारयेत्सततं रत्नसिद्धमंत्र महौषधीः ॥

पाय व कान नाक इत्यादि मलद्वारें स्वच्छ ठेवावींत. दररोज स्नान करावें; चंदनादि सुगंधाचें धारण करावें. स्वच्छ चांगला व नम्रवेष धारण करावा व रत्नें महौषधी व सिद्धमंत्र यांनाही सर्वदां धारण करावें.

॥ सातपत्रपदत्राणो विचरेद्युगमात्रदृक् ॥

॥ निशि चात्ययिके कार्ये दंडी मौली सहायवान् ॥

चालतांना चार हात पुढें नजर असावी. पायांत जोडा असावा. छत्री धरावी. रात्रीं किंवा कठिण प्रसंगीं बाहेर जाणें असल्यास हातांत काठी डोकीस अच्छादन व बरोबर एखादा सोबती घेतल्या वांचून जाऊं नये.

॥ नदीं तरेच्च बाहुभ्यां नाग्निस्कंधमभिव्रजेत् ॥
॥ संदिग्धनावं वृक्षं च नारोहे द्दुष्टयानवत् ॥

नदी पोहून पार जाऊं नये. अग्नीच्या ज्वालेजवळ जाऊं नये. जी नाव बुडेल अशी शंका आहे ती मध्यें बसूं नये. झाडावर चढूं नये. व खोडकर जनावरावर बसूं नये.

॥ नासंवृत मुखः कुर्यात्क्षुति हास्य विजृंभणम् ॥
॥ नासिकां न विकुष्णीयान्नाकस्माद्विलिखे द्भुवम् ॥

तोंड झांकल्या वांचून हसूं नये व शिंक किंवा जांभई देऊं नये. नाक कोरीत बसूं नये व जमिनीवर उगीच रेघा काढूं नये

॥ नांगैश्चेष्टेत विगुणं नासीतोत्कटकस्थितः ॥

॥ देहवाक्चेतसां चेष्टाः प्राक्श्रमाद्विनिवर्तयेत् ॥

अंगें वेडींवांकडीं करूं नयेत व फार वेळ उकीडवें बसूं नये. कायिक वाचिक व मानसिक क्रिया श्रम होण्या पूर्वीच बंद कराव्यात.

॥ नोर्ध्वजानुश्चिरं तिष्टेन्नक्तं सेवेत नद्रुमम् ॥

॥ तथा चत्वरचैत्यांतश्चतुष्पथ सुरालयान् ॥

फारवेळ गुडघे उभे करून बसूं नये व रात्रीं झाडाखालीं राहूं नये. तसेंच अंगणांत पिंपळाजवळ चव्हाट्यावर व देवळांत रात्रीं निजूं नये व बसूं नये.

॥ सूनाटवीशून्यगृहस्मशानानि दिवापि न ॥

॥ सर्वथेक्षेत नादित्यं नभारं शिरसा वहेत् ॥

वधस्थान अरण्य ओसाडगृह व स्मशान इतक्या ठिकाणीं दिवसांदेखील जाऊं नये. सूर्याकडे कधींही पाहूं नये. डोक्यानें ओझें वाहूं नये.

॥ नेक्षेत प्रततं सूक्ष्मदीप्ता मेध्याप्रियाणि च ॥

॥ मद्यविक्रयसंधान दानादानानि नाचरेत् ॥

बारीक, अतिशय दैदिप्यमान, अपवित्र व अप्रिय पदार्थाकडे एकसारखें पाहूं नये. मद्य विकणें, तयार करणें, देणें व घेणें ह्या क्रिया करूं नयेत.

॥ पुरोवातातपरजस्तुषारपरुषानिलान् ॥
॥ अनृजुःक्षवथूद्गारकासस्वप्नान्नमैथुनम् ॥

पूर्वेकडचा वारा, सकाळचें ऊन धूळ पाऊस व तीव्रवायु यांचें सेवन करूं नये. शरीर अस्ताव्यस्त असतांना शिंक, ढेंकर देणें, खोकणें झोंप घेणें खाणें मैथुन करणें ह्या क्रिया करूंनयेत.

॥ कूलच्छायानृपद्विष्टव्यालदंष्ट्रिविषाणिनः ॥
॥ हीनानार्यातिनिपुणसेवांविग्रहमुत्तमैः ॥

नदीच्या डगरी जवळ बसूं नये. राजशत्रु, हत्ति, सर्प व शृंगयुक्त पशु इत्यादिकांचे जवळ जाऊं नये. नीच व अति शहाणे अशा लोकांची सेवा व बलिष्टांशीं कज्जा करूं नये.

॥ संध्यास्वभ्यवहारस्त्रीस्वप्नाध्ययनचिंतनम् ॥
॥ शत्रुसत्रगणाकीर्णगणिकापणिकाशनं ॥

संध्याकाळीं जेवण, स्त्रीसेवन, निद्रा, अध्ययन व चिंतन हीं वर्ज करावीं. शत्रु, यज्ञसभा, वेश्या

व वाणी इतक्या ठिकाणचें अन्न व गणान्न यांचें सेवन करूं नये.

॥ आचार्यः सर्वचेष्टासु लोक एव हि धीमतः ॥
॥ अनुकुर्यात्तमेवातो लौकिकेऽर्थे परीक्षकः ॥

ज्या अर्थी सर्व क्रियांमध्यें लोकच उपदेशक आहेत त्या अर्थी शाहण्यानें लोक वागतात त्या प्रमाणें लौकिक गोष्टीं मध्यें विचारपूर्वक वागावें.

॥ आर्द्रसंतानता त्यागः कायवाक्चेतसां दमः ॥
॥ स्वार्थबुद्धिः परार्थेषु पर्याप्तमिति सद्व्रतम् ॥

सर्व भूतांवर दया दान कायिक वाचिक मानसिक क्रियांवर दाब लोकांच्या कामांमध्यें स्वतः प्रमाणें कळकळ इतक्या गोष्टी पाळणें हेंच श्रेष्ठ व्रत होय

॥ नदीतीरेच येवृक्षाः परगेहेषु कामिनी ॥
॥ मंत्रहीनाश्च राजानः शीघ्रं नश्यंत्यसंशयं ॥

नदीच्या कांठावरील वृक्ष, परगृहीं राहणारी तरुण स्त्री आणि विचार रहित राजेही लवकर नाश पावतात.

॥ अर्थनाशं मनस्तापं गृहिणीचरितानि च ॥
॥ नीचवाक्यं चातिगुह्यं मतिमान्न प्रकाशयेत् ॥

द्रव्याचा नाश मनांतील संताप आपल्या स्त्रीचें आचरण नीच जर दुर्भाषण बोलला तरतें आणि अति गुप्त गोष्ट शहाण्या लोकांनीं प्रसिद्धीस आणूं नये.

॥ विद्यार्थीसेवकः पांथः क्षुधार्तो भयकातरः ॥
॥ भांडाधीशः प्रतीहारी सप्त सुप्तान्प्रबोधयेत् ॥

विद्यार्थी चाकर मार्गस्थ क्षुधार्त भयभीत धनाधिकांचा रक्षक आणि द्वारपाल हे सात निद्रा केले असतां जागृत करावें.

॥ अहिं नृपं च शार्दूलं किटिं च बालकं तथा ॥
॥ परश्वानं च मूर्खं च सप्त सुप्तान्न बोधयेत् ॥

सर्प राजा व्याघ्र किटि नामाचा जीव विशेष बालक दुसऱ्याचें श्वान आणि मूर्ख यांना झोंपेंतून कधींही जागें करूं नये.

॥ स्वहस्त ग्रथिता माला स्वयं घृष्टं च चंदनम् ॥

॥ स्वहस्तलिखितं स्तोत्रं शक्रस्यापिश्रियंहरेत् ॥

आपल्या हातानें गुंफलेली माळ धारणकेली असतां, आपल्या हातानें उगाळलेलें गंध लावलें असतां आणि आपण स्वतः लिहिलेल्या पुस्तकाचा पाठ केला असतां इंद्राचीही संपत्ति जाते सबब असें करूं नये.

॥ दृष्टिपूतंन्यसेत्पादं वस्त्रपूतं पिबेज्जलम् ॥

॥ शास्त्रपूतं वदेद्वाक्यं मनःपूतं समाचरेत् ॥

दृष्टीनें पवित्र स्थळ पाहून तेथें चरण ठेवावा, वस्त्रानें गाळलेलें उदक प्राशन करावें, शास्त्रानें जें शुद्ध सांगितलें तेंच भाषण करावें व मनानें पवित्रापवित्राचा विचार करून जें पवित्र असेल तेंच आचरण करावें.

॥ आप्तद्वेषाद्भवेन्मृत्युः परद्वेषाद्धनक्षयः ॥

॥ राजद्वेषात्सर्वनाशो ब्रम्हद्वेषात्कुलक्षयः ॥

स्वकीय जनांचा द्वेष केला असतां तेणें करून मृत्यु प्राप्त होतो. अन्य लोकांचा द्वेष केला असतां धनाचा नाश होतो. राजाचा द्वेष केला असतां सर्वस्वाचा नाश होतो. आणि ब्राम्हणाच्या

द्वेषें करून कुळाचा क्षय होतो. सबब अशा गोष्टी करूं नयेत.

॥ गतेशोकोनकर्तव्योभविष्यं नैवचिंतयेत् ॥
॥वर्तमानेनकालेन प्रवर्त्तंतेविचक्षणाः॥

गेलेल्या वस्तूचा शोक करूं नये. पुढें प्राप्त होणाऱ्या वस्तूचें चिंतन करूं नये. ज्ञाते पुरुष ज्या काळीं जें प्राप्त होतें त्यांतच संतुष्ट राहतात.

॥ बहूनां चैव ऐक्यानां समवायोरिपुंजयः ॥
॥वर्षधाराधरोमेघ स्तृणैरपिनिवार्यते ॥

बहुत जनांचें ऐक्य झालें असतां कसाही शत्रु असला तरी तो जिंकला जातो. येवढा मोठा बलिष्ट मेघ ( पर्जन्य ) अगरीं लघु तृणाच्या ऐक्यानें (छप्पर) पर्जन्याचें निवारण होतें. ( सारांश ऐक्या सारखें दुसरें कोणतेंही मोठें आणि दृढ बळच नाहीं; या साठीं सर्व काळीं सर्व ठिकाणीं यत्नें करून ऐक्य राखण्याचें अवश्य करावें. )

॥ सुसिद्धमोषधंधर्मं गृहच्छिद्रंचमैथुनम् ॥
॥ कुभुक्तं कुश्रुतंचैवमतिमान्नप्रकाशयेत् ॥

आपणासमिद्ध झालेलें औषध, धर्म, आपल्या घरांतील कोणताही कमीपणा, मैथुन, आपण आपल्या घरांत करान्न खात असलों तरी तें आणि जें केवळ निंद्य श्रवण केलें असेल तें बुद्धिमंतानें जनांत प्रसिद्ध करूं नये.

॥ धर्मो धनंच धान्यंच गुरोर्वचन मौषधम् ॥
॥ सुगृहीतंच कर्त्तव्य मन्यथायो नजीवति ॥

धर्म, धन, धान्य, गुरुवचन आणि औषध ह्या पांच वस्तूंचें ग्रहण करणें तें उत्तम प्रकारें जसें होईल तसें करावें. जो अन्यथा म्हणजे उत्तम प्रकारें ग्रहण करणार नाहीं तो जय पावणार नाहीं.

॥ कुचैलिनं दंत मलोप धारिणं बह्वाशिनं निष्ठुर भाषिणंच ॥
॥ सूर्योदये चास्तमिते शयानं विमुंचति श्रीरपि चक्रपाणिम् ॥

मलिन वस्त्र धारण करणारा, दंतावर मल धारण करणारा, फार भोजन करणारा, निष्ठुर भाषण करणारा आणि सूर्योदयीं व अस्तमान समयीं जो निद्रा करतो तो जरी चक्रपाणी म्हणजे महाविष्णु असला तथापि त्याला ही लक्ष्मी सोडिते. सबब अशा गोष्टी करूं नयेत.

॥ आतुरे व्यसने प्राप्ते दारिद्रे शत्रुसंकटे ॥

॥ राजद्वारेश्चयस्तिष्टन्समित्रः सबांधवः॥

रोगकाळीं, दुःखसमयीं, दारिद्र्य समयीं, शत्रुपासून होणाऱ्या संकटांत आणि राजापासून होणाऱ्या कामांत जो आपणास न सोडतां राहतो ( साह्य देतो ) तोच उत्तम शीलाचा खरा मित्र आणि बांधव होय.

॥ मित्रद्रोही कृतघ्नश्च तथाविश्वास घातकः॥
॥ त्रयस्ते नरकं यांति यावच्चंद्र दिवाकरौ ॥

मित्राचा घात करणारा, उपकार नजाणणारा, आणि विश्वासघात करणारा हे तिघे चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत नरकीं राहतात; यासाठीं असें कधींही करूं नये.

॥ परनिंदाचापवादो तथाच परपीडनं ॥
॥ परदुःख नजानाति महसापं भयावहं॥

दुसऱ्याची निंदा करणें, दुसऱ्यावर खोटा आरोप ठेवणें, त्याचप्रमाणें दुसऱ्यांस त्रास देणें आणि दुसऱ्याचें दुःख नजाणणें हीं कृत्यें पातक आणि भयरूप आहेत तर तसें करूं नये.

॥ पापात्पापमहत्पापं शरणागतदुःखितं ॥
॥ सनरो नरकं याति यावच्चंद्रदिवाकरौ ॥

शरण आलेल्याचें रक्षण न करितां त्याला तसेंच दुःखित ठेवणें, याच्या सारखें दुसरें पाप नसून तो चंद्रसूर्य असे पर्यंत नरकांतच राहतो.

॥ पुण्यात्पुण्य महत्पुण्यं शरणागतरक्षणं ॥
॥ इहलोके सुखं प्राप्तिर्विष्णुलोके महीयते ॥

शरण आलेल्याचें रक्षण करण्या सारखें दुसरें पुण्य नाहीं; त्याला इहलोकीं सुख मिळून अंतीं विष्णुपदाची प्राप्ती होते.

॥ कः कालः कानि मित्राणि को देशः कौ व्ययागमौ ॥
॥ कस्याहं का च मे शक्तिरिति चिंत्यं मुहुर्मुहुः ॥

काल कोणता आहे, मित्र कोण, देश कोणता आहे, व्यय म्हणजे खर्च किती आणि आपली प्राप्ति किती, मी कोणाचा, माझी शक्ति किती या गोष्टींचा विचार वारंवार केला पाहिजे.

॥ रंकं करोति राजानं राजानं रंकमेव च ॥

॥ धनिनंनिर्धनंचैवनिर्धनंधनिनंतथा ॥
॥ नाहारंचिंतयेत्प्राज्ञोधर्ममेकंहिचिंतयेत् ॥
॥ आहारोहि मनुष्याणांजन्मनासहजायते ॥

ईश्वर जर कृपा करील तर दरिद्र्यास राज्य देईल आणि तो जर कोपेल तर राजास दरिद्री करील. तसाच क्षणांत धनवंतास निर्धन करील आणि निर्धनास धनादय करील अशी ईश्वराची सत्ता आहे. यासाठीं आपलें कसें चालेल (निर्वाह कसा होईल) ही चिंता करूं नये. कारण मनुष्याचा चरितार्थ त्याच्या जन्मासह वर्तमानच उत्पन्न होतो; परंतु ईश्वरास संतुष्ट करणारा जोधर्म त्याप्रमाणें वर्तन घडण्याविषयीं चिंता बाळगून धर्मपर वर्तन करावें. म्हणजे त्या योगानें ईश्वर संतुष्ट होऊन त्यापासूनच मुख्य ईहपरत्रीं सौख्यता आहे.

॥ इत्याचारः समासेन यं प्राप्नोति समाचरन् ॥
॥ आयुरारोग्यमैश्वर्यं यशोलोकांश्चशाश्वतान् ॥

ह्या प्रमाणें जो आपली वर्तणूक ठवितो तो दीर्घायुष्य आरोग्य ऐश्वर्य यश व मोक्ष यांप्रत पावतो. ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

॥ श्रीगणेशायनमः॥ अथगृहस्थाश्रमीयांचे विचारोक्तविषयप्रारंभः॥

॥ पंडितलक्षण ॥

॥आत्मज्ञानं समारंभस्तितिक्षा धर्मनित्यता ॥

॥ यमर्थान्नापकर्षंतिसवै पंडितउच्यते ॥१॥

आत्मज्ञान, चांगल्या गोष्टीचा आरंभ, सहनशीलता, सतत धर्मनिष्ठा, यांच्या योगानें जो आपल्या पुरुषार्थाचा नाश होऊं देत नाहीं तो पंडित होय.

॥ निषेवतेप्रशस्तानि निंदितानिनसेवते ॥

॥ अनास्तिकःश्रद्दधान एतत्पंडितलक्षणं ॥२॥

स्तुत्य कर्म करणें, निंद्यकर्म न करणें, आस्तिकता, धर्मावर श्रद्धा, हीं पंडितांचीं लक्षणें होत

॥ क्रोधोहर्षश्चदर्पश्च ह्रीस्तंभोमान्यमानिता ॥

॥ यमर्थान्नापकर्षंति सवै पंडितउच्यते ॥३॥

राग, हर्ष, परापमान, निर्लज्जपणा, आपणास मोठें मानणें, यांच्या योगानें जो आपला नाश करून घेत नाहीं तो पंडित होय.

॥ यस्यकृत्यं नजानंति मंत्रंमंत्रितंपरे ॥
॥ कृतमेवास्य जानंति सर्वे पंडितउच्यते ॥४॥

ज्यांचें योजिलेलें काम व मसलत हीं लोकांस अगोदर कळत नाहींत, केल्यावर समजतात तो पंडित होय.

॥ यस्यकृत्यंनविघ्नंति शीतमुष्णं भयंरतिः ॥
॥ समृद्धिरसमृद्धिर्वा सर्वे पंडितउच्यते ॥५॥

शीत, उष्ण, भय, उपभोगेच्छा, वैभव, दारिद्र्य हीं ज्याच्या कामांत अडथळा करीत नाहींत तो पंडित होय.

॥ अर्थमहांतमासाद्य विद्यामैश्वर्यमेववा ॥
॥ विचरत्यसमुन्नद्धो यः सपंडितउच्यते ॥६॥

मोठी संपत्ति, मोठी विद्या, मोठी सत्ता प्राप्त झाली असतांही जो उद्धटपणानें वागत नाहीं तो पंडित होय.

## ॥ बुद्धिमत्ता ॥

॥ एकं हन्यान्नवा हन्यादिषुर्मुक्तो धनुष्मता ॥
॥ बुद्धिर्बुद्धि मतोत्सृष्टा हन्याद्राष्ट्रं सराजकं ॥१॥

धनुष्य धारण करणाऱ्यानें बाण सोडिला तर तो एकास मारील किंवा न मारील; परंतु बुद्धिमान जो आहे तो आपल्या बुद्धीनें राजासहवर्तमान सर्व राष्ट्राचा नाश करील.

॥ यः काममन्यू प्रजहाति राजा पात्रे प्रतिष्ठापयते धनंच ॥
॥ विशेषविच्छ्रुतवान्क्षिप्रकारी तंसर्वलोकः कुरुते प्रमाणं ॥२॥

जो कामक्रोध सोडितो, सत्पात्रीं दान करितो, तारतम्य जाणतो, बहुश्रुत, शीघ्रकाम करितो, त्याचें सर्व लोक ऐकतात.

॥ सुदुर्बलं नावजानाति किंचिद्युक्तोरिपुंसेवते बुद्धिपूर्वं ॥
॥ नविग्रहं रोचयते बलस्थैः कालेचयोविक्रमतेसधीरः ॥३॥

दुर्बळांचा अपमान करीत नाहीं, प्रसंग पडला असतां शत्रूंची सुद्धां सावधपणें सेवा करितो, बलवानाशीं कलह करीत नाहीं, योग्यवेळीं पराक्रम करितो, तो बुद्धिमान् समजावा.

॥ देशाचारान् समयान् जातिधर्मान् बुभूषते यः परावरज्ञः ॥

॥ सयत्रतत्राभिगतःसदैव महाजनस्याधिपत्यंकरोति ॥४॥

देशांतील आचार व रीतिभाती जाणतो, जातिधर्मजाणतो, तो सर्व समजणारा बुद्धिमान होय. तो जेथें जेथें जाईल, तेथें तेथें सर्व लोकांमध्यें त्याची प्रतिष्ठा होईल.

॥ दंभं मोहं मत्सरं पापकृत्यं राजद्विष्टं पैशुनं पूगवैरं ॥
॥ मत्तोन्मत्तैर्दुर्जनैश्चापि वादं यःप्रज्ञावान् वर्जयेत्सप्रधानः ॥५॥

दंभ, मोह, मत्सर, पापकर्म, राजद्वेष, समुदायाशीं वैर; गर्विष्ठ, उन्मत्त, दुर्जन, यांशीं वाद; या गोष्टी सोडून देईल तोच बुद्धिमान् सर्वांमध्यें श्रेष्ठ होय.

॥ यआत्मनापत्रपते भृशंनरः ससर्वलोकस्यगुरुर्भवत्युत ॥
॥ अनंततेजाः सुमनाःसमाहितःसतेजसासूर्यइवावभासते ॥६॥

लोकांस न समजतांही जो पाप करण्यास आपल्या मनांत फार लाजतो, तो सर्व लोकांमध्यें श्रेष्ठ होतो; तो मोठा तेजस्वी, महात्मा, योग्य, असा होऊन सूर्याप्रमाणें शोभतो.

॥ जितेन्द्रियपना ॥

॥ मितंभुंक्ते संविभज्याश्रितेभ्योमितंस्वपित्यमितंकर्मकृत्वा ॥

॥ ददात्यमित्रेष्वपियाचितःसंस्तमात्मवंतंभजहत्यनर्थाः॥१॥

पदरच्या मनुष्यास यथायोग्य देऊन जो नियमित उपभोग घेतो, पुष्कळ काम करून जो नियमित झोंप घेतो, शत्रूंनीही मागितल्यास देतो, असा जो जितेंद्रिय त्यास संकटें येत नाहींत.

॥ धर्मार्थैयिः परित्यज्य स्यादिंद्रियवशानुगः ॥

॥ श्री प्राण धन दारेभ्यःक्षिप्रंसपरिहीयते ॥२॥

जो धर्मार्थांस टाकून इंद्रियांच्या स्वाधीन होतो, तो लक्ष्मी, प्राण, धन, स्त्रिया यांस लवकरच मुकतो.

॥ अर्थानामीश्वरोयः स्यादिंद्रियाणामनीश्वरः ॥

॥ इंद्रियाणामनैश्वर्यादैश्वर्याद्भ्रश्यते हिसः ॥३॥

ज्यापाशीं संपत्ति पुष्कळ असून इंद्रियें स्वाधीन नाहींत त्याचें ऐश्वर्य नाहींसें होतें.

॥ आत्मनात्मानमन्विच्छेन्मनोबुद्धींद्रियैर्यतैः ॥

॥ आत्माह्येवात्मनोबंधुरात्मैवरिपुरात्मनः ॥४॥

मन, बुद्धि, इंद्रियें हीं स्वाधीन ठेवून आपला आपण उद्धार करावा; आपला बंधु आपण, आपला

शत्रुही आपणच.

॥ बंधुरात्मात्मनस्तस्य येनैवात्मात्मनाजितः ॥
॥ सएवनियतो बंधुः सएव नियतो रिपुः ॥ ५॥

जो जितेंद्रिय तो आपला आपण बंधु; व जो जितेंद्रिय नाहीं तो आपला आपण शत्रु.

## ॥ मित्रत्व ॥

॥ तन्मित्रयस्यकोपाद्बिभेति यद्वामित्रंशंकितेनोपचर्यं ॥
॥ यस्मिन्मित्रे पितरीवाश्वसीत तदेमित्रं संगतानीतराणि ॥१॥

ज्याच्या रागाचें आपणास भय वाटतें तो आपला मित्र नव्हे, ज्याशीं साशंक वागावें लागतें तोही मित्र नव्हे, तर बापाप्रमाणें ज्यावर विश्वास ठेवण्यास हरकत नाहीं तोच मित्र, बाकीचे सोबती समजावे.

॥ यःकश्चिदप्यसंबद्धोमित्रभावेनवर्तते ॥
॥ सएवबंधुस्तन्मित्रं सागतिस्तत्परायणं ॥ २॥

कोणत्याही प्रकारचा संबंध नसतां जो मित्रत्वानें आपणाशीं वागतो, तोच आपला बंधु व मित्र

समजावा, तोच आपणास उपयोगीं पडेल, तोच आपला मुख्य लाभ होय.

॥ चलचित्तस्य वै पुंसो वृद्धाननुपसेवतः ॥
॥ पारिप्लवमतेर्नित्यमध्रुवो मित्रसंग्रहः ॥ ३॥

ज्याचें मन चंचल, बुद्धि अस्थिर, जो वडिलांची सेवा करीत नाहीं, त्याचें मित्रत्व अनिश्चित होय.

## ॥ मूर्खलक्षण ॥

॥ अश्रुतश्च समुन्नद्धो दरिद्रश्च महामनाः ॥
॥ अर्थांश्चाकर्मणा प्रेप्सुर्मूढ इत्युच्यते बुधैः ॥ १॥

शिकलेला नसून डौली, दरिद्री असून श्रीमंतीचा डौल घालणारा, कांहीं न करितां अथवा दुष्कर्मैकरून धनलाभाची इच्छा करणारा असा जो त्यास शहाणे लोक मूर्ख म्हणतात.

॥ स्वमर्थं यः परित्यज्य परार्थमनुतिष्ठति ॥
॥ मिथ्या चरति मित्रार्थे यश्च मूढः स उच्यते ॥ २॥

जो आपलें काम सोडून दुसऱ्याच्या कामांत हात घालतो व मित्राशीं लबाडीनें वागतो, त्यास मूर्ख म्हणतात.

॥ अकामान्कामयति यः कामयानान्परित्यजेत् ॥
॥ बलवंतं च यो द्वेष्टि तमाहुर्मूढचेतसं ॥ ३॥

जे आपल्या कामाविषयीं उदासीन त्यांची प्रीति संपादण्यास इच्छितो, आणि जे आपणावर प्रीति करतात त्यांस टाकितो, बलवानाशीं द्वेष धरितो तो मूर्ख होय.

॥ अमित्रं कुरुते मित्रं मित्रं द्वेष्टि हिनस्ति च ॥
॥ कर्म चारभते दुष्टं तमाहुर्मूढचेतसं ॥ ४ ॥

शत्रूंस मित्र मानतो, मित्रांचा द्वेष व नाश करितो, दुष्ट कर्म आरंभितो त्यास मूर्ख म्हणावें.

॥ संसारयति कृत्यानि सर्वत्र विचिकित्सते ॥
॥ चिरं करोति क्षिप्रार्थे स मूढो भरतर्षभ ॥ ५॥

उगाच काम माजवितो, सर्व ठिकाणीं संशय घेतो, जें लवकर करावयाचें त्यास वेळ लावितो तो मूर्ख समजावा.

॥ हानिकारण ॥

॥ हरणं च परस्वानां परदाराभिमर्शनं ॥

॥ सुहृदश्च परित्यागस्त्रयो दोषाः क्षयावहाः ॥१॥

परधन हरण करणें, परस्त्रीचा अभिलाष धरणें, मित्राचा त्याग करणें, हे तीन दोष नाश करणारे आहेत.

॥ त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ॥
॥ कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥२॥

काम, क्रोध, लोभ हीं तीन नरकाचीं द्वारें आहेत. हीं आपला नाश करितात; या करितां त्यांचा त्याग करावा.

॥ षड् दोषाः पुरुषेणेह हातव्या भूतिमिच्छता ॥
॥ निद्रा तन्द्री भयं क्रोध आलस्यं दीर्घसूत्रता ॥३॥

निद्रा, आळस, भय, क्रोध, चेंगटपणा, सुस्ती हे सहा दोष ऐश्वर्य इच्छिणाऱ्या पुरुषानें यकू न द्यावें.

॥ षडिमानि विनश्यंति मुहूर्त्तमनवेक्षणात् ॥
॥ गावः सेवा कृषिर्भार्या विद्या वृषलसंगतिः ॥४॥

गाई, चाकरी, शेतकी, बायको, विद्या, नीचाची संगति हीं सहा थोडावेळ दुर्लक्ष केल्यानें वाईट होतात.

॥ वर्ज्य ॥

॥ असत्यागात्पापकृतामपापां स्तुल्यो दंडः स्पृशतेमिश्रभावात् ॥
॥ शुष्केणार्द्रं दह्यतेमिश्रभावात् तस्मात्पापैः सहसंधिं न कुर्यात् ॥ १ ॥

वाळलेल्या बरोबर ओलें जळतें त्याप्रमाणें वाईट व चांगला हे एखाद्या कचाटींत सांपडले ह्मणजे अपराधी कोण हें न कळून दोघांसही सारखा दंड होतो, या करितां दुष्टाची संगति करूं नये.

॥ दुर्बुद्धिमकृतप्रज्ञं छन्नं कूपं तृणैरिव ॥
॥ विवर्जयीत मेधावी तस्मिन् मैत्री प्रणश्यति ॥ २ ॥

तृणांनीं आच्छादित अशा कूपावर पाय ठेविला असतां जसा नाश होतो त्याप्रमाणें दुष्ट, अशिक्षित, अशांशीं स्नेह केला असतां मनुष्य नाश पावतो, या करितां त्यांचा त्याग करावा.

॥ संपत्तिलाभ ॥

॥ जानातिविश्वासयितुं मनुष्यान् विज्ञातदोषेषु दधातिदंडं ॥

॥जानातिमात्रांचतथाक्षमांच तंतादृशं श्रीर्जुषतेसमग्रा॥१॥

आपल्या ठिकाणीं लोक कोणत्या रीतीनें विश्वास ठेवितील हें ज्यास समजतें, दोष कळले असतां जो शासन करितो, कोणत्या अपराधास किती शिक्षा करावी, हें ज्यास कळतें, त्या मनुष्यास पूर्ण संपत्ति प्राप्त होते.

॥ यन्निमित्तः कृतोयत्नो व्यर्थतामेष्यतिध्रुवं॥

॥ नकुर्यात्तादृशंकर्म प्रपित्सुःसंपदंप्रति ॥ २॥

ज्याविषयीं केलेला यत्नही व्यर्थ होण्याचा संभव आहे, अशीं कामें आरंभूं नयेत.

॥ सद्यःकरोत्यादितोल्पंमहाफलदमग्रतः ॥

॥ आपतत्स्वपिविघ्नेषुविरामंयोनगच्छति ॥ ३॥

शहाणा असतो तो प्रारंभीं एखादें कृत्य लहान दिसलें तरी पुढें मोठी फलप्राप्ति व्हावयाची असली ह्मणजे एकदम करण्यास आरंभ करतो, मध्यें विघ्नें आलीं तरी थांबत नाहीं.

॥ जितेंद्रियमनादंडं कुरुतेयोऽपराधिषु ॥

॥ नरोविमृश्यकुर्वाणो लक्ष्मीस्तं श्रयतेध्रुवं ॥४॥

ज्यांचीं इंद्रियें स्वाधीन, ज्यानें मन जिंकिलें आहे, अपराध्यांस दंड करणारा, विचार करून क-र्म करणारा, त्यास अवश्य लक्ष्मी प्राप्त होते.

॥ क्षमा ॥

॥ क्षमावशीकृतिर्लोके क्षमया किंन साध्यते ॥
॥ शांतिखड्गः करे यस्य किंकरिष्यति दुर्जनः ॥ १॥

क्षमा हें लोकांस स्वाधीन करून घेण्याचें साधन आहे. क्षमेनें काय प्राप्त होणार नाहीं? क्षमारूप खड्ग ज्याच्या हातांत आहे, त्याचें दुर्जन काय करील?

॥ अतृणे पतितो वन्हिः स्वयमेवोपशाम्यति ॥
॥ अक्षमावान्परं दोषैरात्मानं चैव योजयेत् ॥ २॥

तृण नाहीं अशा जागेवर पडलेला अग्नि आपल्या आपणच विझून जातो. ज्याच्या अंगीं क्षमा नाहीं तो दुसऱ्यास वाईटपणा देईल व आपणही वाईट होईल.

॥ सत्कर्म ॥

॥ भक्तंच भजमानंच तवास्मीतिच वादिनं ॥

॥ त्रीनेत्राञ्छरणं प्राप्तान् विषमेपिनसंत्यजेत् ॥१॥

आपणज्याची सेवा करतों, जो आपली सेवा करतो, आणि जो मी तुझाआहें असें म्हणतो या तिघांस मोठें संकट प्राप्त झालें तरी सोडूं नये.

॥ सत्यंदानंतथोद्योगो ऽ संघर्ष क्षांति धीरताः ॥
॥ नत्यजेद्बुद्धिमानेतान् कदापिचगुणान्हिषट् ॥ २॥

सत्य, दान, उद्योग, हेवा न करणें, क्षमा, धैर्य हे गुण पुरुषानें कधींही सोडूं नये.

॥ यदानयतिमनसि यत्करोतिनरःसदा ॥
॥ तत्कर्मानुसृतिर्बुद्धिरतःसदर्त्तनंश्रयेत् ॥ ३॥

मनुष्य नेहमीं जें मनांत आणतों, नेहमीं करतो, त्यासारखी त्याची बुद्धि होते. याकरितां सर्वदां सदाचरण करावें.

॥ सत्कर्मधर्माचरणेविद्यायत्नोह्यकैतवः ॥
॥ सत्संगश्चतथैतानि कुर्वन्तेचोदयंनृणां ॥ ४॥

सत्कर्म, धर्माचरण, विद्या, प्रयत्न, निष्कपटपणा, वारंवार साधूंची संगति हीं मनुष्याचा उदय करितात.

## ॥ सुख ॥

॥ अर्थागमोनित्यमनारोगिताच प्रियाच भार्या प्रियवादिनीच ॥
॥ वश्यश्च पुत्रोर्थकरीचविद्या षड्जीव लोकस्य सुखानि राजन् ॥ १॥

धनलाभ, शरीरसंपत्ति, मधुरभाषण करणारी आवडती बायको, आज्ञाधारक पुत्र, जिच्या योगानें द्रव्यप्राप्त होईल अशी विद्या, हीं ईहलोकचीं सुखें आहेत.

॥ आरोग्यमानृण्यमविप्रवासः सद्भिर्मनुष्यैः सहसंप्रयोगः ॥
॥ स्वप्रत्ययावृत्तिरभीनवासः षड्जीवलोकस्यसुखानिराजन् ॥ २॥

आरोग्य, कर्ज नसणें, प्रवास करण्याची गरज नसणें, साधूंची संगति, पोटापुरतें उत्पन्न, कोणाचें भय नसणें, हीं सहा या लोकचीं सुखें आहेत.

॥ अनर्थकं विप्रवासं गृहेभ्यः पापैःसंधिं परदाराभिमर्शं ॥
॥ दंभंस्तैन्यंपशुनं मद्यपानं नसेवते यश्च सुखीसदैव ॥ ३॥

विनाकारण घरांतून बाहेर जात नाहीं; दुष्टांची संगति धरीत नाहीं; परस्त्रीचा अभिलाष करीत नाहीं; ढोंग व चोरी करीत नाहीं; नीचपणा करीत नाहीं, मद्यप्राशन करीत नाहीं असा मनुष्य सर्वकाळ सुखी असतो.

## ॥ दुष्टता ॥

॥ एकः सपन्नमश्नाति वस्ते वासश्च शोभनं ॥
॥ योऽसंविभज्य भृत्येभ्यः कोनृशंसतरस्ततः ॥१॥

पदरच्या मनुष्यांस दिल्याशिवाय जो एकटा चांगलें मिष्टान्न भक्षण करितो, उत्तम वस्त्र वापरतो, त्यापेक्षां दुसरा दुष्ट कोण ?

॥ अनुसूयार्जवं शौचं संतोषः प्रियवादिता ॥
॥ दमः सत्यमनायासो न भवंति दुरात्मनां ॥२॥

हेवा न करणें, सरळपणा, शुचिर्भूतपणा, संतोष, प्रियभाषण, इंद्रियनिग्रह, सत्य, स्थैर्य या गोष्टी दुष्टांच्या अंगीं रहात नाहींत.

## ॥ दुःख ॥

॥ ईर्षुर्घृणी नसंतुष्टः क्रोधनो नित्यदुःखितः ॥
॥ परभाग्योपजीवी च षडेते नित्यदुःखिताः ॥१॥

हेवा करणारा, निंदा करणारा, असंतुष्ट, रागीट नेहमीं शंका घेणारा, दुसऱ्याच्या भाग्यानें उ-

पजीविका करणारा, हे सहा नेहमीं दुःख भोगणारे होत.

॥ यईर्षुःपरवित्तेषुरूपेवीर्येकुलान्वये ॥
॥ सुखसौभाग्यसत्कारेतस्यव्याधिरनंतकः ॥ २॥

दुसऱ्याच्या द्रव्याचा, रूपाचा, पराक्रमाचा, कुलीनतेचा, सुखाचा आणि सुदैवाचा हेवा करतो त्यास अनंत दुःख प्राप्त होतें.

॥सुस्वभाव॥

॥ नवैरमुद्दीपयति प्रशांतं नदर्पमारोहतिनास्तमेति ॥
॥ नदुर्गतोऽस्मीतिकरोत्यकार्यंतमार्यशीलंपरमाहुरार्याः ॥ १॥

कलह न लावणें, डौल न मिरविणें, नाश न करणें, अडचणींत असतांही वाईट काम न करणें, यास श्रेष्ठ लोक सुस्वभाव असें ह्मणतात.

॥ नस्वेसुखेवैकुरुतेप्रहर्षं नान्यस्यदुःखेभवतिप्रहृष्टः ॥
॥ दत्वानपश्चात्कुरुतेनतापंसकथ्यतेसत्पुरुषार्यशीलः ॥ २॥

आपणास सुख झालें म्हणजे आनंदांत निमग्न न होणें, दुसऱ्यास दुःख झालें ह्मणजे आनं-

दीत न होणें, दिल्यावर पश्चात्ताप न करणें, यास सुस्वभाव असें म्हणतात.

॥ लोकप्रीति ॥

॥ नसंरंभेणा रभतेत्रिवर्गमाकारितःशंसति तत्वमेव ॥
॥ नमित्रार्थे रोचयते विवादं नापूजितः कुप्यतिचाप्यमूढः ॥ १ ॥

जो अविचारानें धर्म, अर्थ, काम, हे आरंभीत नाहीं; विचारलें असतां खरें सांगतो; मित्रांशीं कलह करीत नाहीं; मान मिळाला नाहीं तरी शहाणपणामुळें रागावत नाहीं.

॥ नयोभ्यसूयत्यनुकंपतेच नदुर्बलःप्रति भाव्यं करोति ॥
॥ नात्याह किंचित्क्षमते विवादं सर्वत्रताद्दग्लभते प्रशंसां ॥ २ ॥

कोणाच्या हेवा करीत नाहीं; दया करतो; थोरांशीं विरोध करीत नाहीं; फाजिल बोलत नाहीं; कोणी भांडूं लागला तरी सोसून घेतो; अशा मनुष्याची सर्व ठिकाणीं प्रशंसा होते.

॥ वाक्संयम ॥

॥ वाक्संयमोहिनृपते सुदुष्करतमोमतः ॥
॥ अर्थवच्चविचित्रंच नशक्यंबहुभाषितुं ॥ १ ॥

वाक्संयम करणें फारच कठीण आहे. अर्थयुक्त आणि मनोरंजक असें पुष्कळ वेळ पर्यंत बोलणें अशक्य आहे.

॥ अभ्यावहति कल्याणं विविधं वाक् सुभाषिता ॥
॥ सैव दुर्भाषिता राजन् अनर्थायोपपद्यते ॥ २॥

चांगलें भाषण केलें तर त्यापासून पुष्कळ कल्याण होतें; परंतु दुर्भाषणानें अनर्थ प्राप्त होतात.

॥ रोहते सायकैर्विद्धं वनं परशुना वनं परशुनाहतं ॥
॥ वाचा दुरुक्तं बीभत्सं न संरोहति वाक्क्षतं ॥ ३॥

शस्त्रानें वृक्ष तोडिला तर पुनः फुटतो, परंतु वाग्बाणानें क्षत पडतें तें बरें होत नाहीं.

॥ कर्णिनालीकनाराचान्निर्हरंति शरीरतः ॥
॥ वाक्शल्यस्तु न निर्हर्तुं शक्यो हृदिशयो हिसः ॥ ४॥

बाणाचें सल शरीरांत राहिलें तर उपटून काढितां येतें, परंतु वाक्शल्य काढितां येत नाहीं तें हृदयांत गडून बसतें.

॥ वाक्सायकावदनान्निष्पतंति यैराहतःशोचतिराज्यहानि ॥
॥ परस्यनामर्मसुतेपतंति तान् पंडितोनावसृजेत्परेभ्यः ॥५॥

वाग्बाण मुखांतून सुटले ह्मणजे लोकांच्या मर्मस्थानीं जाऊन पडतात, त्यांनीं घायाळ केलेला मनुष्य रात्रंदिवस शोकांत असतो. या करितां हे बाण शहाण्यानें दुसऱ्यावर सोडूं नयेत.

॥ धर्म ॥

॥ दश धर्मनजानंति धृतराष्ट्र निबोधनात् ॥
॥ मत्तःप्रमत्तउन्मत्तः श्रांतः क्रुद्धोबुभुक्षितः ॥१॥

मद्यादि सेवन करणारा, विषयासक्त, वायु वगैरे रोगांनीं वेडा झालेला, थकलेला, रागावलेला, भुकावलेला,

॥ त्वरमाणश्चलुब्धश्च भीतःकामीचतेदश ॥
॥ तस्मादेतेषु सर्वेषु न प्रसज्जेतपंडितः ॥२॥

धांदल्या, लोभी, भित्रा, कामपीडित, हे दहा धर्म जाणीत नाहींत. या करितां शहाण्यांनीं यांच्याशीं फार प्रसंग ठेवूं नये.

॥ पूजाध्ययनदानानितपः सत्यं क्षमा धृणा ॥
॥ निर्लोभिता तथाचाष्टमार्गा धर्मस्यसंमताः ॥३॥

देवपूजा, अध्ययन, दान, तप, सत्य, क्षमा, करुणा, निर्लोभिता हे आठ धर्माचे मार्ग आहेत.

॥ चत्वारः प्रथमानेषु दंभार्थमपि कुर्वते ॥
॥ तिष्ठंत्यन्येतत्वतस्तु सज्जनेषु महात्मसु ॥४॥

यांपैकीं पहिले चार ढोंगाकरितांही लोक आचरितात; परंतु पुढले चार खरोखर महात्मे जे आहेत त्यांचे ठिकाणीं राहतात.

॥ पुण्य पापे ॥

॥ पापकर्त्तातु दुष्कीर्तिस्तत्फलंचविभुज्यते ॥
॥ सुकृतीसुयशःपुण्य फलंच प्रतिपद्यते ॥१॥

पाप करणाऱ्याची दुष्कीर्ति होऊन त्यास पापाचें फल भोगावें लागतें. पुण्य करणाऱ्याची सत्कीर्ति होऊन त्यास पुण्यफल प्राप्त होतें.

॥ मुहुर्मुहुः पापकर्त्तुर्बुद्धिर्नश्यतितत्क्षणे॥
॥ तस्यांबुध्यांविनिष्टायांपापंचक्रियतेसदा॥२॥

मनुष्य वारंवार पाप करूं लागला ह्मणजे त्याची बुद्धि नष्ट होते, बुद्धि नष्ट झाली म्हणजे तो सर्वकाळ पापच करूं लागतो.

॥ बुद्धिःपुण्यवतोवृद्धिं प्राप्नोतिविपुलांसदा ॥
॥ तद्बुध्यांसर्वदापुण्य संग्रहं कुरुते नरः ॥३॥

पुण्य करूं लागला म्हणजे बुद्धि वृद्धिंगत होते. बुद्धि वाढली ह्मणजे तो सर्वदा पुण्यच करतो.

॥ सुकीर्तिमनुभूयेह स्वर्गं प्राप्नोति पुण्यवान् ॥
॥ अतः पापं मानवेना प्रमाद्यक्रियतानच ॥४॥

पुण्य करणाऱ्याची सुकीर्ति होऊन तो स्वर्गास जातो. याकरितां मनुष्यानें सावध राहून पापकरूंनये.

## ॥ स्वर्गलाभ ॥

॥ सत्यंविनयाध्ययनविद्याचैवकुलीनता ॥
॥ सुस्वभावोबलधनेशौर्यं मधुरभाषणं ॥१॥

॥ हेतवः सुरलोकस्य पदार्था दशचैषकाः॥

सत्य, विनय, अध्ययन, विद्या, कुलीनता, सुस्वभाव, बल, धन, शौर्य, मधुरभाषण हीं दहा स्वर्ग प्राप्तीचीं साधनें आहेत.

॥ शृण्वन्सदुपदेशं यो नीतिज्ञश्च तथैव च ॥ २॥
॥ दाता भृत्यान् भोजयित्वा भोक्ता हंता सुकर्मकः॥
॥ कृतज्ञः सत्यशीलश्च सुभावः स्वर्गगामिनः ॥३॥

सदुपदेश ऐकणारा, नीति जाणणारा, दाता, पदरच्या लोकांचा समाचार घेऊन भोजन करणारा, हिंसा न करणारा, दुष्कर्म न करणारा, कृतज्ञ, सत्यशील, मृदुस्वभाव असा जो शहाणा तो स्वर्गास जातो.

॥ कुलीनता ॥

॥ संतोषं प्राप्नुतो येषां कृत्सामातापितातथा ॥
॥ अव्यग्रं धर्मकर्तारं इच्छंति सुयशश्चये ॥ १॥
॥ त्यजंत्यसत्यं ये ते वै महाकुलसमुद्भवाः ॥

ज्या पुरुषाच्या आचरणानें आईबापांच्या अंतःकरणास वाईट वाटत नाहीं, जे मन स्वस्थ ठेवून धर्माचरण करितात, जे सत्कीर्तीची इच्छा करितात, व असत्याचा त्याग करितात ते मोठे कुलीन होत.

॥ पशुवीर धनांहि सानिध्येप्य नयो यदि ॥२॥

॥ नचतत्र कुलीनत्वं निःस्वत्वानीति योगिनः ॥

॥ तथापिते कुलीनाःस्युस्तेषांकीर्तिर्भविष्यति ॥३॥

पशु, पराक्रमी पुरुष, द्रव्य, हीं जवळ असलीं तरी सदाचरण नसेल तर कुलीनता प्राप्त व्हावयाची नाहीं. सदाचरणी जो पुरुष त्यांपाशीं द्रव्य अल्प असलें तरी त्यास कुलीन म्हणतात. त्याची मोठी कीर्ति होते.

## ॥ समुदायमहात्म्य ॥

॥ तंतयो यदि सूक्ष्माःस्युः समाएकत्रमीलिताः ॥

॥ दृढाभूत्वा महायासं सहंते साधवस्तथा ॥ १॥

तंतु बारीक असतात, परंतु सारखे असून एके ठिकाणीं पुष्कळ झाले असतां बळकट होऊन समुदायामुळें पुष्कळ आयास सोसतात, याच प्रमाणें सज्जनाची स्थिति आहे.

॥ अनेकतृणशलाकाः सद्यः प्रज्वलनं यथा ।
॥ यांति तद्वत्सजातीया ऐकमत्यात्पराक्रमम् ॥ २॥

गवताची एकेक काडी वेगळी पेटविली तर धुमसते, परंतु एकदम पुष्कळ पेटविल्या असतां जाळ होतो; त्याप्रमाणें जातींतले सर्व लोक एका मतानें वागतील तर मोठाले पराक्रम करतील.

॥ दृढमूलो वृक्ष एको वात्यया पात्यते यथा ॥
॥ तथा महागुणैर्युक्तं केवलं हंति शात्रवः ॥ ३॥ म॰ भा॰

वृक्ष मोठा बळकट असून एकटाच उभा असेल तर त्यांच्यासकट वारा त्यांचा क्षणांत नाश करील. परंतु एके ठिकाणीं पुष्कळ वृक्ष असतात, ते एकमेकांच्या आश्रयानें मोठालीं तुफानेंही सोसतात. त्याप्रमाणें जसा वारा एकट्या वृक्षाचा सहज नाश करितो, तसा जो मनुष्य एकटा तो सर्व गुणांनीं युक्त असला तरी त्याचा नाश करितां येईल असें शत्रु मानितात.

॥ प्रपंच साधून परमार्थ ॥

॥ क्रियमाणे प्रपंचेपि विवेकेऽनलसो भवेत् ॥
॥ त्यक्त्वा प्रपंचं यः कुर्यात् परमार्थं स कष्टभाक् ॥ १॥

॥ प्रपंचाकरणंपुंसः परमार्थंविरोधयेत् ॥
॥ सावधानः प्रपंचेयः परमार्थंससाधयेत् ॥२॥
॥ कृत्वाप्रपंचंयः पश्येत् परमार्थंसुखीचसः ॥
॥ उदासीनःपदार्थेषुविवेकमवलोकयेत् ॥३॥
॥ एवंकृतेसुदुष्प्रापोजगदीशोहिलभ्यते ॥
॥ जगदीशात्परोलाभः संसारे नचविद्यते ॥ ४॥
॥ प्रपंचेस्मिन्पणेदेवोमुख्योलाभःस्मृतोबुधैः ॥
॥ तस्मात्स्थिरतःपुंसःकष्टस्यविनिवर्तिका ॥५॥ राम॰

विवेकी जनांनीं प्रथमतः नीटनेटका प्रपंच करून नंतर परमार्थ साधण्यास प्रवृत्त व्हावें. प्रपंच सोडून परमार्थ साधण्याचा प्रयत्न केला तर त्यापासून फार कष्ट सोसावे लागतील. प्रपंच सोडून परमार्थाच्याच नादीं लागून त्याप्रमाणें न निभलें म्हणजे मग अर्थातच त्यांना परमार्थ साधतां यावयाचा नाहीं. जो प्रपंचामध्यें सावधानवृत्तीनें राहील तोच परमार्थ साधूं सकेल. प्रपंचांत राहून परमार्थ साधणारासच सर्व सौख्यें प्राप्त होतील. पदार्थमात्राचे ठिकाणीं उदासवृत्ति धारण करून विवेकी

बनलें तर सर्व संकटें दूर होऊन परमेश्वराची प्राप्ति होते. परमेश्वरापरता दुसरा लाभ नाहीं; याक-
रितां संसारांत राहून सदासर्वदां समाधान वृत्तीनें व परमेश्वरीं रत असावें.

॥ संसारी मनुष्यानें काय काय करूं नये ॥

॥ वल्मीपृष्ठ्वा न गंतव्यं नज्ञात्वा फलभक्षणं ॥
॥ लब्धं वस्तु परस्यापि नादद्यात्सहसा कदा ॥१॥
॥ विनाविचारं नवदेन्मर्यादां नचलंघयेत् ॥
॥ प्रीत्यारोषं सुधीः कुर्यान्नत्यजेदार्जवं कदा ॥२॥
॥ पापद्रव्यं नगृण्हीयात् पुण्यमार्गं सदा श्रयेत् ॥
॥ असत्संगद्वेषनिंदे नरदारधनं त्यजेत् ॥३॥
॥ त्यजेद्वाचालकलहं विद्याभ्यासं सतां गतिं ॥
॥ सदा कुर्यादतिक्रोधं वर्जयेन्मतिमान्नरः ॥४॥
॥ नवै खिद्यात्प्रेमवंतमरुचिं शिक्षणे त्यजेत् ॥
॥ प्रतिक्षणं नवैक्रुध्यात् पुमर्थमनृतं वदेत् ॥५॥

॥ नाकृत्वा पौरुषं ब्रूयादालस्यं नसुखं भजेत् ॥
॥ परिन्हियात्सूचकतां संशोध्य परिवर्तयेत् ॥ ६ ॥
॥ नविस्मरेदुक्तवाक्यं प्रयत्नं नैव हापयेत् ॥
॥ सदा कष्टैर्नवैन्नस्ये त्सामर्थ्यं समये श्रयेत् ॥ ७ ॥
॥ नकुर्याद्बहुलांचिंतां परस्त्रीं दृष्टिगोचरां ॥
॥ कृतोपकारं पुरुषं धीमान् प्रत्युपकारयेत् ॥ ८ ॥
॥ विश्वासघातमन्यस्य पीडांच परिवर्जयेत् ॥
॥ अशुद्धिं मलिनं वस्त्रं प्रभ्रंशं गच्छति पूरुषे ॥ ९ ॥
॥ व्याप्तिमन्यानधीनत्वं नत्यजेत्सहसा नरः ॥
॥ अन्यं पुंसां स्वभारंहि वाहयेन्न कदाचन ॥ १० ॥
॥ अनादरे नचब्रूयात् स्वीयां कीर्तिं नवर्णयेत् ॥
॥ गोष्ठीकथनसमये स्वयं हास्यं विवर्जयेत् ॥ ११ ॥
॥ नानयेत्स्वमुखे गालिमन्यं दृष्ट्वा नहासयेत् ॥

॥ नोनैरंगैः प्रवृत्तिंच कुर्यात् कुलविभूषणः ॥१२॥
॥ नभवेद्बहु कृपणोऽप्रमाणं नचवर्तयेत् ॥
॥ पश्चान्निंदां नवै कुर्यात्प्रमादं स्वल्पवित्ततः ॥१३॥
॥ नलज्जेद्धरिभजने स्नानं संध्यां समाचरेत् ॥
॥ नखंडयेत् कुलाचार मनाचारं परिक्षिपेत् ॥१४॥
॥ देवस्यसन्निधौ यद्वै चिंतितं नतुलंघयेत् ॥
॥ त्यज्येत नस्वीय धर्मो विचारेण सदाचलेत् ॥१५॥
॥ सत्यः पंथा नहातव्योऽसत्यं हि विवर्जयेत् ॥
॥ अभिमानमसत्यस्य गृण्हीयान्नकदाचन ॥१६॥ दा.बो.

वाट पुसल्याशिवाय जाऊं नये; कोणतेंही फळ ओळखल्यावांचून खाऊं नये; दुसऱ्याची सांपडलेली वस्तु घेऊं नये; विचार केल्याशिवाय बोलूं नये; प्रीतिवांचून रुसूं नये; लोकांचे अर्जव तोडूं नये; मर्यादे वांचून हलूं नये; लबाडीनें द्रव्यसंचय करूं नये; पुण्याचा त्याग करूं नये; कोणाची निंदा व द्वेष करूं नये; कुसंगति धरूं नये; बलात्कारानें कोणाचें द्रव्य हरण करूं नये; हलकटांशीं भांडूं नये; सुसंगति

व विद्याभ्यास सोडूं नये; ज्यास संताप करूं नये; जिवलगांशीं भेदाभेद ठेवूं नये; शिकवणीचा मनां
त वीट मानूं नये; क्षणक्षणीं रुसूं नये; खोटा पुरुषार्थ वदूं नये; पराक्रम केल्याशिवाय सांगूं नये; आ-
ळसांत सुख मानूं नये; चहाडी सांगूं नये; कोणतीही गोष्ट शोधल्याशिवाय करूं नये; आपले बो-
ललेले बोल विसरूं नये; प्रयत्न करण्याचें सोडूं नये; कष्टाचा त्रास मानूं नये; प्रसंगीं सामर्थ्य दाखवि
ण्यास चुकूं नये; फार चिंता वाहूं नये; पापबुद्धीनें परस्त्रीकडे अवलोकन करूं नये; कोणी उपकार के-
ल्यास आपणही त्याच्यावर उपकार करण्यास विसरूं नये; परक्यांस पीडा करूं नये; कोणाचा वि
श्वासघात करूं नये; अपवित्र राहूं नये; मळीन वस्त्र धारण करूं नये; कोणी कोठें जावयास निघा-
ल्यास त्याला टोकूं नये; व्यापकपणा सोडूं नये; पराधीन होऊं नये; कोणावर आपला भार टाकूं नये;
जेथें मान नाहीं तेथें बोलूं नये; आपली कीर्ति गाऊं नये; बोलतांना आपण आपल्याशीं हंसूं नये;
शिवीगाळ करूं नये; दुसऱ्याकडे पाहून हंसूं नये; कोणाचें उणें पाहूं नये; फार कृपणता करूं नये;
अप्रामाणिक होऊं नये; कोणाचे मागें उणें बोलूं नये; अल्प धनानें माजूं नये; परमेश्वर भक्तीचे ठि-
काणीं लाजूं नये; स्नानसंध्यादि कर्मे सोडूं नये; कुलाचाराचा त्याग करून अनाचारास प्रवृत्त हो-
ऊं नये; देवास केलेला नवस फेडण्यास विसरूं नये; स्वधर्म सोडून भलत्याच नादीं लागूं नये;

सन्मार्ग सोडून कुमार्गास जाऊं नये आणि असत्याचा कधींही अभिमान बाळगूं नये.

## ॥ संसारांत कसें वागावें ॥

॥ निष्णातः स्यात्स्वके कार्ये नोचेदज्ञश्च कथ्यते ॥
॥ सुदैवः सतु विज्ञेयः सदोद्योगीच यो नरः ॥१॥
॥ साधकत्वं नयं कर्म शुद्धं कुर्याद्विचक्षणः ॥
॥ उपकुर्याद्धि हून लोकान् कार्यं कुर्याच्च कस्यचित् ॥२॥
॥ दयां संसंकटे कुर्यात् मृदु वाक्यं समाश्रयेत् ॥
॥ त्यक्त्वा नां द्यंयतेन्नित्यं शब्दैर्न दुनुयान्नरे ॥ ३॥
॥ आगतस्यच्च संमानं तथा हरि कथां श्रयेत् ॥
॥ कीर्तिंच शेषयेद्देहे त्यक्ते चोपकृतौ परः ॥४॥ दा.बो.

ज्याचा जो व्यापार धंदा असेल तो त्यानें खबरदारीनें ( हुशारीनें ) करावा, नाहींतर नांवें ठेवण्यास पात्र होईल. रिकामा वेळ जाऊं देऊं नये आणि प्रपंच सावधानपणें करावा. हेंच भाग्याचें लक्षण आहे. ज्या कामास जें साधन असेल त्या साधनीं तत्पर राहवें. विनय असावा. जनास मान्य

होईल असें सद्वर्तन ठेवावें. शरीर परोपकारी लावून आपल्या शक्तीप्रमाणें सर्वांच्या कामीं यावें; संकटांत पडणारावर दया ठेवून मधुर भाषणानें सर्वत्रांस राजी राखावें; आळस अगदीं टाकावा; मुरवीं दुरुत्तर नसावें; आपल्या घरीं येणाराचा सत्कार ठेवावा. हरिकथेंत रत असावें; आणि मरणानंतर मागें सत्कीर्ति राहील असें करून ठेवावें.

## ॥ सांसर्गिक दोषादोष ॥

॥ देशग्रामकुलानिस्फर्भागभांजि कृतादिषु ॥
॥ कलौ तु केवलं कर्ता फलभाक् पुण्यपापयोः ॥ १ ॥

श्रीकृष्ण परमात्मा सांगतातः- कृतत्रेतादि युगांत एकानें पाप किंवा पुण्य केलें असतां त्याचा अंश ग्रहण करणारे कुलांतील व ग्रामांतील जन होत असत; परंतु कलीमध्यें तर ज्याचे त्याला च तें ग्रहण करावें लागतें.

॥ अकृते पि हि संसर्गे व्यवस्थेयमुदाहृता ॥
॥ संसर्गात्पुण्यपापानां यथायाति निबोधतत् ॥ २ ॥

ही व्यवस्था संसर्ग नसतांची झाली; आतां संसर्ग झाला असतां पापपुण्य कसें प्राप्त होतें

तें सांगतोः-

॥ फलार्धं प्राप्नुयान्मर्त्यो यथावत्पुण्यपापयोः ॥
॥ अध्यापनाद्याजनाद्वाप्येकंपंक्त्यशनादपि ॥३॥
॥ तुर्यांशं पुण्यपापानां परोक्षं लभते नरः ॥

संसर्ग झाला असतां पापपुण्याचा अर्धांश प्राप्त होतो. अध्यापन, याजन व एक पंक्तीस भोजन केलें असतां पापपुण्याचा चतुर्थांश प्राप्त होतो.

॥ एकासनादेकयानान्निश्वासस्यांगसंगतः ॥४॥
॥ षडंशं फलभागी स्यान्नियतं पुण्यपापयोः ॥

एका आसनावर बसणें, एकत्र वास करणें व परस्पर शरीराचा संबंध करणें याच्या योगानें पापपुण्याचा षडंश फलभागी होतो.

॥ स्पर्शनाद्भाषणाद्वापि परस्यस्तवनादपि ॥५॥
॥ दशांशं पुण्यपापानां नित्यं प्राप्नोति मानवः ॥

परस्पर भाषण, स्पर्श आणि स्तुति केली असतां पापपुण्याचा दशांशाचा भागी होतो.

॥ दर्शनश्रवणाभ्यांचमनोध्यानात्तथैवच ॥ ६॥

॥ परस्यपुण्यपापानांशतांशंप्राप्नुयान्नरः ॥

परस्परांचें दर्शन, श्रवण व चिंतन केलें असतां पाप पुण्याचा शतांश प्राप्त होतो.

॥ परस्यनिंदापैशून्यंधिःकारंच करोतियः ॥७॥

॥ तत्कृतं पातकंप्राप्यस्वपुण्यं प्रददातिसः ॥

जो परस्पराची निंदा व धिःकार करितो व न्यून बाहेर काढितो तो त्याचें पाप ग्रहण करून आपलें पुण्य त्यास देतो.

॥ स्नानसंध्यादिकंकुर्वन् यःस्पृशेद्वाबभाषते ॥ ८॥

॥ तत्पुण्यकर्मषष्ठांशंदद्यात्तस्मैविनिश्चितम् ॥

जो स्नान संध्यादि कर्म करीतअसून इतरांशीं भाषण करितो, व इतरांस स्पर्श करितो, तो त्यास आपल्या पुण्याचा षष्ठांश देतो यांत संशय नाहीं.

॥ धर्मोद्देशेनयद्द्रव्यमपरंयाचते नरः ॥ ९॥

॥ तत्कर्मजंयस्य धनंतस्यदत्वाप्नुयात्फलम् ॥

जो आपण धर्म करावयाच्या उद्देशानें इतरांस द्रव्य मागतो त्याच्या त्या पुण्यकर्माला ज्यानें द्रव्य दिलें असेल त्याला त्याचें फल प्राप्त होतें.

॥ अपहृत्य परद्रव्यं पुण्यकर्म करोति यः ॥१०॥
॥ कर्मकृत्पापभाक्तत्र धनिनस्तद्ध्रुवं फलम् ॥

जो इतराचें द्रव्य चोरून पुण्यकर्म करितो, तो पापाचा विभागी होऊन त्याच्या पुण्याचें फल ज्याचें द्रव्य असेल त्याला प्राप्त होतें.

॥ नापकृत्य ऋणं यस्तु परस्य म्रियते नरः ॥११॥
॥ धनी तत्पुण्यमादत्ते तद्धर्मस्यानुरूपतः ॥

जो ऋण न फेडतां मरण पावतो, त्याच्या धर्माचें फल त्याच्या सावकारास प्राप्त होतें.

॥ बुद्धिदातानुमंता च यश्चोपकरणप्रदः ॥१२॥
॥ प्रेरकश्चापि षष्ठांशं प्राप्नुयात् पुण्यपापयोः ॥
॥ प्रजाभ्यः पुण्यपापानां राजा षष्ठांशमुद्धरेत् ॥१३॥

जो पापपुण्य करण्याविषयीं दुसऱ्यास सांगतो, कोणी करीत असल्यास त्यास अनुमोदन दे-

तो किंवा त्या कर्मास जीं साधनें लागतात तीं ही देतो, तो त्याच्या कर्माचा षष्ठांश ग्रहण करितो. त्याचप्रमाणें राजाही प्रजेपासून पापपुण्याचा षष्ठांश ग्रहण करितो.

॥ शिष्याद्गुरुः स्त्रियो भर्ता पिता पुत्रात्तथैवच ॥
॥ स्वपत्न्करपिपुण्यस्य योषिद् र्धमवाप्नुयात् ॥
॥ चेत्तस्यानुव्रताशश्वद्वर्तते तुष्टिकारिणी ॥ १४॥ प॰ पु॰

शिष्याचें अर्धपुण्य गुरूस मिळतें; स्त्रीचें पतीस व पतीचें स्त्रीस अर्धपुण्य मिळतें; पुत्राचें पित्यास अर्धपुण्य मिळतें; मात्र स्त्रीजर पतीला अनुकूल वत्याचा संतोष संपादन करणारी असेल तर च पतीच्या अर्धपुण्याची भागीदारीण होते.

## ॥ लक्ष्मीप्राप्तीचें साधन ॥

॥ यत्राभ्यागतदानमानचरणप्रक्षालनं भोजनम् ।
॥ तत्सेवापितृदेवतार्चनविधिः सत्यंगवां पालनम् ॥
॥ धान्यानामपि संग्रहो न कलहश्चित्तानुरूपा प्रिया ।
॥ दृष्ट्वाप्राह हरिं वसामि कमला तस्मिन गृहे निश्चला ॥१॥

लक्ष्मी हरीस सांगत्ये:- जेथें अभ्यागतास दान, मान, चरणप्रक्षालनपूर्वक भोजन मिळतअसून साधूंची सेवा, पितरव देवता यांचा पूजाविधि सतत चाललाआहे, तसेंच जेथें सत्याचरण, गायीं चें पालन, विपुल धान्य असून कलह नसणें, व पतीच्या मनोधर्माप्रमाणें वागणारी भार्या असें ज्या स्थलीं आहे त्या गृहीं मीं वास करते असें खास समजावें.

॥ उत्साहसंपन्नमदीर्घसूत्रं क्रियाविधिज्ञं व्यसनेष्वसक्तम् ॥
॥ शूरंकृतज्ञंदृढसौहृदंच लक्ष्मीः स्वयंयातिनिवासहेतोः ॥ २॥

सदा आनंदी, सरळमार्गी, सत्कर्माचरणी, व्यसनहीन, शूर, कृतज्ञ, व मित्रत्वास चांगला असा जो पुरुष असेल त्याचे जवळ लक्ष्मी आपण होऊन राहण्यास जाते.

॥ सहसाविदधीतनक्रिया । मविवेकः परमापदांपदम् ॥
॥ वृणतेहिविमृष्यकारिणं । गुणलुब्धाःस्वयमेवसंपदः ॥३॥

कोणतीही गोष्ट उतावळीनें करूंनये, कारण अविवेक हा आपत्तीचें मूळ होय. जो कोणती ही गोष्ट सुविचारानें करतो, त्याच्या गुणास भुलून संपत्ति त्यास स्वयमेव वरते.

॥ अलक्ष्मी (दारिद्र्य) येण्याचें कारण ॥

॥ रात्रौ रात्रौगृहेयस्मिन्दंपत्योः कलहोभवेत् ॥
॥ निराशायांत्यतिथयस्तस्मिन्स्थानेरतिर्मम ॥१॥

लक्ष्मीची वडील बहीण आकाबाई (दारिद्र्य) आपला पति जो उद्दालक त्यास म्हणतेः- ज्या घरीं नित्य स्त्री पुरुषांचा कलह होतो व जेथें अतिथीचें पूजन न होतां तो निराश होऊन परतजातो त्या स्थानीं माझी वास करण्याविषयीं प्रीति आहे.

॥ वृद्धसज्जनमित्राणांयत्रस्यादपमाननम् ॥
॥ निष्ठुरंभाषणंयत्रतत्रनित्यंवसाम्यहम् ॥२॥
॥ दुराचाररतायत्र परद्रव्यापहारिणः ॥
॥ परदाररताश्चापि तस्मिन्स्थानेरतिर्मम ॥३॥
॥ गोवधोमद्यपानंच यत्रसंजायतेनिशम ॥
॥ ब्रह्महत्यादिपापानितस्मिन्स्थानेरतिर्मम ॥४॥ प॰पु॰

जेथें वृद्ध, सत्पुरुष, आणि मित्र यांचा अपमान होतो, व जेथें निष्ठुर भाषण होतें तेथें मी नित्य वास करितें. जेथें दुराचारी पुरुष वास करितात, व जेथें परद्रव्याचा अपहार करणारे आहेत आणि

जेथें परस्त्री गमन करणारे वास करितात तेथें मी वास करितें. गोवध व मद्यपान जेथें रात्रंदिवस होतें व जेथें ब्रह्महत्यादि पातकें होतात अशा स्थानीं वास करण्यास माझी प्रीति आहे.

## ॥परोपकार॥

॥ परोपकारः कर्त्तव्यः प्राणैरपि धनैरपि॥
॥ परोपकारजं पुण्यं नस्यात्क्रतुशतैरपि॥१॥

शरीरानें व धनानें जो परोपकार करितो, त्यापासून जें पुण्य प्राप्त होतें, तितकें पुण्य शंभरयज्ञ केल्यानेंही प्राप्त होत नाहीं.

## ॥ जीवित साफल्य ॥

॥ जीवन्तिजीवितेयस्य विप्रामित्राणिबान्धवाः॥
॥ जीवितंसफलंतस्य- आत्मार्थे कोनजीवति ॥१॥ व्या.

जे ब्राह्मण आणि इष्टमित्रादिकांस जाणतात, त्यांचेच जीवित सफल होय, व जे केवळ स्वतःचें पोट भरणारे ते निरर्थक होत.

॥ इति विचारोक्त विषय समाप्तः॥

॥ श्रीगणेशायनमः ॥ अथमातृपितृमहात्म्य प्रारंभः ॥

जगामध्यें परमपूज्य आणि श्रेष्ठ देवत पुत्रास मातापितर होत. यासाठीं ज्याला आपलें यथार्थ कल्याण करून घेणें असेल, त्यानें आपल्या वडिलांचे ठिकाणीं पूज्यता ठेवून त्यांच्या सेवेंत तत्पर राहिल्यानें ईश्वराची प्रसन्नता आणि आत्मकल्याण किती व कसें होतें याविषयीं पद्मपुराणांत आणि मनूनें सांगितलें आहे तें असें:-

आचार्यो ब्रह्मणोमूर्तिः पितामूर्तिः प्रजापतेः ॥
मातापृथिव्यामूर्तिस्तु भ्रातास्वोमूर्तिरात्मनः ॥

आचार्य हा परमात्म्याची मूर्ति आहे; पिता ब्रम्हदेवाची मूर्ति, माता पृथिवीची मूर्ति आणि सोदर भ्राता हा आत्म्याची मूर्ति आहे. तस्मात हे देवतारूपी आहेत यास्तव यांचा अवमान करूं नये.

आचार्यश्चपिताचैव माता भ्राताचपूर्वजः ॥
नार्तेनाप्यव मंतव्या ब्राह्मणेनविशेषतः ॥

आपण पीडित असेल तथापि त्यानें आचार्य, मातापिता आणि ज्येष्ठ भ्राता यांचा अवमान करूं नये.

यंमातापितरौक्लेशंसहेतसंभवेनृणाम्॥
नतस्यनिष्कृतिःशक्याकर्तुंवर्षशतैरपि॥

आपत्यें म्हणजे- कन्या पुत्र यांच्या उत्पत्तीचे गर्यी जे क्लेश ( मातेला क्लेश- कुक्षींत धारण, करणें, प्रसव वेदना, जन्मानंतर रक्षण करणें, वाढविणें इ॰ पित्याहून अधिक होत. आणि पित्याला क्लेश- रक्षण करणें, वाढविणें. मौंजीबंधनकरणें, आणि विद्वानकरणें इ॰ होत ) मातापिता सहन करितात त्यांची निष्कृति शतशः वर्षांनीं व अनेकजन्मांनींही होणें अशक्य आहे.

तयोर्नित्यंप्रियंकुर्यादाचार्यस्यचसर्वदा॥
तेष्वेवत्रिषुतुष्टेषुतपःसर्वंसमाप्यते ॥

यास्तव मातापिता आणि आचार्य यांचा जेणें करून संतोष होईल असें सर्वदा करावें. कारण मातापिता आणि आचार्य हे तीन ज्या कालीं संतुष्ट होतील तेव्हां चांद्रायणादि सर्व तपांची सिद्धि प्राप्त होते.

तेषांत्रयाणांशुश्रूषांपरमंतपउच्यते॥
नतैरभ्यननुज्ञातोधर्ममन्यंसमाचरेत॥

माता पिता आणि आचार्य ह्या तिघांची सेवा करणें हेंच उत्तम तप असें ह्मटलें आहे. कारण यांच्या सेवेपासूनच सर्व तपाची फलप्राप्ति आहे. यास्तव जर कांहीं इतर धर्म ( नित्यकर्म खेरीज करून ) आचरण कर्तव्य असेल तर तो तिघांच्या संमतीवांचून करूं नये.

तएवहित्रयोलोकास्तएवत्रय आश्रमाः॥
तएवहित्रयो वेदास्तएवोक्तास्त्रयोऽग्नयः॥

माता पिता आणि आचार्य हे तीन लोक होत. कारण ते लोकत्रयाचे प्राप्तीस हेतु आहेत; तीन आश्रमही तेच होत. कारण गृहस्थादिक तीन आश्रम देणारे तेच आहेत. ऋग्वेद, यजुर्वेद, आणि सामवेद हे तीन वेद तेच होत. कारण तीन वेदांच्या जपाच्या फलाचे उपायभूत तेच आहेत. तसेंच दक्षिणाग्नि, गार्हपत्य आणि आहवनीय हे तीन अग्नि तेच होत. कारण या तीन अग्नी पासून संपादन होणारें जें यज्ञादि फल तें देणार ते आहेत.

सर्वेतस्यादृताधर्मायस्यैते त्रय आदृताः॥
अनादृतास्तुयस्यैतेसर्वास्तस्याफलाःक्रियाः॥

माता पिता आणि आचार्य या तिघांचा जो सत्कार करतो त्याला सर्व धर्म फलदायक होतात. आणि जो या तिघांचा सत्कार करीत नाहीं त्याचीं श्रौतस्मार्तादि सर्व कर्में निष्फल होतात.

यावत्त्रयस्तेजीवेयुस्तावन्नान्यंसमाचरेत् ॥
तेष्वेवनित्यं शुश्रूषांकुर्यात्प्रियहितेरतः ॥

माता पिता आणि आचार्य हे तीन जावत्कालपर्यंत जिवंत असतील तावत्कालपर्यंत स्वातंत्र्यानें विशेष धर्म आचरण करूंनये. तर त्यांचें प्रिय व हित होईल अशा रीतीनें प्रत्यही त्यांची सुश्रूषा करावी.

तेषामनुपरोधेन पारत्र्यं यद्यदाचरेत् ॥
तत्तन्निवेदयेत्तेभ्योमनोवचनकर्मभिः ॥

यांच्या सेवेमध्यें अंतर न करतां त्यांच्या आज्ञेनें मन, वाणी आणि कर्म यांहीं करून परलोक फलद कर्म आचरण करावें. नंतर तें 'मी अमुक हें असें कर्म केलें' याप्रमाणें त्यांना निवेदन करावें.

त्रिष्वेतेष्वितिकृत्यंहि पुरुषस्यसमाप्यते ॥
एषधर्मः परःसाक्षादुपधर्मोऽन्यउच्यते ॥

मातापिता आणि आचार्य या तिघांची यथासांग शुश्रूषा केल्यानें पुरुषांनें श्रौतस्मार्तादि सकल कर्तव्यकर्मे संपूर्ण आचरण केलीं असें होतें. यास्तव सर्व पुरुषार्थाला साक्षात् साधन असा हा उत्तम धर्म होय.

त्रिष्वप्रमाद्यन्नेतेषु त्रीन्लोकान्विजयेद्गृही॥
दीप्यमानःस्ववपुषा देववद्दिवि मोदते ॥

गृहस्थाश्रमी हा ह्या तिघांच्या सेवेविषयीं आळस न करील तर तेणेंकरून त्याला त्रैलोक्याचें आधिपत्य प्राप्त होतें. आणि शरीरकांतीकडून प्रकाशमान होत्साता सूर्यादि देवतांप्रमाणें स्वर्गलोकीं आनंदित राहतो.

मातापित्रोसेवनाद्धि महत्पुण्यंपृथग्नतु ॥
दिनंदिनंप्रतिकृतंकोटियज्ञफलप्रदं ॥

आईबापांच्या सेवेसारखें दुसरें थोर पुण्य नसून प्रतिदिवशीं सेवा केल्यानें कोटि यज्ञाचें फल प्राप्त होतें.

काशीप्रदक्षिणालक्षद्वयंयत्पुण्यदंभवेत्॥

तिस्रः प्रदक्षिणा भूम्याः प्रपद्धंतिचयत्फलं ॥
एको मातुर्नमस्कारस्तत्फलंदिशति ध्रुवं ॥
मातापित्रोः सेवकोयस्तस्यज्ञानं भवत्यलं॥

काशीक्षेत्रास दोन लक्ष प्रदक्षिणा आणि पृथिवीस तीन लक्ष प्रदक्षिणा केल्यानें जें पुण्य प्राप्त होतें तेंच मातापित्याची सेवा करणारास प्रतिदिवशीं प्राप्त होतें. तसेंच पित्याची सेवा करणारास आत्मज्ञान प्राप्त होतें.

मातापित्रोर्निंदकोयश्चांडालंतंविदुर्बुधाः॥
नरके वसतिस्तस्यपातित्यंसर्वदा भवेत् ॥

मातापित्याची निंदा करणारा परम चांडाळ आणि दुराचारी असून त्याला मरणांतीं अघोर नरकाची प्राप्ति होते.

योमातरं निंदयति व्याधितः प्रतिजन्मसः॥
पिशाचतां प्राप्नुयात्सयः पितुर्विंदकोनरः॥

मातेची निंदा करणारास जन्मोजन्मीं व्याधि प्राप्त होते व पित्याची निंदाकरणारास पिशाच्य योनि

प्राप्त होते.

माभूतस्पक्वचित्स्पर्शः नीत्वातंपीडयेद्यमः ॥
कुंभीपाकादिनरकसमूहे पातयिष्यति ॥
भवेभवेअपयशानयशः प्राप्नुयात्क्वचित् ॥
अल्पायुश्चभवेत्सद्योमातापितृविबाधनात् ॥

मातापित्याची निंदा करणारास अंतीं यमाची जांचणी होते. त्याला यशाची प्राप्ति न होतांजन्मो जन्मीं अपयश येतें. तो अल्पायु होतो. म्हणून त्याचा विटाळ देखील आपणास होऊंदेऊं नये.

येणेंप्रमाणें मातापितरांची सेवा उत्तम फल देणारी असून ती न केल्यास फारच दुःख होतें. यासाठीं ती अत्यंत अवश्यकतेनें आणि यत्नानें होईल तितकी करावी म्हणजे तोच कित्ता पुढें आपल्या पुत्रादिकांस होऊन ते आपली सेवा करतील.

आयुः पुमान्यशः स्वर्गं कीर्तिंपुष्टिं बलंश्रियम् ॥
पशुंसुखं धनंधान्यं प्राप्नुयात् पितृवंदनात् ॥

" आयुष्य, यश, स्वर्ग, कीर्ति, आरोग्य, बल, भाग्य, पशु, सौख्य आणि धन धान्य " इतक्या गोष्टी

पितृवंदनानें प्राप्त होतात असें सुमंतऋषीनें सांगितलें असून त्याप्रमाणें प्रतिदिनीं मुखमार्जनानंतर वंदन करण्याविषयीं नित्याचारांत लिहिलें आहे. तसेंच हरएक महत्वाचे कामीं, गांवास व कामावर जातांना आणि घरीं आल्यावर मातापितरांस भक्तिपुरस्सर वंदन करीत असावें. ॥ ७ ॥ ७

## ॥ नित्याचार अनुक्रमणिका ॥

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १९९ | मातामहश्राद्धाविषयीं | ९३ | २०१ | श्राद्धाचें शेषान्न भक्ष- | | २०२ | श्राद्धाचें फल | ९४ |
| २०० | विभक्ताविभक्त श्राद्धनि० | ९३ | | णाविषयीं | ९३ | | | |

॥ इतिनित्याचार अनुक्रमणिकासमाप्तं ॥

॥ श्रीगणेशायनमः ॥     ॥ अथनित्याचारप्रारंभः ॥     ( दिनचर्या )

प्रथम सामान्य नियमाच्या वर्तनांत मनुष्यांनीं एकंदर आपल्या आयुष्य कालांत सौख्यप्राप्तीचें असें नेहमीं सामान्य वर्तन कसें ठेवावें हें ज्ञात्यांच्या उक्तीनें सारांश सांगून, आतां या ठिकाणीं नित्याचार (रोजचा विधि) कालमानास अनुसरून सप्रमाण ह्मणजे ज्ञात्यांच्या उक्तींनीं सांगण्याचें योजिलें आहे. येथें जीं समंत्रक कर्में आहेत तीं शाखापरत्वें ज्या त्या सूत्रास अनुसरून असल्यानें न देतां सरळविधि सर्वांस सारखा आहे, तोच सारांशानें येथें दिला आहे.

## ॥ धर्मपर नित्याचाराची अवश्यकता ॥

॥ सर्वागमानामाचारः प्रथमं परिकल्पते ॥

॥ आचारप्रभवो धर्मो धर्मस्य प्रभुरच्युतः ॥ वि०

श्रुतिस्मृति पुराणाचें सार जें आहे, त्यास आचार ह्मणतात, आणि आचार हाच प्रथम धर्म आहे. धर्माचा प्रभु (मालक) अच्युत (ईश्वर) होय. अर्थात् धर्माप्रमाणें वागलें ह्मणजे सर्वसत्तात्मक ईश्वर त्याचें सौख्यरूप फळ देतो.

॥ धर्मेण हरते व्याधिं धर्मेण हरते ग्रहान् ॥

॥ धर्मेण हरते शत्रुं यतो धर्मस्ततोजयः ॥ स्मृ. ( अर्थ उघड आहे )

## ॥ उषःकाळीं उठणें ॥

॥ ब्राह्मे मुहूर्ते बुध्येत स्वस्थो रक्षार्थमायुषः ॥
॥ तत्र सर्वाघशांत्यर्थं स्मरन्नमधुसूदनम् ॥
॥ शयनादुत्थितो यस्तु कीर्तयेन्मधुसूदनम् ॥
॥ कीर्तनात्तस्य पापानि नाशमायांत्यशेषतः ॥

ब्राह्ममुहूर्त ह्मणजे पाहटच्या चार घटका रात्रीं मनुष्यानें उठून आयुष्याच्या रक्षणार्थ व संपूर्ण पातकाच्या नाशार्थ मधुदैत्याचा शत्रु जो विष्णु त्याचें स्मरण करावें. कारण निजून उठल्यावर विष्णूचें नामसंकीर्तन केल्यानें सर्व पातकाचा नाश होतो. ( वैद्यशास्त्रांतही प्रातःकाळीं प्राणवायु शुद्ध असतो ह्मणून सांगितलें आहे यासाठीं उषःकाळीं अगदीं निजण्याचें करूं नये )

## ॥ करदर्शन ॥

॥ कराग्रे वसते लक्ष्मीः करमूले सरस्वती ॥
॥ करमध्ये च गोविंदः प्रभाते करदर्शनम् ॥

निजून उठल्यावर आपले दोन्ही हात एकमेकांस चोळून डोळ्यांस लावावें. त्या योगानें निद्रा भ-
गदीं जाते. हस्ताचे अग्रभागीं लक्ष्मी, मूलाचे ठिकाणीं सरस्वती आणि मध्यभागी गोविंद यांचा
वास असल्यानें त्यांच्या दर्शनासाठीं हस्तावलोकन करावें.

## ॥विष्णूची प्रार्थना॥

॥त्रैलोक्यचैतन्यमयादिदेव। श्रीनाथविष्णोभवदाज्ञयैव॥
॥प्रातःसमुत्थायतवप्रियार्थं। संसारयात्रामनुवर्तयिष्ये॥
॥सुप्तःप्रबोधितोविष्णो। हृषीकेशेनयत्वया॥
॥यद्यत्कारयतेकर्म। तत्करोमितवाज्ञया॥

त्रैलोक्यचैतन्यव्यापक असा जो तूं आदि देव हे श्रीनाथ, हे विष्णो, हे हृषीकेश तुझ्या आ-
ज्ञेनेंच तुझ्या प्रीतीकरितां प्रातःकाळीं उठून संसारसंबंधीं कृत्यें मी करितों; तसेंच मी निजून उठ-
ल्यावर तूं जें जें मजकडून कर्म करवितो तें तें मी तुझ्याच आज्ञेनें करितों.

## परमेश्वराचीव्यापकता, भक्ति, कलीचा सद्गुण, नामाचें महात्म्य, ध्यान, स्मरण आणि वंदन याविषयीं निरूपण

भूजलतेजसमीरख रविशशिकाष्ठांतरीं असे भरला॥ स्थिरचरव्यापुनिसर्वैहि जगदात्मातो दशांगुलें उरला॥ परमेश्वर पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश, चंद्र, सूर्य, दिशा स्थावर, जंगम सर्वकांहीं व्यापून अनंतपणानें स्वरूपीं उरलाच आहे. परंतु दंतिनिदारुविकारे दारुतिरोभवतिसोपितत्रैव॥ जगतितथापरमात्मा परमात्मन्यपिजगत्तिरोधत्ते॥ लांकडाच्या हत्तीस हत्ती आहे अशा दर्शनें पाहणारास हत्ती दिसतो, लांकूड दिसत नाहीं. आणि तोच हत्ती लांकूड या दर्शनें पाहिल्यावर लांकूड दिसतें. तद्वत ज्याची दृष्टि हत्ती सारख्या या कृत्रिमीजगतावर (वस्तुनिर्देश) च आहे, त्याला परमात्मा त्यासच (जगतास) व्यापक असूनही दिसत नाहीं. ज्ञाते आत्मानात्म विचारकरून सर्वत्र परमात्म्याची व्याप्ती आहे असें जाणतात मग त्यास हें मायिक जगमुळींच न दिसतां सर्व कायतें एक ईश्वर आहे असेंच दिसतें. आतां असा जो अतर्क्य आणि अनंत शक्तिमान परमेश्वर तो भक्तिविनावशनोहे वीण्यानें वा मृदंगनादानें॥ कन्यादानफलातें पावेकेसा मृदंगनादानें॥ मातीची पुतळी करून कन्यादान केलें असतां जसें खरें कन्यादान होत नाहीं, तद्वत विण्यानें किंवा मृदंगानें परमेश्वर साध्य होत नाहीं. तर भक्तिप्रियःश्रीपत्तिः केवळ भक्तीनेंच होतो. असा अनेक प्रमाणांनीं सिद्धांत आहे. तसेंच हल्लीं कलीयुग आहे यासाठीं

कलेर्दोषनिधेराजन् अस्तिह्येकोमहान्गुणः॥ कीर्तनादेवकृष्णस्य मुक्तबंधःप
रिव्रजेत्॥ कली दोषाचा सागर होय. परंतु त्यांत एक मोठा सद्गुण हा आहे कीं, परमेश्वराच्या नामस्म
रणानें प्राणी लौकर मुक्त होतो. आणि नाम्नोस्तियावतीशक्तिः पापनिर्हरणे हरेः॥ ताव-
त्कर्तुंनशक्नोति पातकंपातकीजनः॥ पातकाचा नाश करण्याविषयीं हरीच्या नामामध्यें जि
तकी शक्ति आहे तितकी शक्ति पापीजनाला पातक करण्याविषयीं नाहीं; तरी ईश्वराच्या नवविधाभ-
क्तींत कलीमध्यें नामस्मरण भक्तीच फारश्रेष्ठ आणि त्वरित फलदायक व कल्याणकारक आहे. यासा-
ठीं या ग्रंथांत नामस्मरणाचीच स्तोत्रें वगैरे मुख्यत्वें विशेष घेतलीं आहेत. आलोड्यसर्वशा-
स्त्राणिविचार्यैवंपुनःपुनः॥ इदमेकंसुनिष्पन्नं ध्येयोनारायणःसदा॥ व्यासांनींसर्व
शास्त्रें वेळोवेळीं पाहतां त्यांत एकच चांगलें निष्पन्न झालें तें हें कीं, परमात्मा जो नारायण त्याचें सर्व
काल ध्यान करावें. तसेंच मंत्रमध्यें क्रियामध्यें विष्णुस्मरणपूर्वकं॥ यत्किंचित्क्रिय
तेकर्म तत्कर्मसफलंभवेत्॥ मंत्रामध्यें, क्रियामध्यें, विष्णुस्मरण करावें म्हणजे थोडेंज-
री कर्म केलें तरी तें सफल होतें. आणि यस्यस्मृत्याचनामोक्त्या तपोयज्ञक्रियादिषु॥
न्यूनंसंपूर्णतांयातिसद्योवंदेतमच्युतं॥ तपश्चर्या, यज्ञयागादिक सर्व कर्में यांमध्यें जें

कांहीं न्यून होतें तें सनातन जो विष्णु त्याचे स्मरणानें व नामोच्चार मात्रानें आणि वंदनानें (नमस्कारानें) परिपूर्ण होतें. यासाठीं हरएक नित्य व नैमित्यक विधि (कर्में) श्रद्धेनें (अत्यंत भक्तीनें) परमेश्वराचें वारंवार आणि कर्माचे अंतीं ध्यान (स्मरण) नामोच्चार आणि वंदनपूर्वक केल्यावर त्याच्या कृपेनें तें कर्म पूर्ण घडून निश्चयानें फलद्रुप होईल.

## ॥अथ प्रातःस्मरण प्रारंभः॥

॥श्रीगणेशायनमः॥ नामस्मरणस्तोत्राणी॥ वक्रतुंड महाकाय सूर्यकोटिसमप्रभ॥ निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा॥१॥ गणनाथःसरस्वती रविःशुक्रो ब्रहस्पतिः॥ पंचैतानिस्मरेन्नित्यं वेदवाणीप्रवर्तते॥२॥ गुरुर्ब्रम्हा गुरुर्विष्णु गुरुर्देवो महेश्वरः॥ गुरुःसाक्षात्परब्रम्ह तस्मैश्रीगुरवेनमः॥३॥ नारायणं नमस्कृत्य नरंचैव नरोत्तमं॥ देवीं सरस्वतींचैव ततो जयमुदीरयेत्॥४॥ मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरीन्॥ यत्कृपा तमहं वंदे परमानंद माधवम्॥५॥ अच्युतं केशवं रामनारायणं कृष्ण दामोदरं वासुदेवं हरिम्॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे॥६॥ यज्ञेशाच्युत गोविंद माधवानंतकेशव॥ कृ

ष्णविष्णोहृषीकेश वासुदेव नमोस्तुते ॥ ७ ॥ कृष्णं कमलपत्राक्षं पुण्यश्रवणकीर्तनम् ॥ वासुदेवं जगद्योनिं नौमि नारायणं हरिम् ॥ ८ ॥ गोविंद गोविंद हरे मुरारे गोविंद गोविंद रथांगपाणे ॥ गोविंद गोविंद मुकुंद कृष्ण गोविंद गोविंद नमो नमस्ते ॥ ९ ॥ कृष्णाय वासुदेवाय हरये परमात्मने ॥ प्रणतक्लेशनाशाय गोविंदाय नमोनमः ॥ १० ॥ नमोस्त्वनंताय सहस्रमूर्तये सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे ॥ सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्रकोटी युगधारिणे नमः ॥ ११ ॥ ॥ ७ ॥

नारद उवाच ॥ ॐ वासुदेवं हृषीकेशं वामनं जलशायिनं ॥ जनार्दनं हरिं कृष्णं श्रीवक्षं गरुडध्वजं ॥ १ ॥ वाराहं पुण्डरीकाक्षं नृसिंहं नरकान्तकं ॥ अव्यक्तं शाश्वतं विष्णुमनंतमजमव्ययम् ॥ २ ॥ नारायणं गदाध्यक्षं गोविंदं कीर्तिभाजनं ॥ गोवर्धनोद्धरं देवं भूधरं भुवनेश्वरं ॥ ३ ॥ वेत्तारं यज्ञपुरुषं यज्ञेशं यज्ञवाहकं ॥ चक्रपाणिं गदापाणिं शंखपाणिं नरोत्तमं ॥ ४ ॥ वैकुंठं दुष्टदमनं भूगर्भं पीतवाससं ॥ त्रिविक्रमं त्रिकालज्ञं त्रिमूर्तिं नंदकेश्वरं ॥ ५ ॥ रामं रामं हयग्रीवं भीमं रौद्रं भवोद्भवं ॥ श्रीपतिं श्रीधरं श्रीशं मंगलं मंगलायुधं ॥ ६ ॥ दामोदरं दमोपे

तं केशवंकेशिसूदनं ॥ वरेण्यंवरदं विष्णुमानंदं वसुदेवजं ॥७॥ हिरण्यरेत सं-
दीप्तं पुराणं पुरुषोत्तमं ॥ सकलंनिष्कलंशुद्धं निर्गुणंगुणशाश्वतम् ॥८॥ हिर-
ण्य तनुसंकाशं सूर्यायुतसमप्रभं ॥ मेघश्यामंचतुर्बाहुं कुशलं कमलेक्षणं ॥
९॥ ज्योतीरूपमरूपंच स्वरूपंरूप संस्थितं ॥ सर्वज्ञंसर्वरूपस्थसर्वेशंसर्वतोमुखं
॥१०॥ ज्ञानंकूटस्थमचलं ज्ञानदं परमंप्रभुं ॥ योगीशं योगनिष्णातं योगिनं योग
रूपिणं॥ ११॥ ईश्वरं सर्वभूतानां वंदेभूतमयंप्रभुं ॥ इतिनामशतंदिव्यं वैष्णवंख
लुपापहं ॥१२॥ व्यासेन कथितंपूर्वंसर्वपापप्रणाशनं ॥ यःपठेत्प्रातरुत्थायसंभवे
द्वैष्णवोनरः ॥१३॥ सर्वपापविशुद्धात्माविष्णुसायुज्य माप्नुयात् ॥ चांद्रायण सह-
स्त्राणि कन्यादानशतानिच ॥१४॥ गवांलक्षसहस्त्राणि मुक्तिभागीभवेन्नरः ॥
अश्वमेधायुतंपुण्यं फलंप्राप्नोतिमानवः ॥१५॥ इतिश्रीविष्णुपुराणे विष्णुशतना
मस्तोत्रंसंपूर्णम्॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥

ब्रम्हामुरारिस्त्रिपुरान्तकारी भानुःशशीभूमिसुतोबुधश्च । गुरुश्चशुक्रःशनिराहु
केतवःकुर्वन्तुसर्वेमम सुप्रभातम् ॥१॥ भृगुर्वसिष्ठःक्रतुरङ्गिराश्चमनुःपुलस्त्यः

पुलहश्चगोनमः ॥ रैभ्यो मरीचिश्च्यवनश्च दक्षः कुर्वंतु सर्वे मम सुप्रभातम् ॥ २ ॥
सनत्कुमारः सनकः सनंदनः सनातनोऽप्यासुरिपिंगलौच ॥ सप्तस्वराः सप्तरसातला-
नि कुर्वंतु सर्वे मम सुप्रभातम् ॥ ३ ॥ सप्तार्णवाः सप्तकुलाचलाश्च सप्तर्षयो द्वीप-
वनानि सप्त ॥ भूरादिकृत्वा भुवनानि सप्त कुर्वंतु सर्वे मम सुप्रभातम् ॥ ४ ॥ पृथ्वी
सगंधा सरसास्तथापः स्पर्शी च वायुर्ज्वलनं च तेजः ॥ नभः सशब्दं महता सहै
व कुर्वंतु सर्वे मम सुप्रभातम् ॥ ५ ॥ इत्थं प्रभाते परमं पवित्रं पठेत्स्मरेद्वा शृणु
याच्च नित्यम् ॥ दुःस्वप्ननाशस्त्विह सुप्रभातं भवेच्च नित्यं भगवत्प्रसादात् ॥ ६ ॥

हरिं हरं हरिश्चंद्रं हनूमंतं हलायुधम् ॥ एतेषां स्मरणात्प्रातर्हानिस्तस्य न बा-
ध्यते ॥ १ ॥ सोमनाथं वैजनाथं धन्वंतरिमथाश्विनौ ॥ एतेषां स्मरणात्प्रातर्व्याधि
स्तस्य न बाध्यते ॥ १ ॥ अनंतं वासुकिं शेषं पद्मनाभं च कंबलम् ॥ शंखपालं धृ-
तराष्ट्रं तक्षकं कालियं तथा ॥ १ ॥ एतानि नवनामानि नागानां च महात्मनाम् ॥
सायंकाले पठेन्नित्यं प्रातःकाले विशेषतः ॥ तस्य विषभयं नास्ति सर्वत्र विजयी
भवेत् ॥ २ ॥ रामं स्कन्दं हनूमंतं वैनतेयं वृकोदरम् ॥ एतेषां स्मरणात्प्रातर्मै

बबाधानबाध्यते ॥ २ ॥ आदित्यश्च उपेन्द्रश्च चक्रपाणिमहेश्वरः ॥ दंडपाणिः
प्रतापीस्यात्सुद्बाधानबाध्यते ॥ २ ॥ वसुर्वरुणसोमौच सरस्वतीच सागरः ॥
एतेषांस्मरणात्प्रातर्नृषाबाधानबाध्यते ॥ २ ॥ सनत्कुमार देवर्षि शुक भीष्म प्लव
ङ्गमाः ॥ एतेषांस्मरणात्प्रातर्कामस्तस्य नबाध्यते ॥ २ ॥ रामलक्ष्मणौसीता
च सुग्रीवो हनुमान् कपिः ॥ एतेषांस्मरणात्प्रातर्महाबाधानबाध्यते ॥ २ ॥
महाभारतव्याख्यातं सितिं गांच सरस्वतीं ॥ ब्रम्हाणं केशवं चैव कीर्तयेन्ना
वसीदति ॥ २ ॥ व्यासंबिभीषणंभीष्मं यमंरामं दमंबलिं ॥ सप्तैतानिस्मरेन्नित्यं
ध्रुवं दुःखं प्रणश्यति ॥ २ ॥ शिवहरशंकर गौरीशं वंदे गंगाधरमीशं ॥ रुद्रं पशु
पतिमीशानं कलये काशीपुरनाथं ॥ १ ॥ हेतवे जगतामेव संसारार्णवसेतवे ॥
प्रभवे सर्वविद्यानां शंभवे गुरवे नमः ॥ २ ॥ विश्वेश्वर विरूपाक्ष विश्वरूपसदा
शिव ॥ शरणं भव भूतेश करुणाकर शंकर ॥ ३ ॥ हर शंभो महादेव विश्वेशाम
रवल्लभ ॥ शिवशंकर सर्वात्मन्नीलकंठ नमोस्तुते ॥ ४ ॥ मृत्युंजयाय रुद्राय
नीलकंठाय शंभवे ॥ अमृतेशाय शर्वाय महादेवाय तेनमः ॥ ५ ॥ एतानिशि

व नामानि यःपठेत्प्रयतःसकृत् ॥ नास्ति मृत्युभयंतस्य पापरोगादिकिंचन ॥६॥
सौराष्ट्रे सोमनाथंच श्रीशैले मल्लिकार्जुनम् ॥ उज्जयिन्यां महाकालमोंकारम-
मलेश्वरम् ॥१॥ पर्यल्यां वैजनाथंच डाकिन्यां भीमशंकरम् ॥ सेतुबंधे तुरामे
शं नागेशं दारुकावने ॥२॥ वाराणस्यां तु विश्वेशं त्र्यंबकं गौतमीतटे ॥ हिमा
लये तु केदारं घृष्णेशं तु शिवालये ॥३॥ एतानिज्योतिर्लिंगानि प्रातरुत्थाय
यःपठेत् ॥ ब्रम्हहत्यादिकं तस्य नश्यत्येव नसंशयः ॥४॥ ॥७॥ ॥६॥

पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः ॥ पुण्यश्लोकाच वैदेही
पुण्यश्लोकोजनार्दनः ॥१॥ कर्कोटकस्य नागस्य दमयंत्या नलस्यच ॥ ऋतु
पर्णस्य राजर्षेः कीर्तनं कलिनाशनम् ॥२॥ अश्वत्थामा बलिर्व्यासो हनूमां
श्च बिभीषणः ॥ कृपः परशुरामश्च सप्तैते चिरजीविनः ॥३॥ सप्तैतान्संस्मरे
न्नित्यं मार्कंडेयमथाष्टमम् ॥ जीवेद्वर्षशतं साग्रमपमृत्युविवर्जितः ॥४॥ अ-
हल्याद्रौपदी सीता तारा मंदोदरीतथा ॥ पंचैतानि स्मरेन्नित्यं महापातक
नाशनम् ॥५॥ प्रल्हादनारदपराशरपुंडरीकव्यासांबरीषशुकशौनकभीष्म

दाल्भ्यान् ॥ रुक्मांगदार्जुनवसिष्ठविभीषणादीन्पुण्यानिमान्परमभागवता
न्स्मरामि ॥६॥ धर्मो विवर्धति युधिष्ठिरकीर्तनेन पापं प्रणश्यति वृकोदरकी
र्तनेन ॥ शत्रुर्विनश्यति धनंजयकीर्तनेन माद्रीसुतौ कथयतां न भवंतिरोगाः
॥ ७ ॥ बलिर्बिभीषणोभीष्मः प्रल्हादो नारदो ध्रुवः ॥ षडेते वैष्णवाः प्रोक्ताः
स्मरणं पापनाशनम् ॥८॥ वाराणस्या दक्षिणेऽगे कुक्कुटो नामवैद्विजः ॥ त-
स्यस्मरणमात्रेण दुःस्वप्नः सुस्वप्नो भवेत् ॥१॥ वाराणस्या वामभागे सुमंतुर्नाम
वैद्विजः ॥ तस्यस्मरणमात्रेण निर्धनो धनवान्भवेत् ॥२॥ वाराणस्याः पूर्वभागे
वसिष्ठो नाम वैद्विजः ॥ तस्यस्मरणमात्रेण अयोगो योगवान् भवेत् ॥ ३ ॥वा-
राणस्याः पश्चिमेंगे गौतमो नाम वैद्विजः तस्यस्मरणमात्रेण अज्ञानो
ज्ञानवान् भवेत् ॥४॥ विश्वेशंमाधवंढुंढिंदंडपाणिंच भैरवम् ॥ वंदे काशीं गुहां
गंगां भवानीं मणिकर्णिकाम् ॥५॥ काश्यां तु भैरवो देवः संसारभयनाशकः ॥
अनेकजन्मकृत्पापं स्मरणेन विनश्यति ॥ ६॥ काशिकाशीति काशीति त्रिवा
रं यः पठेन्नरः ॥ सोऽपि देशांतरेवासी काशीवासफलं लभेत् ॥७॥ जानाम्य

धर्मं नचमे प्रवृत्तिर्जानाम्य धर्मं नचमेनिवृत्तिः॥ त्वयादिदेवेनहृदिस्थितेन यथानियुक्तोऽस्मितथाकरोमि॥ १॥ हरेराम हरेरामरामरामहरेहरे॥ हरेकृष्णहरेकृष्णकृष्ण कृष्ण हरेहरे ॥ १॥ समुद्रवसनेदेवि पर्वतस्तन मंडले॥ विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्वमे॥ १॥ ॥ ७॥ ॥ ७॥

या प्रमाणें प्रातःस्मरणालाउक्त अशीं निवडक नामस्तोत्रें घेतलीं आहेत. यांतून ज्यांना जशी सवड असेल तितकेच परंतु भक्तिपुरस्सर पठण करावें. दरम्यान जो ( **निरूपण** ) प्रकार घातला आहे, हा फक्त ईश्वर धर्माचा मुख्य मालक ( धर्माचा भोक्ता आणि फल देणारा ) असल्यानें हर एक विधि ( कर्म ) परमेश्वराचें ध्यान, स्मरण, नामोच्चारण, आणि वंदन पूर्वक केल्यानें तें कर्म पूर्ण घडून फलद्रूप होतें; हें स्पष्ट ध्यानीं येण्यास घातला आहे.

प्रातःस्मरणाचे वेळीं प्रथम **उत्थाय नेत्रे प्रक्षाल्य शुचिर्भूत्वासमाहितः॥ मुखशुद्ध्यर्थमादौतु गण्डूषत्रितियंचरेत॥ १॥ गंगेचदक्षिणेश्रोत्रे नासिकायां हुताशनः॥ उभयोस्पर्शनेचैव तत्क्षणादेहशुद्धति॥ २॥** डोळ्यांस पाणी लावून तीन गुळण्या टाकाव्या आणि ब्राम्हणाच्या उजवे कानाचे ठिकाणीं गंगा असून उजवे नाकाचे

ठिकाणीं अग्नीचा वास आहे. या साठीं उभय ठिकाणीं उजवे हातानें स्पर्श केल्यानें देहाची शुद्धता होते. सबब त्याप्रमाणें करून पश्चात प्रातःस्मरण करावें.

**मुत्रपुरीषोत्सर्ग** ( मलत्याग आणि लघ्वी ) याची त्वरा झाल्यास अवरोध न करितां शौच्य मुखमार्जनानंतरही प्रातःस्मरण करावें.

अंथरूण सोडण्याचे वेळीं **समुद्रवस०** या मंत्रानें भूमीची प्रार्थना करून नमस्कार करावा आणि नंतर भूमीवर पाय ठेवावा.

## ॥ प्रातःकाळीं दर्शनास योग्य पदार्थ ॥

**॥ लोकेस्मिन्मंगलान्यष्टौ ब्राम्हणो गौ र्हुताशनः ॥ हिरण्यं सर्पिरादित्य आपो राजा तथाष्टमः ॥१॥ दध्याज्यादर्शसिद्धार्थ बिल्वगोरोचनस्रजम्। वाजिवारण गोविप्र हरिद्राशतपर्वणाम् ॥** प्रातःकाळीं ब्राम्हण, गाय, अग्नि, सोनें, तूप सूर्य, उदक, राजा, दही, ,अरसा, पांढऱ्या मोहऱ्या, बेल, गोरोचन, फुलें, घोडा, हत्ती, हळदी, बांस, दूर्वा इत्यादि वस्तु दर्शनास आणि स्पर्शनास शुभ होत.

## ॥ प्रातःकाळीं दर्शनास वर्ज पदार्थ ॥

॥पापिष्ठं दुर्भगं चान्धं नग्नमुत्कृत्तनासिकम् । प्रातरुत्थाय यः पश्येत्तत्कलेरुपलक्षणम् ॥ भल्लातकं कर्षफलं काकमार्जारमूषकान् । क्लीबं च गर्दभं चैव न पश्येत्प्रातरेवहि ॥ पापी, दुर्दैवी, अन्ध, नग्न, नासिकारहित (नकटें) इत्यादि प्रत्यक्ष कलीरूप आहेत म्हणून हे व त्याच प्रमाणें भिलांवा, बेहडा, कावळा, मांजर, उंदीर, नपूंसक, गाढव इत्नें प्रातःकाळीं दर्शन अशुभ होय.

॥दर्पणावलोकन॥ (आरसा पाहणें)

॥आदर्शालोकनं प्रोक्तं मांगल्यं कांतिकारकं ॥ पौष्टिकं बल्यमायुष्यं पापालक्ष्मीविनाशनं ॥ लाघवं कर्मसामर्थ्यं विभक्तघनगात्रता ॥ प्रातःकाळीं आरशांत मुख पहावें तें मंगल, कांति, पुष्टी, बल, आयुष्य यांना देणारें व पाप आणि दारिद्र्य यांचा नाश करतें; आणि त्यापासून शरीराला लाघव, कर्म करण्यास सामर्थ्य, व गात्रांना पुष्टिही होतात.

॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

॥ अथ शौच्य मुखमार्जनविधि प्रारंभः ॥

## ॥ मलत्याग ॥

॥ आयुष्यमुषसि प्रोक्तं मलादीनां विसर्जनं ॥
॥ तदंत्रकूजनाध्मानोदरगौरव वारणं ॥
॥ आटोपशूलोपरिकर्तिकाच संगःपुरीषस्य तथोर्ध्ववातः ॥
॥ पुरीषमास्यादथवानिरेति पुरीषवेगेभिहतेनरस्य ॥
॥ वातमूत्रपुरीषाणां संगोऽध्मानं क्लमोरुजा ॥
॥ जठरे वातजाश्चान्येरोगाःस्युर्वेगनिग्रहात् ॥

प्रातःकाळीं उठून मळमूत्र यांचें विसर्जन केलें असतां आयुष्य वाढतें, आणि आंतड्यांत वायूचा शब्द, पोटाला फुगवटी, व पोटाचा जडपणा यांचा नाश होतो. याच्या वेगाचा रोध केला असतां पोटांत गुडगुड शब्द, शूल, कापलेल्या सारखी पीडा, मलरोध, उद्गारबाहुल्य, अथवा मुखावाटें मलाचें निर्गमन आणि वायु, मूत्र, मळ यांचा रोध, आध्मान, ग्लानि, पोटशूल आणि वायूचे दुसरे अनेक उपद्रव होतात.

## ॥मूत्राच्यारोधाचे गुण॥

बस्तिमेह नयो. शूलं मूत्रकृच्छ्रं शिरोरुजा ॥
विनामोवंक्षणानाहः स्याल्लिंग मूत्रनिग्रहे ॥
नवेगितोऽन्यकार्यःस्यान्नवेगान्निरयेद्बलात् ॥
कामशोकभयक्रोधान्मनोवेगान्विधारयेत् ॥

मूत्रवेगाचा निग्रह केला असतां बस्ति व मार्ग यांच्या ठायीं शूल, मूत्रकृच्छ्र, मस्तकशूल, शरीराला वांकविणें, आणि बंद होण्याच्या जाग्यास ओढल्या सारखी पीडा हीं लक्षणें होतात; या करितां मूत्राचा वेग आला असतां दुसरें कांहीं काम करूं नये. आणि साहजिक होत नसतां कुंथून मलमूत्र करूं नये. व काम, शोक, भय, क्रोध, ह्या मनाच्या वेगांचा रोध करावा.

## ॥शौच्यविधि॥

अंतर्धाय तृणै र्भूमिं शिरः प्रावृत्य वाससा ॥
वाचं नियम्य यत्नेन निष्ठीवोच्छ्वासवर्जितः॥१॥
कुर्यान्मूत्रपुरीषे तु शुचौ देशे समाहितः ॥

इत्यंगिरसोक्तविधिनादिवासंध्यासुउदङ्मुखः॥
कुर्यान्मूत्रपुरीषेतु रात्रौचेद्दक्षिणामुखः॥

भूमीवर गवत घालून वस्त्रानें डोकें गुंडाळून, नाक व तोंड झांकून मलविसर्जन करावा. मलविसर्जन करण्याची जागा स्वच्छ असून अंतःकरण स्वस्थ असावें. मूत्रविसर्जन समयीं ही असेंच करावें. शौच्यास बसावयाचें तें दिवसां व संध्याकाळीं उत्तराभिमूख व रात्री दक्षिणाभिमूख बसावें.

सांप्रतकाळीं शौच्य कुपाची सोय घरोघर आहे. वरील प्रकार शास्त्रोक्तरीतीनें थोडक्यांत दिला आहे, तथापि शौच्यकुपाचे ठिकाणची जागा स्वच्छ राखणें इ० वरील नजवीज होईल तितकी करावी.

## ॥हस्तपादप्रक्षालन॥

यावत्साध्विति मन्येत तावच्छौचंविधीयते॥
प्रक्षालनं मृदापाण्योः पादयोः शुद्धिकारकं॥
मलश्रमहरंवृष्यंचक्षुष्यंराक्षसापहं॥

हस्तपादादिकांस मृत्तिका लावण्याचे अनेक नियम आहेत. परंतु मुख्य घाण जाईपावेतों हातापायांस माती लावून धुवावें म्हणजे शुद्ध होतात. आणि त्यापासून मल, श्रम, राक्षसबाधा यांचा

नाश होतो व वृष्य (धातुवृद्धि) आणि नेत्राला हितावह आहे.

## ॥ मुखप्रक्षालन ॥

भक्षयेद्दंतपवनं द्वादशांगुलमायतं ॥ कनिष्ठिकाग्रवत्स्थूलमृज्वग्रंथितधाव्रणं
एकैकं घर्षयेद्दंतं मृदुनाकूर्चकेनतु ॥ दंतशोधनचूर्णेनदंतमांसानबाधयन् ॥ १ ॥
क्षौद्रत्रिकटुकाक्तेन तैलसिंधुभवेनवा ॥ चूर्णेनतेजोवत्याश्चदंतान्नित्यंविशोधयेत्
मधूकोमधुरेश्रेष्टः करंजःकटुकेतथा ॥ निंबःस्यात्तिक्तकेश्रेष्ठः कषायेखदिरस्तथा ॥
समयंचसमालोक्य दोषंच प्रकृतिंतथा ॥ यथोचितैरसैर्वीर्यैर्युक्तंद्रव्यंप्रयोजयेत ॥

दंत धुण्याचें काष्ठ बारा आंगळें लांब, करांगुलीच्या आग्राइतकें बारीक, सरळ असून त्याला पेरी नसावी. व किडकें वगैरे नसावें. त्याकाष्ठाला चावून पुढें कुंचासारखें करून त्यानें हळू हळू एकेक दांत घासावा; व दंतशोधन चूर्णांनीं दंतमांसाला (हिरडया) पीडा दिल्यावांचून हळू घासावें. आणि मध, सुंठ, मिरीं, पिंपळी, तेल, सैंधव यांच्या चूर्णानें अथवा तेजबळान्या चूर्णानें दंतशोधन करावें. व दंतकाष्ठ मधुरवृक्षांत मोह, तिखटद्रव्यांमध्यें करंज, कडूद्रव्यांमध्यें निंब, आणि तुरटा मध्यें खेर श्रेष्ठ जाणावा. यांतून समय, दोष, प्रकृति हीं पाहून येथोचित रसवीर्यांनीं युक्त असें काष्ठ योजावें.

## ॥ दंतधावन काष्ठाचे गुण ॥

अर्केवीर्यंवटेदीप्तिः करंजेविजयोभवेत्॥ प्लुक्षेचैवार्थसंपत्तिर्बदर्यांमधुरो ध्वनिः॥
खदिरे मुखसौगंध्यंबिल्वेतुविपुलंधनं॥ उदंबरेतुवाक्सिद्धिराम्रेचारोग्यमेवच ॥
कदंबेच धृतिर्मेधाचंपकेबलवच्छ्रुतिः॥ शिरीषेकीर्तिसौभाग्येआयुरारोग्यमेवच
आपामार्गेधृतिर्मेधाप्रज्ञाशक्तिस्तथा ध्वनिः॥दाडिम्यांसुंदराकारः ककुभेकुटजेतथा
॥जातीतगरमंदारैर्दुःस्वप्नंचविनश्यति॥ दंतधावन काष्ठ रुईचें असल्यास वीर्य प्राप्त होतें, वडाचें दीप्तिकर, करंजाचें विजय देणारें, पायरीचें अर्थ व संपत्ति देणारें, बदरीचें मधुरध्वनिकर, खैराचें मुखाला सुगंध देणारें, बिल्वकाष्ठानें बहुतद्रव्य प्राप्ति, उंबराचें वाक्‌सिद्धिकर, आम्रकाष्ठानें आरोग्यता, कळंबाच्या काष्ठानें धैर्य व बुद्धि यांची प्राप्ति आणि चांप्याच्या काष्ठानें श्रवणेंद्रिय चांगलें होतें व शिरसाच्या काष्ठानें कीर्ति, सौभाग्य, आयुष्य आरोग्य हीं होतात. आघाडयाच्या काष्ठानें धैर्य, धारणाशक्ति, बुद्धि, व उत्तम ध्वनि, दाडिम, अर्जुन कुडा, यांच्या काष्ठानें शरीराला सुंदरपणा येतो आणि जाई, तगर व मांदार यांच्या काष्ठानें दंतधावन केलें असतां दुःस्वप्नाचा नाश होतो.

## ॥ जीभ घांसण्यास धातूचीपट्टी ॥

जिव्हानिर्लेखनंहेमंराजतंताम्रजंतथा। पाटितं मृदुतत्काष्ठं मृदुपत्रमयंतथा॥

जीभ घांसण्याकरितां, सोनें, रुपें, तांबें, यांची पाती असावी अथवा मृदु लांकडाच्या पट्टीनें किंवा मऊ पानानें जीभ घासावी.

## ॥ गंडूषविधि ॥ ( चूळ भरणें )

गंडूषमथकुर्वीतशीतेनपयसामुहुः॥ कफतृष्णा मलहरं मुखांतःशुद्धिकारकं॥

मुखोष्णोदकगंडूषःकफारुचिमलापहः॥ दंतजाडयहरश्चापिमुखलाघवकारकः॥

दांत घासल्या नंतर थंड पाण्यानें वारंवार चूळ भरून टाकावी. तेणें करून कफ, तहान, व मल हे नाश पावतात. व तोंडाची शुद्धि होते; अथवा कोंबट पाण्यानें चूळ भरली असतां कफ, अरुचि, मल आणि दंत जाड्य यांचा नाश होतो, व तोंड हलकें वाटतें.

धर्मशास्त्र व वैद्यशास्त्रादि अनेक ग्रंथ पाहतां दंतधावन काष्ठानेंच करावें असें सांपडतें. परंतु सांप्रतकाळीं ह्या गोष्टीचा बराच लोप होत चालला आहे. काष्ठानें दंतधावन केल्यानें कोणकोणते लाभ होतात, हें वर दाखविलेंच आहे. हल्लीं व्यवहारामध्यें कित्येक राखेनें, कित्येक मातीनें व कित्येक

भिन्नभिन्न चूर्णानें दंतधावन करीत असल्याचें निदर्शनास येतें. परंतु **निर्गुंडीभस्म लवणं तर्जन्यां दंत धावनं ॥ उष्णोदके नाचमनं तुल्यं गोमांस भक्षणं ॥** राखेनें दांत घासण्या विषयीं शास्त्रानें निषेध केला आहे. आणि राखे पासून उष्णता होऊन दांतांतून रक्त वगैरे जातें, असा बऱ्याच लोकांचा अनुभव असल्यानें ती हितावह ही नाहीं. काळ्या मातीनें दंत धावन करूं नये असें कोठें आढळण्यांत आलें नसून **मृत्तिके हर मे पापं यन्मया दूषितं कृतं ॥ त्वया हते न पापेन सर्वपापैः प्रमुच्यते ॥** मृत्तिका पापहरिणी, दुर्गंधी नाशक आणि थंड असल्यानें नेत्रास व मेंदूस हितावह असल्याचें वैद्यशास्त्रांत आहे आणि मृत्तिकेनें मुखमार्जन करणाऱ्या लोकांचे अनुभवांतही ती अपायकारक नाहीं.

## ॥ मुखप्रक्षालनफल ॥

**तेनास्यगत वैरस्यगंधाजिह्वास्यजागदाः ॥**
**रुचिवैशद्यलघुतानभवंतिभवंतिच ॥**

मुखप्रक्षालनानें तोंडाची अरुचि व दुर्गंध जाऊन जिव्हा आणि मुख या संबंधीं व्याधि होत नाहींत व रुचि, स्वच्छता, लघुता हे गुण होतात.

## ॥ मुखप्रक्षालनास पाणी आणि दिशांचे गुण ॥

मुखप्रक्षालनंशीतपयसारक्तपित्तजित् ॥ मुखस्यपिटिकाशोथनीलिकाव्यंगनाशनं ॥ कुर्याद्वापिकदुष्णेनपयसास्यविशोधनं ॥ कफवातहरंस्निग्धं मुख शोथ विनाशनं ॥ प्राङ्मुखस्य धृतिः सौख्यं शरीरारोग्यमेवच । दक्षिणेन तथा कष्टं पश्चिमेन पराजयः ॥ उत्तरेण गवांनाशं स्त्रीणां परिजनस्यच । पूर्वोत्तरेषु दिग्भागे सर्वान्कामानवाप्नुयात् ॥ शीतोदकानें मुखप्रक्षालन केलें असतां तें रक्तपित्त, तोंडावरच्या पुळया, सूज, नीलिका रोग, वांग यांचानाश करितें. अथवा कोंबट पाण्यानें कफ, वात व मुखशोथ यांचानाश करितें; आणि स्निग्ध आहे. पूर्वेस मुख करून तोंड धुवावें म्हणजे सौख्य आणि शरीरास आरोग्याची प्राप्ति होते. दक्षिणेस मुख केलें असतां कष्टाची प्राप्ति, पश्चिमेस पराजय, उत्तरेस कुटुंब आणि पशूंची हानि, ईशान्यदिशा ही सर्वकामांस प्रशस्त आहे.

## ॥ दंतकाष्ठाची प्रार्थना ॥

आयुर्बलंयशोवर्चः प्रजाःपशुवसूनिच ॥
ब्रम्हप्रज्ञांच मेधांचत्वन्नोदेहिवनस्पते ॥

## ॥ दंतधावनवर्ज ॥

नखादेद्गलताल्वोष्ठजिव्हादंतगदेषुतत्॥ मुखस्यपाकेशोषेचश्वासकासवमीषुच ॥ दुर्बलोऽजीर्णवान् भुक्तोहिक्कामूर्च्छामदान्वितः॥ शिरोरुजार्तस्तृषितः श्रांतःश्यानःक्लमान्वितः ॥ अर्दितीकर्णशूलीचनेत्ररोगीनवज्वरी ॥ वर्जयेद्दंतकाष्ठंच हृदामय युतोपिच॥ प्रतिपद्दर्श षष्ठीषु नवम्यां रविवासरे। दंतानां काष्ठसंयोगो दहत्यासप्तमं कुलम्॥ गळा, ताळु, ओष्ठ, जिव्हा, दंत यांना व्याधि अथवा नोंड येणें व शोष, श्वास, खोकला, वांति. हे विकार व दुर्बल, अजीर्ण झालेला, जेवलेला, उचकी मूर्छा. मद, मस्तकशूल असलेला, तृषित, श्रमलेला, म्लान, विकलेंद्रिय यांनीं व आर्दित वायु, कर्णशूल, नेत्ररोग, नवज्वर, आणि उरांतील व्याधि हे उपद्रव असतां दंतकाष्ठानें दांत घासूं नये. तसेंच प्रतिपदा, अमावास्या, षष्ठी, नवमी, आणि रविवार या दिवशीं दंतधावन करूं नये. प्रकृति दुरस्त असतांना या दिवशीं तर्जनी खेरीज करून बाकीच्या बोटांनीं दंत धावन करावें, असें धर्मसिंधूंत सांगितलें आहे. ॥७॥ ॥७॥ ॥७॥

## ॥ अथ मुखप्रक्षालनोत्तर विधी॥

मुख प्रक्षालनानंतर अपवित्रः पवित्रोवा सर्वावस्थांगतो पिवा ॥ यस्मरेत्पुं-
डरीकाक्षं सबाह्याभ्यंन्तरःशुचिः॥ या मंत्रानें शरीरावर उदकावें मार्जन (शिंचन) क-
रावें; आणि सूर्यास नमस्कार करावा. आदित्यस्य नमस्कारं ये कुर्वन्तिदिनेदिने ॥
जन्मान्तरसहस्त्रेषु दारिद्र्यं नोपजायते ॥ तसेंच तुलसी आणि गाय व मातापित-
र यांस वंदन करावें. ॥ तुलसीवंदन मंत्रः॥ यादृष्टानिखिलाघसंघशमनी स्पृ-
ष्टावपुः पावनी ॥ रोगाणामभि वंदितानिरसनीसिक्तांतकत्रासिनी ॥ प्रत्या-
सत्तिविधायिनी भगवतः कृष्णस्य संरोपिता ॥ न्यस्तातच्चरणे विमुक्ति फ-
लदातस्यै तुलस्यैनमः ॥ हे तुलसी, तुला पहातांच सर्व पातकांचा क्षय होतो. स्पर्शाना-
नें शरीर पवित्र होतें, वंदनानें रोगाचा नाश होतो, पाणी घातल्यानें मृत्यूचें भय दूर होतें, व
कृष्णचरणापाशीं राहणारी आणि मुक्ति देणारी तुला मी नमस्कार करतों. ॥ गोतमी वंदनमंत्र
॥ पृष्ठे ब्रम्हा गले विष्णुर्मुखे रुद्र प्रतिष्ठितः॥ मध्ये देवगणाःसर्वे रोमकूपे म-
हर्षयः ॥ नागाःपुच्छे खुराग्रेषु येचाष्टौकुलपर्वतः॥ मूत्रे गंगादयो नद्यो नेत्र

योशशि भास्करौ ॥ एते यस्यास्तनौ देवाः सा धेनुर्वरदाऽस्तु मे ॥
॥ मातृपितृवंदनमंत्रः ॥ आयुः पुमान्यशः स्वर्गं कीर्तिं पुष्टिं बलं श्रियम् ॥ प-
शुं सुखं धनं धान्यं प्राप्नुयात्पितृवन्दनात् ॥

॥ नारायणस्तुतिः ॥

॥ प्रातः स्मरामि भवभीति महार्तिशान्त्यै नारायणं गरुड वाहनमब्ज नाभम् ।
ग्राहाभिभूत वरवारण मुक्तिहेतुं चक्रायुधं तरुण वारिज पत्र नेत्रम् ॥ प्रात-
र्नमामि मनसा वचसा च मूर्ध्ना पादारविन्द युगुलं परमस्य पूंसः । नारायणस्य
नरकार्णव तारणस्य पारायण प्रवणविप्र परायणस्य ॥ प्रातर्भजामि भजता
म भयङ्करं तं प्राक्सर्व जन्मकृत पाप भयापहत्यै । यो ग्राह वक्त्र पतितां घ्रिगजे
न्द्र घोर शोक प्रणाशनकरो धृत शंखचक्रः ॥ श्लोकत्रय मिदं पुण्यं प्रातः प्रातः
पठेन्नरः । लोकत्रय गुरुस्तस्मै दद्यादात्म पदं हरिः ॥

॥ गणेशस्तुतिः ॥

॥ प्रातः स्मरामि गणनाथ मनाथबन्धुं सिन्दूरपूर्णपरिशोभितगण्ड युग्मम् ।

उद्दण्डविघ्नपरिखण्डनचण्डदण्ड माखण्डलादि सुरनायक वृन्द वन्द्यम् ॥ प्रातर्नमामि चतुराननवन्द्यमान मिच्छानुकूल मखिलं च वरं ददानम्। तं तुन्दिलं द्विरसनाधिपयज्ञसूत्रं पुत्रं विलासचतुरं शिवयोः शिवाय ॥ प्रातर्भजाम्य भयदं खलु भक्तशोक दावानलं गणविभुं वरकुञ्जरास्यम्। अज्ञानकाननविनाशन हव्यवाह मुत्साह वर्धनमहं सुतमीश्वरस्य ॥ श्लोकत्रयमिदं पुण्यं सदासाम्राज्य दायकं ॥ प्रातरुत्थाय सततं यः पठेत्प्रयतः पुमान् ॥

॥ सूर्यस्तुतिः ॥

॥ प्रातः स्मरामि खलु तत्सवितुर्वरेण्यं रूपं हि मण्डल मृचोऽथ तनुर्यजूंषि। सामानि यस्य किरणाः प्रभवादि हेतु ब्रम्हा हरात्मक मलक्ष्य मचिन्त्यरूपम् ॥ प्रातर्नमामि तरणिं तनुवाङ्मनोभिर्ब्रम्हेन्द्र पूर्वक सुरैर्नुतमर्चितं च। वृष्टिप्रमोचनविनिग्रह हेतुभूतं त्रैलोक्यपालनपरं त्रिगुणात्मकं च ॥ प्रातर्भजामि सवितारमनन्तशक्तिं पापौघशत्रुभयरोगहरं परं च। तं सर्वलोक कलनात्मक कालमूर्तिं गोकण्ठबन्धनविमोचनमादिदेवम् ॥ श्लोकत्रयमिदं भानोः प्रा-

नः प्रातः पठेत्तु यः। ससर्वव्याधिनिर्मुक्तः परं सुखमवाप्नुयात् ॥

॥ देवी स्तुतिः ॥

॥ प्रातःस्मरामि शरदिन्दुकरोज्ज्वलाभां सद्रत्नवन्मकरकुण्डलहारभूषाम ॥ दिव्यायुधोर्जितसुनीलसहस्रहस्तां रक्तोत्पलाभचरणां भवतीं परेशाम् ॥ प्रातर्नमामि महिषासुरचण्डमुण्ड शुम्भासुरप्रमुखदैत्यविनाशदक्षाम। ब्रम्हेन्द्ररुद्र मुनिमोहनशीललीलां चण्डीं समस्तसुरमूर्तिमनेकरूपाम् ॥ प्रातर्भजामि भजतामभिलाषदात्रीं धात्रीं समस्तजगतां दुरितापहन्त्रीम्। संसारबन्धनविमोचनहेतुभूतां मायांपरां समधिगम्य परस्य विष्णोः ॥ श्लोकत्रयमिदं देव्याश्चण्डिकायाः पठेन्नरः। सर्वान्कामानवाप्नोति विष्णुलोके महीयते ॥

॥ शिवस्तुतिः ॥

॥ प्रातःस्मरामि भवभीतिहरं सुरेशं गङ्गाधरं वृषभवाहनमम्बिकेशम्। खड्वांग शूल वरदाभयहस्तमीशं संसाररोगहरमौषधमद्वितीयम् ॥ प्रातर्नमामि गिरिशं गिरिजार्द्धदेहं सर्गस्थितिप्रलयकारणमादिदेवम्। विश्वेश्वरं विजितविश्वमनोभिरा

मं संसाररोग हरमौषधमद्वितीयम्। प्रातर्भजामि शिवमेकमनन्तमाद्यं वेदान्तवेद्य मखिलं पुरुषं महान्तम्। नामादिभेदरहितं षड्भावशून्यं संसाररोगहरमौषधमद्वितीयम्॥ प्रातः समुत्थाय शिवं विचिन्त्य श्लोकत्रयं येऽनुदिनं पठन्ति। ते दुःखजातं बहुजन्मसंचितं हित्वा पदं यान्ति तदेव शम्भोः॥

॥ रामस्तुतिः॥

॥ प्रातः स्मरामि रघुनाथमुखारविन्दं मन्दस्मितं मधुरभाषि विशालभालम्॥ कर्णावलम्बिचलकुण्डलशोभिगण्डं कर्णान्तदीर्घनयनं नयनाभिरामम्॥ प्रातर्भजामि रघुनाथकरारविन्दं रक्षोगणाय भयदं वरदं निजेभ्यः। यद्राजसंसदि विभज्य महेशचापं सीताकरग्रहणमङ्गलमाप सद्यः॥ प्रातर्नमामि रघुनाथपदारविन्दं वज्राङ्कुशादिशुभरेखि सुखावहं मे। योगिन्द्रमानसमधुव्रतसेव्यमानं शापापहं सपदि गौतमधर्मपत्न्याः॥ प्रातर्वदामि वचसा रघुनाथनाम वाग्दोषहारि सकलं शमलं निहन्ति। यत्पार्वती स्वपतिना सह भोक्तुकामा प्रीत्या सहस्रहरिनाम समं जजाप॥ प्रातः श्रयेच्छ्रुतिनुतां रघुनाथमूर्तिं नीलाम्बुदोत्पलसितेतररत्ननीलाम्। आमुक्तमौ-

क्तिकविशेषविभूषणाढ्यां ध्येयां समस्तमुनिभिर्जनमुक्तिहेतुम् ॥ यः श्लोकप-
ञ्चकमिदं प्रयतः पठेद्धि नित्यं प्रभातसमये पुरुषः प्रबुद्धः । श्रीरामकिङ्करजने-
षु सएव मुख्यो भूत्वा प्रयाति हरिलोक मनन्यलभ्यम्॥ ॥७॥ ॥७॥

॥ व्यायाम ॥

दोषक्षयोग्नि वृद्धिश्च व्यायामादुप जायते ॥
व्यायामदृढगात्राणां व्याधिर्नास्ति कदाचन ॥
विरुद्धंवाविदग्धंवा भुक्तं शीघ्रं विपच्यते ॥
भवंतिशीघ्रंनैतस्यवलीशिथिलतादयः ॥
नचैनं सहसाक्रम्यजरासम धिरोहति ॥
नचास्तिसदृशंते नकिंचित् स्थौल्यापकर्षणं ॥
सर्वदा गुणमाधत्ते बलिनां स्निग्ध भोजिनां ॥
वसंतेशीत समयेसुतरां सहितोमतः ॥
अन्यदापिच कर्तव्यो बलार्धेन यथा बलं ॥

श्रम केल्यानें वातादि दोषांचा क्षय, व अग्निची वृद्धि होते. व्यायामानें गात्रें दृढ झाली म्हणजे व्याधि कधींही होत नाहींत. आणिविरुद्धाहार; किंवा विदग्धाजीर्णावर भोजन हें लौकरच पचन होतें आणि अंगाच्या गयीं वली व शिथिलपणा हे होत नाहींत. पुरुष लौकर म्हातारा होत नाहीं, आणि व्यायामा सारखें स्थूलता घालविणारें दुसरें कांहीं नाहीं व तो बलवान आणि स्निग्धभोजी ह्याना सर्वकाळ स्थूलतारूप गुण करितो. व्यायाम हा वसंतऋतु व शीत काळाच्या दिवशीं विशेषें करून करावाच आणि अन्य काळीं ही करावा. परंतु तो आपल्या शक्तिनुरूप करावा. व्यायाम काळ प्रातःकाळ व सायंकाळ होत.

धर्मशास्त्रांत सूर्यास नित्यशः नमस्कार सांगितले आहेत; नमस्काराच्या योगानें व्यायामा प्रमाणेंच गुण प्राप्त होत असून शिवाय लक्ष्मीची प्राप्ती यांत ज्यास्त आहे. **आदित्यस्य नमस्कारं ये कुर्वंति दिनेदिने। जन्मान्तर सहस्रेषु दारिद्र्यं नोपजायते॥** आदित्य म्हणजे सूर्यास प्रति दिनीं नमस्कार केल्यानें पुढें सहस्रजन्मांत सुद्धां दारिद्र्याची बाधा होणार नाहीं. एका नमस्कारापासून जर इतकें फल प्राप्त होतें तर ज्यास्त नमस्कारापासून विशेष फल प्राप्त होईल हें उघड आहे.

॥व्यायामवर्ज॥ **भुक्तवान्कृत संभोगः कासी श्वासी कृशः क्षयी॥**

रक्तपित्ती क्षती शोषी नतं कुर्यात्कदाचन॥
अतिव्यायामतः कासोज्वरश्छर्दिः श्रमः क्लमः॥
तृष्णाक्षयः प्रतमकोरक्तपित्तंचजायते ॥

जेवलेला, संभोग केलेला, आणि कास, श्वास, कृशता, क्षय, रक्तपित्ती, क्षत, व शोष हे विकार असलेला यांनीं कधींही व्यायाम करूं नये. तसाच इतरांनीं व्यायाम करणें तोही परिमित करावा. अतिशय केला असतां खोकला, ज्वर, ओकारी, श्रम, ग्लानि, तृषा, क्षय, प्रतमक(श्वासाचा भेद) आणि रक्तपित्त हे विकार होतात.

॥ अभ्यंगविधि ॥

अभ्यंगंकारयेत्सौख्यं सर्वेष्वंगेषु पुष्टिदं॥
शिरःश्रवण पादेषु तद्विशेषेण शीलयेत्॥
सार्षपंगंधतैलंच यत्तैलं पुष्प वासितं ॥
अन्यद्रव्य युतं तैलं नदुष्यतिकदाचन॥
अभ्यंगोवातकफहृच्छ्रमंकांतिंबलंसुखं॥

निद्रावर्णमृदुत्वायुः कुरुते दृढपुष्टिकृत्॥
अभ्यंगः शीलितो मूर्ध्नि सकलेंद्रियतर्पणः॥
दृष्टिपुष्टिकरो हंति शिरोभूमिगतान्गदान्॥
केशानां बहुतां दार्ढ्यं मृदुतां दीर्घतां तथा॥
कृष्णतां कुरुते कुर्याच्छिरसः पूर्णतामपि॥

सर्वांगाला तेल चोळल्यानें सौख्य व पुष्टि होते. हें मर्दन विशेषें करून मस्तक, पाय व कान यांच्या ठिकाणीं करावें. सर्षप, गंधयुक्त, फुलांचें तेल व इतर अत्तरादि तेलें वर्जित वारीं लाविलें तरी दोष नलागून गुणच प्राप्त होतात. अभ्यंगापासून वात व कफ यांचा नाश होतो. हें शम, कांति, सुख, निद्रा, वर्ण, मृदुत्व, आयुष्य, यांना दृढपुष्टिकरणारें आहे, आणि मस्तकास तेलाचें मर्दन केलें असतां सर्वेंद्रिय तृप्त होतात. दृष्टि सतेज होऊन मस्तक संबंधी रोगांचा नाश होतो. आणि त्यापासून केश मजबूत, दाट काळे आणि पुष्कळ लांब होतात, व मस्तक दृढ होतें.

## ॥ कानांत तेल घालण्याचे गुण ॥

नकर्णरोगा नमलो नच मन्याहनुग्रहः॥

नोच्चैः श्रुतिर्नबाधिर्यंस्यान्नित्यंकर्णपूरणात् ॥
रसाद्यैः पूरणंकर्णे भोजनात्प्राक् प्रशस्यते ॥
तैलाद्यैः पूरणंकर्णे भास्करेऽस्तमुपागते ॥

कानांत रोज तेल घालीत गेलें असतां कधींही कर्णरोग, मळ, मन्याग्रह, हनुग्रह, हळूं बोलणें, चांगलें ऐकूं न येणें हे दोष नाहींसे होतात. कर्णामध्यें रसादिक घालणें असेल तर भोजनाचे पूर्वी घालावीं आणि तैलादिक रात्रीं घालावीं.

॥ अभ्यंगास अनधिकारी ॥

तरुणज्वर्यजीर्णीचनाभ्यक्तव्यः कदाचन ॥
तथाविरिक्तोवांतश्चनिरूढोयश्चमानवः ॥
पूर्वयोः कृच्छ्रताव्याधेरसाध्यत्वमथापिवा ॥
शेषाणांतदधः प्रोक्तावन्हिसादादयोगदाः ॥ नि० र०

तरुणज्वरी, अजीर्ण झालेला आणि रेचक, वांति, निरूह बस्ति घेतलेला यांनीं अभ्यंग करूं नये. तरुणज्वरी, अजीर्णी यांनीं अभ्यंग केलें असता त्याच्या व्याधि कृच्छ्रसाध्य किंवा-

हुना असाध्यही होतात.आणि विरेकादिक झालेले यांनीं अभ्यंग केलें असतां अग्निमांद्यादिक व्याधि प्राप्त होतात.

॥ अभ्यंगास दोषादोष ॥

रविस्तापं कांतिं विनरति शशी भूमितनयो।
मृतिं लक्ष्मीं सौम्यः सुरपति गुरुर्वित्तहरणम्॥
विपत्तिं दैत्यानां गुरुरखिल भोगानुगमनं।
नृणां तैलाभ्यंगात्सपदि कुरुते सूर्यतनयः॥

रविवारीं तैलाभ्यंग केला असतां ज्वराची प्राप्ति होते. सोमवारीं कांति प्राप्ति होते. मगळवारीं मृत्यूची प्राप्ति होते. बुधवारीं लक्ष्मीची प्राप्ति होते. गुरुवारीं द्रव्याचा नाश होतो. शुक्रवारीं दारिद्य प्राप्त होतें. आणि शनिवारीं संपत्तीची प्राप्ति होते.

सोमवारीं शैव आणि ज्यास पुत्र आहे अशा स्त्रीपुरुषांनीं तैलाभ्यंग करूं नये.

॥ विशेष प्रकार ॥

वत्सरादौ वसंतादौ बलिराज्ये तथैवच॥

तैलाभ्यंगमकुर्वाणो नरकं प्रतिपद्यते ॥
इषेभूतेचदर्शेच कार्तिकप्रथमेदिने ॥
यदास्वातीतदाभ्यंगस्नानं कुर्यादिनोदये ॥
ऊर्जेशुक्लद्वितीयायांतिथिषुस्वातिऋक्षगे ॥
मानवो मंगलस्नायी नैवलक्ष्म्यावियुज्यते ॥
इंदुक्षयेपिसंक्रांतौरवौपातेदिनक्षये ॥
तत्राभ्यंगोनदोषायप्रातःपापापनुत्तय ॥ नि०सिं०

संवत्सर प्रतिपदेच्या दिवशीं, वसंतऋतु लागतो त्यादिवशीं, बलिराज्य म्हणजे- अश्विन वद्य चतुर्दशीतें कार्तिक शुद्ध द्वितीये पर्यंत- दिपवाळी- दिवस चार यादिवशीं तैलाभ्यंग अवश्य करावें; न केल्यास नर्काची प्राप्ति होते. या दिवशीं तैलाभ्यंग केलें असतां अक्षय्य लक्ष्मीची प्राप्ति होते. याचप्रमाणें विजयादशमी आणि लग्नमौंज इत्यादि मंगलकार्यांतही मंगलस्नान करावें.

वरील दिवसांचे ठिकाणीं अमावास्या, संक्रांति, रविवार, क्षयतिथि, या दिवशींचाही तैलाभ्यंगकरण्यास दोष नाहीं.

## ॥ अथ स्नानम् ॥

एकंदर स्नानें सात प्रकारचीं आहेत.

मांत्रपार्थिवमाग्नेयंवायव्यंदिव्यमेवच ॥
वारुणंमानसंचेतिसप्तस्नानान्यनुक्रमात् ॥
शन्नंआपस्तुवैमांत्रंमृदालेभंतुपार्थिवं ॥
भस्मनास्नानमाग्नेयंगवांरेणुभिरानिलं ॥
आतपेसतियावृष्टिस्तद्दिव्यंस्नानमुच्यते ॥
बहिर्नद्यादिकेस्नानंवारुणंतत्प्रकीर्तितं ॥
यद्ध्यानंमनसाविष्णोर्मानसंकथ्यतेबुधैः ॥ बृ॰पा॰

(१) शन्नोदेवि इत्यादि मंत्र ह्मणणें हें 'मंत्रस्नान.' (२) मृत्तिका शरीरास लावणें हें 'पार्थिवस्नान.' (३) अंगास भस्म लावणें हें 'आग्नेयस्नान' (४) गाईनें उडविलेली धूळ अंगावर घेणें हें वायुस्नान. (५) उन्हांत पडणारा पाऊस घेणें हें दिव्यस्नान. (६) नद्यादिकांतस्नान करणें हें 'वारुणस्नान' आणि (७) विष्णूचें ध्यान हें मानसस्नान होय.

॥ स्नानावश्यकता ॥

स्नातोधिकारी भवति दैवे पित्र्येच कर्मणि ॥
पवित्राणांतथाजाप्येदानेचविधिचोदिते ॥ स्ना.सू.भा.

स्नान केल्यावांचून दैवकर्म, पितृकर्म, पवित्रता, जप आणि दान करण्यास अधिकार प्राप्त होत नाहीं; यासाठीं स्नान अवश्य केलें पाहिजे.

॥ प्रातःस्नानाचें महत्व ॥

उषस्युषसियत्स्नानंक्रियतेनुदितेरवौ ॥
प्राजापत्येनतत्तुल्यं महापातकनाशनं ॥
प्रातरुत्थाययोविप्रः प्रातःस्नायीसदाभवेत् ॥
सर्वपापविनिर्मुक्तः परब्रम्हाधिगच्छति ॥
क्लिद्यंतेतिसुगुप्तानिइंद्रियाणिक्षरंतिच ॥
अंगानिसमृतांयांतिउत्तमान्यधमैसह ॥
अत्यंतमलिनःकायोनवच्छिद्रसमन्वितः ॥

स्त्रवत्येषदिवारात्रौ प्रातःस्नानंविशोधनं ॥
उषः स्नानं प्रशंसंति सर्वेपिपितरोनराः ॥
दृष्टादृष्टकरंपुण्यंशंसंति मुनयोपिहि ॥
प्रातःस्नातिहियोविप्रःसोर्हःस्यात्सर्वकर्मसु ॥
प्राप्नोतितत्कृतंपुण्यंसर्वंचस्याध्रुथार्थवत् ॥ बृ.पा.
प्रातःस्नानेनपूयंतेअतिपापकरानराः ॥
प्रातःस्नानं हरेद्दैन्यं सबाह्याभ्यंतरंमलं ॥
प्रातःस्नानेननिष्पापोनरोननिरयंव्रजेत् ॥ प. पु.

प्रातःकाळीं सूर्योदयाचे पूर्वी स्नान केलें ह्मणजे पातकांचा नाश होऊन प्राजापत्यव्रताचें फळ मिळतें, आणि परब्रम्हाची प्राप्ति होते. स्नान केल्यावांचून जप होमादि कोणत्याही कर्मास अधिकारी होत नाहीं. आणि रात्रीं निद्रिस्थ असतां सर्व इंद्रियांपासून लाळादि पदार्थ गळतात – उत्तम अंगे- ( मुखनेत्र वगैरे ) आणि अधम अंगें ( गुद, लिंग वगैरे ) वाहतात यामुळें नव छिद्रांचा हा देह रात्रीं स्त्रावानें जो अपवित्र होतो तो प्रातः स्नानानें पवित्र होऊन कर्मास

अधिकार प्राप्त होतो. आणि दृष्ट ह्मणजे देहाची स्वच्छता वगैरे व अदृष्ट म्हणजे स्वर्गादि प्राप्ति तसेंच स्नानसंध्यादि कर्मे यथार्थ होऊन पुण्यप्रद होतात. व अतिपाप करणारे जरी पातकी आहेत तरी तेही प्रातःस्नानानें मुक्त होतात. प्रातःस्नान हें अंतरबाह्य पातकाचें नाशक आहे. प्रातःस्नानानें प्राणी निष्पाप होऊन तो नरकांत जात नाहीं; यासाठीं प्रातःस्नान अवश्य करावें.

## ॥ स्नानाचें फळ ॥

स्नानमूलाः क्रियाः सर्वाः श्रुतिस्मृत्यादिणा नृणां ॥
तस्मात्स्नानं निषेवेत श्रीपुष्ट्यारोग्यवर्धनं ॥
गुणा दश स्नानपरस्य साधो रूपं च तेजश्च बलं च शौचं ॥
आयुष्यमारोग्यमलोलुपत्वं दुःस्वप्ननाशश्च यशश्च मेधा ॥

मनुष्याचीं सर्व कार्यें स्नानापासून फलद्रुप होतात, असें श्रुतिस्मृतींनीं सांगितलें असल्यानें स्नानाचें नित्यशः सेवन ह्मणजे स्नान अवश्य करीत जावें. स्नानापासून संपत्ति, पुष्टता, आरोग्य, रूप, तेज, बळ, शुद्धता, आयुष्य, अलोभ, दुःस्वप्नाचा नाश, यश आणि चांगली बुद्धि असे गुण प्राप्त होतात.

॥ स्नानाचे गुण ॥

दीपनं वृष्यमायुष्यंस्नानमोजोबलप्रदं ॥
कंडूमलश्रमस्वेदतंद्रातृड्दाहपापनुत् ॥
शीतेनपयसास्नानंरक्तपित्तप्रशांतिकृत् ॥
तदेवोष्णेनतोयेनबल्यंवातकफापहं ॥
शिरःस्नानमचक्षुष्यमत्युष्णेनांबुनासदा ॥
वातश्लेष्मप्रकोपेतुहितंतच्चप्रकीर्तितम् ॥
यःसदामलकैःस्नानंकरोतिसचनिश्चितम् ॥
वलीपलितनिर्मुक्तोजीवेद्वर्षशतंनरः ॥

स्नान हें अग्नि प्रदिप्त करणारें, वृष्य, आयुष्य वाढविणारें, तेज, बल, यांना देणारें आणि कं-डू, मल, श्रम, घाम, झांपड, तृषा, दाह व पातक यांचा नाश करणारें आहे. थंड पाण्यानें स्नान केलें असतां रक्तपित्ताची शांति होते. उष्णोदकानें स्नान केलें असतां तें बलकारक असून वायु, कफ यांचा नाश करितें. मस्तकावर फार कढत पाणी घेतलें असतां त्यापासून नेत्रांना पीडा होते, पण

वातपित्त यांचा प्रकोप झाला असतां मस्तकावरून उष्णोदकाचें स्नान हितकारक होतें. जो नित्य नेमानें आंवळ्याचा कल्क अंगास लावून स्नान करील त्याला त्वचागतरोग होत नाहींत व त्याचे केश पांढरे न होतां तो पूर्णायु होईल.

॥ स्नानाभावीदोष ॥

स्नानंविनातुयोभुंक्तेसमलाशीसदानरः॥
अस्नायिनोऽशुचेस्तस्यनिराशाःपितृदेवताः॥
स्नानहीनोनरःपापःस्नानहीनोशुचिःसदा॥
अस्नायीनरकंभुक्त्वापुल्कसादिषुजायते॥ प.पु.

स्नानावांचून अन्न भक्षण करणें म्हणजे मलाहार केल्यासारखें होय. स्नान न करणारा अपवित्र आणि अशूचि असल्या कारणानें त्याचे सर्व पितृ व देव निराश होतात. स्नान न करणारा सदैव अशूचि जाणावा. स्नान न करणारा पातकी जाणावा, तो नरकाप्रत जाऊन नंतर चांडालादि नीच योनीप्रत पावतो.

॥वर्ज स्नान॥

स्नानंज्वरेऽतिसारेच नेत्रकर्णानिलार्तिषु॥
आध्मानपीनसाजीर्णे भुक्तवत्सुच गर्हितम्॥

ज्वर, अतिसार, नेत्ररोग, कर्णरोग, वातव्याधि, पोट फुगणें, पडसें व अजीर्ण इ॰ व्याधिग्रस्तांनीं आणि भोजनानंतर स्नान करूं नये.

॥ ज्वरादिप्रसंगीं इतरस्नान ॥

असामर्थ्येतुकायस्य कालशक्त्याद्यपेक्षया ॥
सर्वाणिफलतुल्यानिस्युरित्याहपराशरः ॥
स्नानानांमानसंस्नानं मन्वाद्यैःपरमंस्मृतम्॥

ज्वरादिकांचे प्रसंगीं वर जीं सात स्नानें सांगितलीं आहेत, त्यांपैकीं काल व शक्तीस अनुसरून कोणतेंही स्नान केलें तरी सारखेंच फल देणारें आहे. परंतु त्यांतही मानसस्नान म्हणजे- स्नानोद्देशें परमेश्वराचें ध्यान करणें हें मुख्य आहे. असें मन्वादिकांनीं सांगितलें आहे. कोणत्याही स्नानसमयीं परमेश्वराचें ध्यानपूर्वक स्नान करणें उत्तम श्रेयस्कर होय.

॥ गृहस्नानप्रकार ॥

आपःस्वभावतोमेध्याःकिंपुनर्वन्हिसंयुताः॥
अतःसंतःप्रशंसंतिस्नानमुष्णेनवारिणा ॥
अभ्यंगेचैवमांगल्येगृहेचैवतुसर्वदा ॥
शीतोदकेननस्नायांन्नधार्यंगोपिचंदनं॥
सीतास्वप्सुनिषिंच्योष्णाःसीतास्तासुनिषिंचयेत्॥
ताभिःस्नानंगृहेप्रोक्तंनकुर्याच्छीतवारिणा ॥
संक्रांतौग्रहणेचैवह्यमावास्यार्कपर्वसु ॥
गृहेवापिप्रकुर्वीतस्नानंशीतोदकेनच॥
संकल्पंसूक्तपठनंमार्जनंचाघमर्षणं ॥
देवादितर्पणंचैवगृहेपंचविवर्जयेत्॥
गृहस्नानेनकुर्वीततर्पणंमार्जनंतथा॥
नांतराचमनंकुर्यात्पश्चादाचम्यशुध्यति॥

उदक स्वभावतः पवित्र असून तें अग्निसंयोगानें म्हणजे उष्ण झाल्यावर स्नानास विशेष प्र॰

शस्त होय. घरीं अभ्यंग समयीं ( दिपवाळी वगैरे ) आणि मांगल्य प्रसंगीं ( लग्नमौंजींत वगैरे) थंड पाण्यानें स्नान करूं नये, व गोपिचंदन वगैरे लावूं नये. घरीं स्नान करावयाचें तें निव्वळ थंड पाण्यानें न करितां त्यांत थोडें तरी उष्णोदक मिळवून स्नान करावें. संक्रांति, ग्रहण, आमावास्या, सूर्य पर्वणी या दिवशीं मात्र निव्वळ थंड पाण्यानेंच स्नान करावें. घरीं स्नानाचे वेळीं संकल्प, सूक्तपठण, मार्जन, अघमर्षण आणि देवादिकांचें तर्पण हे पांच प्रकार वर्ज आहेत. तसेंच स्नाना मध्यें आचमन करूं नये. स्नान झाल्यावर वस्त्र परिधान करून आचमन करावें.

॥ अथ गृहस्नान प्रयोग प्रारंभः ॥

घरीं स्नानाचे वेळीं संकल्पादि कोणताही विधि न करितां फक्त खालीं लिहिल्याप्रमाणें देवतांचें स्मरण करून स्नान करावें.

जान्हवी यमुनाचैव नर्मदाचैव गौतमी ॥
नदी भीमरथी चैव कृष्णावेण्याच तुंगजा ॥
एताः सप्त महानद्यः स्नानकाले प्रकीर्तिताः ॥
सुस्नानफलमाप्नोति कोटियज्ञफलं लभेत् ॥

गंगागंगेति योब्रूयाद्योजनानांशतैरपि ॥
मुच्यते सर्वपापेभ्यो विष्णुलोकं सगच्छति ॥
पापोहं पापकर्माहं पापात्मा पापसंभवः ॥
त्राहि मां कृपया गंगे सर्वपापहरा भव ॥
योसौ सर्वगतो विष्णुः चित्स्वरूपी निरंजनः ॥
स एव द्रवरूपेण गंगांभो नात्र संशयः ॥
हरिर्नारायणो गंगा गंगा नारायणो हरिः ॥
हरिर्विश्वेश्वरो गंगा गंगा विश्वेश्वरो हरिः ॥
हरिस्मरेण मात्रेण सर्वपापैः प्रमुच्यते ॥

याप्रमाणें स्मरणपूर्वक स्नान झाल्यावर खालीं लिहिलेलें गंगाष्टक (सौडीप्रो) पठण करावें.

॥ मातः शैलसुतासपत्नि वसुधाशृंगारहारावलि ॥
॥ स्वर्गारोहणवैजयंति भवतीं भागीरथीं प्रार्थये ॥
॥ त्वत्तीरे वसतस्त्वदंबु पिबतस्त्वद्वीचिषु प्रेंखत ॥

॥ स्त्वन्नामस्मरतस्त्वदर्पितदृशःस्यान्मेशरीरव्ययः ॥ १॥
॥त्वत्तीरे तरुकोटरांतरगतो गंगेविहंगोवरं ॥
॥ त्वन्नीरे नरकांत कारिणिवरंमत्स्योऽथवाकच्छपः॥
॥ नैवान्यत्रमदांधसिंधुरघटासंघट्टघंटारण ॥
॥त्कारत्रस्तसमस्तवैरिवनितालब्धस्तुतिर्भूपतिः ॥२॥
॥उक्षापक्षीतुरगउरगः कोपिवा वारणोवा ॥
॥ वाराणस्यां जननमरणक्लेशदुःरवासहिष्णुः ॥
॥ नत्वन्यत्र प्रविरलरणत्कंकणक्काणमिश्रम् ॥
॥ वारस्त्रीभिश्चमरमरुता वीजितो भूमिपालः ॥ ३॥
॥ काकैर्निष्कुषितं श्वभिःकवलितंगोमायुभिर्लुंठितं ॥
॥ स्रोतोभिश्चलितंतटांबुलुलितंवीचिभिरांदोलितं ॥
॥ दिव्यस्त्रीकरचारुचामरमरुत्संवीज्यमानःकदा ॥
॥ द्रक्ष्येहं परमेश्वरित्रिपथगे भागीरथीस्वंवपुः ॥४॥

॥ अभिनवबिसवल्लीपादपद्मस्यविष्णो ॥
॥ र्मदनमथनमौलेर्मालती पुष्पमाला ॥
॥ जयतिजयपताका काप्यसौ मोक्षलक्ष्म्याः ॥
॥ क्षपितकलिकलंकाजान्हवी नः पुनातु ॥ ५ ॥
॥ एतत्तालतमालसाल सरलव्यालोलवल्लीलता ॥
॥ च्छन्नंसूर्यकर प्रतापरहितंशंखेंदुकुंदोज्ज्वलं ॥
॥ गंधर्वामरसिद्धकिन्नरवधूतुंगस्तनास्फालितं ॥
॥ स्नानाय प्रतिवासरं भवतुमे गांगंजलंनिर्मलं ॥ ६ ॥
॥ गांगंवारि मनोहारि मुरारिचरणच्युतम् ॥
॥ त्रिपुरारिशिरश्चारि पापहारि पुनातुमाम् ॥ ७ ॥
॥ पापापहारि दुरितारि तरंग धारि ॥
॥ शैलप्रचारि गिरिराज गुहाविदारि ॥
॥ झंकारकारि हरि पादरजोपहारि ॥

॥ गांगं पुनातु सततं शुभकारिवारि ॥ ८ ॥

॥ गंगाष्टकं पठति यः प्रयतः प्रभाते ॥

॥ वाल्मीकिना विरचितं शुभदं मनुष्यः ॥

॥ प्रक्षाल्य गात्र कलिकल्मष पंकमाशु ॥

॥ मोक्षं लभेत्पतति नैव नरो भवाब्धौ ॥ ९ ॥

इति श्री वाल्मीकिना विरचितं गंगाष्टकस्तोत्रं संपूर्णम् ॥ श्रीगंगार्पणमस्तु ॥

विष्णवे नमो विष्णवे नमो विष्णवे नमः ॥ ❦ ❦ ❦ ❦ ❦

॥ श्री गणेशाय नमः ॥ अथ मानसिकस्नान प्रारभ्यते ॥ हरिहरब्रम्हणऊचुः ॥

॥ स्वस्थितं पुंडरीकाक्षं मंत्रमूर्ति हरिं स्मरेत् ॥

॥ अनंतादित्य संकाशं वासुदेवं चतुर्भुजम् ॥ १ ॥

॥ शंखचक्र गदापद्म धारिणं पुरुषोत्तमम् ॥

॥ श्रीवत्स कौस्तुभोरस्कं वनमालासुशोभितम् ॥ २ ॥

॥ शामलं शांत हृदयं दिव्य पीतांबरावृतम् ॥

॥ दिव्यचंदनलिप्तांगंचारुहासंशुभेक्षणम् ॥ ३॥
॥ नारदादिभिरासेव्यंभास्वद्विमलकंकणम् ॥
॥ सकिंकिणीककेयुरहारनूपुरशोभितम् ॥ ४॥
॥अनर्घ्यरत्नखचितंमुकुटेनविराजितम् ॥
॥ अनेकरत्नसच्छन्नंस्फुरन्मकरकुंडलम् ॥ ५॥
॥ ध्वजवज्रांकुशालक्ष्मपदपाथोरुहद्वयम् ॥
॥तत्पादोदकजांगंगानिपतंतींस्वमूर्धनि ॥ ६॥
॥ चिंतयेद्ब्रह्मरंध्रेणप्रविशंतींनिजांतनुं ॥
॥ तयासंक्षालयेदेहमंतर्बाह्यगतंमलम् ॥ ७॥
॥ तत्क्षणाद्विरजोमंत्रीजायतेस्फटिकोपमः ॥
॥ अंतर्बहिश्चशुध्यर्थमानसंस्नानमाचरेत् ॥ ८॥
॥ नमोनारायणायेतिव्यक्तंच्चरन्मुक्तिभाग्भवेत् ॥
॥ वासुदेवाच्युतानंदगोविंदमधुसूदन ॥ ९ ॥

॥ मुरारे नारसिंहानिरुद्ध संकर्षणेतिच ॥
॥रजस्तमोमोहजातान्जाग्रत्स्वप्नसुषुप्तिजान् ॥१०॥
॥ वाङ्मनःकायजान्दोषान्नवैतान्नामनिर्दहेत् ॥
॥ इडाभागीरथीगंगापिंगला यमुनानदी ॥११॥
॥ तयोर्मध्यगतानाडीसुषुम्नाख्यासरस्वती ॥
॥ स्नानं ह्रदे ध्यानजलेरागद्वेषमलापहे ॥१२॥
॥ यःस्नातिमानसेतीर्थेसयातिपरमांगतिं ॥
॥ नमःशिवायैगंगायैशिवदायैनमोनमः ॥१३॥
॥ नमस्त्रिपथगामिन्यैविश्वमूर्त्यैनमोनमः ॥
॥ नमोस्तु पापहारिण्यै भागीरथ्यैनमोनमः ॥१४॥
॥ इदंमानसिकंस्नानंप्रोक्तंहरिहरादिभिः ॥
॥ सार्धत्रिकोटितीर्थेषुस्नानात्कोटिगुणाधिकं ॥१५॥
॥ अतिनीलघनःश्यामंनलिनायतलोचनम् ॥

॥ स्मरामि पुंडरीकाक्षं तेन स्नातो भवाम्यहं ॥१६॥
॥ अच्युतोहमनंतोहमानंदोहमहं हरिः ॥
॥ नित्योहं निर्विकल्पोहं निराकारोस्म्यहं सदा ॥१७॥
॥ सच्चिदानंदरूपोहमजोहममृतोस्म्यहम् ॥
॥ ब्रह्मैवाहं न संसारी मुक्तोहमिति भावयेत् ॥१८॥
॥ अशक्नुवन्भावयितुं वाक्यमेतदुदीरयेत् ॥
॥ संवत्सरकृताभ्यासान्मुक्तिरेव न संशयः ॥१९॥
॥ इदं मानसिकं स्नानं प्रातरुत्थाय यः पठेत् ॥
॥ कालमृत्यमतिक्रम्य जीवत्याचंद्रतारकम् ॥२०॥

इति श्री वामनपुराणे हरिहरादि प्रोक्तं मानसिकं स्नानं संपूर्णम् ॥ ॐ तत्स० स्तु

हें मानसिक स्नान प्रकृति अस्वस्थ (आजारी) समयीं तर स्नानाभावी अवश्य पठण करावें. आणि इतर स्नानसमयीं व प्रातःकालींही पठण करणें फलश्रुतीवरून उत्तम होय.

## ॥ स्नानास योग्य जल ॥

॥ नदीषु देवखातेषु तडागेषु सरस्सु च ॥
॥ स्नानं समाचरेन्नित्यं गर्तप्रस्रवणेषु च ॥ १ ॥
॥ भागीरथी गौतमी च कृष्णवेणी पिनाकिनी ॥
॥ अखंडा चैव कावेरी पंचगंगा प्रकीर्त्तिता ॥ २ ॥ मनुः
॥ भूमिस्थमुद्धृतं वापि शीतमुष्णमथापि वा ॥
॥ गांगं पयः पुनात्येव पापमामरणांतिकम् ॥ ३ ॥ मरीचिः
॥ आप एव सदा पूतास्तासां वन्हिर्विशोधकः ॥
॥ तस्मात्सर्वेषु कालेषु उष्णांभः पावनं स्मृतम् ॥ ४ ॥
॥ नित्यं नैमित्तिकं चैव क्रियांगं मलकर्षणम् ॥
॥ तीर्थाभावे तु कर्तव्यमुष्णोदकपरोदकैः ॥ ५ ॥ यमः

गंगादि नद्या, देवांनीं केलेलीं तीर्थें, तलाव, सरोवर, खळग्यांत साचलेलें पाणी, झरा निघतो ते- थें इतक्यांतून जें मिळेल त्यांत स्नान करावें. यांत गंगादि सर्व तिर्थांचें उदक अति श्रेष्ठ आहे. ती- र्थांचें उदक वर काढिलेलें ही थंड असो अगर उष्ण असो, तें स्नान करणारांचें आमरणांतिक पाप दू

र करतें. तीर्थाभावीं इतर उदकही मूळचें पवित्र त्यांत तापलेलें तर ज्यास्तच पवित्र होय. नित्यनैमित्तिक् क्रियांग व मलापकर्षण (स्वच्छतेकरितां) हीं सर्व स्नानें ऊन पाण्यानें अथवा थंड पाण्यानेंही करावींत.

॥ स्नानासवर्ज्जजल ॥

॥ स्नानमाचमनंदानंदेवतापितृतर्पणम् ॥
॥ शूद्रोदकैर्नकुर्वीततथामेघाद्विनिःसृतैः ॥ वाच.
॥ तृणपर्णो त्करयुतंकलुषंविषसंयुतम् ॥
॥ योवहेतवर्षासुपिबेद्वापिनवंजलम् ॥
॥ सबाह्याभ्यंतरान्रोगान् प्राप्नुयात्क्षिप्रमेवहि ॥ धन्वं.

स्नान, आचमन, दान, देवता आणि पितर यांचीं तर्पणादि कर्में इतक्याकामीं शूद्रांनीं दिलें व पावसाचें धरलेलें पाणी घेऊं नये. तसेंच गवत, पानें, कचरा आणि विष यांनीं युक्त आणि वर्षाकालांतील उदक हें शारीरिक व मानसिक व्याधि उत्पन्न करणारें असल्यानें वर्ज करावें.

॥ स्नानास योग्यदिशा ॥

॥ स्त्रोतसोभिमुखंस्नायात् नदीषु प्रवहज्जले ॥
॥ स्थावरेत्त्वतडागेचखेरभिमुखंसदा ॥ विष्णुः

नद्याचे ठिकाणीं जिकडून पाणी वाहत येतें तिकडे आणि विहीर, तलाव, कुवा, व घरीं सूर्या कडे तोंड करून स्नान करावें. ( अन्यमतें वाजसनेय शाखेनें नद्यादि ठिकाणींही पूर्वेकडेस तोंड करून स्नान करावें असें आहे. )

## ॥ ओलें वस्त्र फेडणें आणि पिळणें ॥

॥ स्नानंकृत्वार्द्रवस्त्रंतुउर्ध्वमुत्तारयेद्विजः ॥
॥ आर्द्रवस्त्रमधस्ताच्चेत्पुनःस्नानेनशुद्ध्यति ॥
॥ निष्पीड्यस्नानवस्त्रंतुपश्चात्संध्यांसमाचरेत् ॥
॥ अन्यथाकुरुतेयस्तुस्नानंतस्याफलंभवेत् ॥ वृ. मनुः

स्नान केल्यावर ओलें वस्त्र फेडणें तें वरच्या बाजूनें म्हणजे गळ्याकडून काढावें, खालच्या बाजूनें काढूंनये, काढलें असतां पुनः स्नान करावें असें आहे. ओलें वस्त्र पिळून नंतर संध्या करावी, वस्त्र पिळून नठेवितां तसेंच ठेवलें तर स्नान निष्फल होतें. ( अन्यमतें नद्यांचे ठिकाणीं मात्र

ओलें वस्त्र खालींच सोडावें असें आहे.)

याप्रमाणें स्नानसंबंधीं माहिती आणि प्रकार या ठिकाणीं देऊन तीर्थादि नद्यांचे ठिकाणीं आणि कुवा, विहीर, बारव, तलाव इ. जलाशयाचे ठिकाणीं मंत्रस्नानविधि करणें तो शाखापरत्वें सूत्रानुसार असल्यानें न घेतां सर्व शाखोपयोगी जें अवश्य तेंच घेण्याचें केलें आहे.

॥वस्त्रधारण॥

॥ कदापिनजनैः सद्भिर्धार्यं मलिनमंबरम् ॥
॥ तत्तु कंडूकृमिकरं ग्लान्यलक्ष्मीकरंपरम् ॥
॥ स्नात्वैव वाससी धौते अक्लिन्ने परिधापयेत् ॥
॥ अभावे धौतवस्त्रस्य पट्टक्षौमादिकानिच ॥ अ. सु.

मलिनवस्त्र धारण करूं नये, त्याच्या योगानें कंडू, उवा, ग्लानि, व दारिद्र्य हीं प्राप्त होतात. स्नानानंतर धुतलेलें वस्त्र नेसावें, धुतलेलें वस्त्र नसल्यास धाबळी, रेशमी वस्त्र इ. परिधान करावें.

॥उपवस्त्रावश्यकता॥

॥ होमदेवार्चनाद्यासुक्रियासुपठनेतथा ॥

॥ नैकवस्त्रः प्रवर्तेतद्विजोनाचमनेजपे ॥ वि॰पु॰
॥ यज्ञोपवीते द्वे धार्ये श्रौतेस्मार्तेच कर्मणि॥
॥ तृतीयमुत्तरार्थंच वस्त्राभावेचतुर्थकम् ॥ स्मृ॰

स्नान झाल्यावर एका वस्त्रावर पूजा, होम, अध्ययन, आचमन, वगैरे कर्मे द्विजांनीं करूं नये. द्विजांनीं कंठांत श्रौतस्मार्तादि कर्मार्थ दोन जानवीं तर धारण केलींच पाहिजेत. उपवस्त्राभावीं एक, अशीं तीन जानवीं असल्यावर प्रसंगीं उपवस्त्र नसल्यास चालेल. क्वचित् प्रसंगीं अस्वस्थ प्रकृतिचे समयीं वगैरे वस्त्रपरिधानाचेंही भान राहत नसतें या करितां ब्राह्मणांनीं चार जानवीं धारण करणें चांगलें आहे.

॥ग्राह्यासनआणित्याचेंफल॥

॥ कुशासने ज्ञानसिद्धिर्मोक्षोवा व्याघ्रचर्मणि॥
॥ कृष्णाजिनेसर्वसिद्धिः सर्वाभावेतु कंबलम् ॥

दर्भासनावर संध्यादि नित्य कर्मे केलीं असतां ज्ञानाची प्राप्ति, व्याघ्रचर्मावर मोक्षाची प्राप्ति, हरिणाचे आसनावर सर्व सिद्धि; आणि यातिन्ही गोष्टींचे अभावी लोंकरीचें आसन प्रशस्त होय.

## ॥ वर्ज्यासन आणि त्याचे दोष ॥

॥ वस्त्रासने दरिद्रस्यात् पाषाणे रोगसंभवः ॥
॥ मेदिन्यां दुःखमाप्नोति काष्ठे भवति निष्फलम् ॥ स्मृ॰

वस्त्रासनापासून दरिद्राची प्राप्ति, पाषाणापासून रोगाची प्राप्ति, नुसत्या जमिनीपासून दुःखाची प्राप्ति, आणि काष्ठासनापासून सर्व कर्म निष्फल होतें. यासाठीं पाटावर बसावयाचें झाल्यास त्यावर ग्राह्यासन टाकून नंतर ब्रम्हकर्में करावीं.

## ॥ भस्मधारणावश्यकता ॥

॥ श्राद्धे यज्ञे जपे होमे वैश्वदेवे सुरार्चने ॥
॥ धृतः त्रिपुंड्रः पूतात्मा मृत्युं जयति मानवः ॥ कात्या॰

श्राद्ध, यज्ञ, जप, होम, वैश्वदेव, देवतार्चन, इत्यादि कर्मांचे ठिकाणीं भस्माचें त्रिपुंड्र लावल्यानें सर्व पातकाचा नाश होऊन पवित्रता प्राप्त होते. आणि अपमृत्यूचें अरिष्ट दूर होऊन पूर्णायुष्य प्राप्त होतें.

## ॥ भस्मविधि ॥

॥ ललाटे हृदये नाभौ गलेंऽसे बाहुसंधिषु ॥
॥ पृष्ठदेशे शिरस्येवं स्थानेष्वेतेषु धारयेत् ॥
॥ मध्यमानामिकांगुष्ठैरनुलोमविलोमतः ॥
॥ नेत्रयुग्मप्रमाणेन त्रिपुंड्रं धारयेद्द्विजः ॥ स्मृ० रत्ना०
॥ अग्निरित्यादिभिर्मंत्रैः शुद्धं भस्माभिमंत्रितं ॥
॥ शिवमंत्रेण तद्धार्यं मंत्रेणाष्टाक्षरेण वा ॥
॥ गायत्र्या वाच देवर्षे मंत्रेण प्रणवेन वा ॥
॥ करोति शिवमंत्रेण यस्त्रिपुंड्रं द्विजोत्तमः ॥
॥ त्र्यक्षः शुद्धतरः सौम्यः शिवलोके महीयते ॥
॥ अष्टाक्षरेण मंत्रेण यः करोति त्रिपुंड्रकं ॥
॥ विष्णोः पदमवाप्नोति नान्यथा श्रुतिचोदितम् ॥
॥ सौरं पदमवाप्नोति गायत्र्या मुनिसत्तम ॥
॥ प्राप्नोति ब्रह्मणो रूपं प्रणवेन न संशयः ॥

भस्म-ललाट म्हणजे कपाळ, हृदय, नाभी, गळा, दोन्ही बाहुमूळ, आणि दोन्ही बाहुसंधि म्ह-

णजे कोपराजवळ, पाठ, व मस्तक इतक्या ठिकाणीं, दोन्ही नेत्रांच्या प्रमाणांनीं लावावें तें असेंकीं मध्य बोट, अनामिका या दोन बोटांनीं उलट सुलट दोन रेषा लावून लागलींच अंगुष्ठानें एक रेषा तशीच लावावी. भस्म उजव्या हातानें डाव्या हातावर घेऊन तें उजव्या हातानें अच्छादन करावें. आणि **अग्निरित्यादि** मंत्रानें अभिमंत्रण करून **शिवाचे** मंत्रानें अथवा ॐ **नमोनारायणाय** या अष्टाक्षर मंत्रानें अगर **गायत्री** मंत्रानें किंवा ॐकार म्हणून भस्म लावण्याचें करावें. शिवाचा मंत्र **त्र्यंबकादि** म्हणून लाविलें असतां शंकर स्वरूप होऊन शिवलोकीं पूज्य होतो. अष्टाक्षर मंत्रानें विष्णुपदाची प्राप्ति; गायत्री मंत्रानें सूर्यपदाची प्राप्ति आणि ॐकार मंत्रानें ब्रम्हरूपाची प्राप्ति होते. यांत अगदीं संशय नाहीं.

## ॥ भस्मधारणाभावी दोष ॥

॥ स्नानंदानंजपोहोमःसंध्यास्वाध्यायकर्मसु ॥
॥ ऊर्ध्वपुंड्रविहीनश्चेत्तत्सर्वंनिष्फलंभवेत् ॥ बृ० ना०

स्नान, दान, जप, होम, संध्या, स्वाध्याय हीं कर्मे भस्मधारण न केलें तर व्यर्थ होतात.

## ॥ गोपीचंदन धारण ॥

॥ गोपीचंदनसंभवंसुरुचिरं कृत्वाललाटेद्विजो ॥
॥ नित्यं धारयतेयदि प्रतिदिनंरात्रौदिवासर्वदा ॥
॥ यत्पुण्यं कुरुजांगलेरविग्रहेमाघे प्रयागेतथा ॥
॥ तत्प्राप्नोतिततोधिकंममगृहेसंतिष्ठतेदेववत् ॥
॥ यस्मिन्गृहेतिष्ठतिगोपिचंदनं भक्त्यालल्लाटेमनुजोबिभर्तिचेत् ॥
॥ तस्मिन्गृहेऽहंनिवसामिसर्वदाश्रियान्वितःकंसनिहाचतुर्मुरव ॥ स्कं॰पु॰

गोपीचंदनाचा अत्यंत सुशोभित असा ऊर्ध्वत्रिपुंड्र जो नित्य धारण करितो त्यास कुरुक्षेत्रीं व जांगल देशांत असून, सूर्यग्रहण समयीं व माघमासीं प्रयागक्षेत्रीं वास केल्याचें जें फल तें प्राप्त होऊन वैकुंठलोकीं अधिक वास करितो. ज्या गृहांत गोपीचंदन असून जो भक्तिपुरस्सर नित्य धारण करील त्याच्या गृहामध्यें लक्ष्मीसह मीं नित्य वास करीन असें भगवान विष्णूनीं ब्रम्हदेवास सांगितलें आहे.

## ॥ रुद्राक्षधारणावश्यकता ॥

॥ रुद्राक्षायस्यगात्रेषुललाटेचत्रिपुंड्रकम् ॥

॥ सचांडालोपिसंपूज्यःसर्ववर्णोत्तमोभवेत् ॥
॥ अभक्तोवापिभक्तोवानीचोनीचतरोपिवा ॥
॥ रुद्राक्षान्धारयेद्यस्तु मुच्यतेसर्व पातकैः ॥
॥ सहस्त्रंधारयेद्यस्तु रुद्राक्षाणां धृतव्रतः ॥
॥ तंनमन्तिसुराःसर्वे यथारुद्रस्तथैवसः ॥ ईश्वरः

जो शरीराचे ठिकाणीं रुद्राक्ष व कपाळी भस्म धारण करितो तो चांडाल असला तरी पूज्य होतो. अभक्त असो, भक्त असो, नीच असो, अथवा महानीच असो जो रुद्राक्ष धारण करितो, त्याचें सर्व पातक नाश पावतें. जो एक हजार रुद्राक्ष शरीरावर धारण करितो, तो देवांस पूज्य होऊन प्रत्यक्ष शंकराप्रमाणें समजावा.

॥ रुद्राक्षमुखसंख्याफल ॥

॥ एकवक्त्रः शिवःसाक्षात्ब्रम्हहत्यांव्यपोहति ॥
॥ अवंध्यत्वंप्रतिस्त्रोतोवन्हिस्तंभंकरोतिच ॥
॥ द्विवक्त्रोहरगौरीस्याद्गोवधाद्यघनाशकृत् ॥

॥ त्रिवक्त्रो ह्यग्निजन्माथ पापराशिं प्रणाशयेत् ॥
॥ चतुर्वक्त्रः स्वयं ब्रम्हा नरहत्यां व्यपोहति ॥
॥ पंचवक्त्रस्तु कालाग्निरगम्याभक्ष्यपापनुत् ॥
॥ षड्वक्त्रस्तु गुहोज्ञेयो भ्रूणहत्यादिनाशयेत् ॥
॥ सप्तवक्त्रः स्मृतो विष्णुर्भूतप्रेतभयापहः ॥
॥ एकादशमुखो रुद्रो नानायज्ञफलप्रदः ॥
॥ द्वादशास्यस्तथादित्यः सर्वरोगनिबर्हणः ॥
॥ त्रयोदशमुखः कामः सर्वकामफलप्रदः ॥
॥ चतुर्दशास्यः श्रीकंठो वंशोद्धारकरः परः ॥ नि॰ सिं॰

एक मुखाचा रुद्राक्ष प्रत्यक्ष शंकर होय. याचे धारणापासून ब्रम्हहत्यादि पातकांचा नाश, प्रतिगोष्टीची सिद्धि, आणि अग्नि व जल यांचे पासून बिलकुल भय नाहीं. दोन मुखाच्या रुद्राक्षास हर गौरी म्हणतात, तो गोहत्यादि पातकांचा नाश करणारा होय. तीन मुखी रुद्राक्षाचें नांव "अग्निजन्मा" हा सर्व पातकांचा नाश करितो. चार मुखाचा रुद्राक्ष "ब्रम्हा" हा मनुष्यहत्या दूर करितो. पांच मु-

खांचा 'कालाग्नि' याच्या धारणापासून अगम्यागमन, आणि अभक्ष्यभक्षण हीं पातकें दूर होतात. सहा मुखांचा 'गुह' यापासून गर्भहत्यादि पातकांचा नाश होतो. सात मुखी 'विष्णु' होय. याचे पासून भूतप्रेत यांचें भय नाहींसें होतें. अका मुखी रुद्राक्ष 'रुद्र' होय; याचेपासून नानाप्रकारच्या यज्ञांचें फल प्राप्त होतें. बारा मुखांचा तो 'आदित्य', याचे पासून सर्व रोगाचा नाश होतो. १३ मुखांचा तो 'काम' याचे धारणापासून सर्व मनोरथ पूर्ण होतात. चौदा मुखांचा "श्रीकंठ" याचे धारणापासून सर्व वंशाचा उद्धार होतो.

## ॥ रुद्राक्षधारणविधि ॥

॥ विनामंत्रेण यो धत्ते रुद्राक्षं भुवि मानवः ॥
॥ स याति नरकान् घोरान् यावदिंद्राश्चतुर्दश ॥
॥ पंचामृतं पंचगव्यं स्नानकाले प्रयोजयेत् ॥
॥ रुद्राक्षस्य प्रतिष्ठायां मंत्रं पंचाक्षरं तथा ॥
॥ त्रियंबकादि मंत्रं च तथा तत्र प्रयोजयेत् ॥ नि. सिं.

रुद्राक्ष धारण विना मंत्रानें म्हणजे त्याचा धारण करण्याचा जो विधि आहे, तो केल्यांवांचून

करूं नये. विना मंत्रानें धारण केले असतां चौदा इंद्र पावेतों घोर नरकवास प्राप्त होतो. रुद्राक्ष धारण करण्याचे पूर्वी रुद्राक्षांस स्नान घालून पंचामृत व पंचगव्य घालावें, आणि त्यांची प्राणप्रतिष्ठा करावी. प्राणप्रतिष्ठा करतेवेळीं पंचाक्षरी मंत्र "नमःशिवाय" आणि त्र्यंबकादि रुद्रमंत्र यांची योजना करावी, किंवा ॐ अघोर ॐ ह्रैं अघोरतर ॐ ह्रौं ह्रां नमस्ते रुद्र रूप ह्रैं स्वाहा या मंत्रानें अभिमंत्रण करून धारण करावें.

॥ रुद्राक्ष धारणा भावी दोष ॥

॥ अरुद्राक्षोजपः पुंसां तावन्मात्र फलप्रदः ॥
॥ यस्यांगे ह्यस्ति रुद्राक्ष एकोपि बहुपुण्यदः ॥
॥ विभूतिर्यस्य नो भाले नांगे रुद्राक्ष धारणम् ॥
॥ नहि वाण्यां शिवोच्चारस्तं त्यजेदन्त्यजं यथा ॥

रुद्राक्षरहित जप केला असतां तितक्या पुरतेंच फळ मिळतें. आणि रुद्राक्ष एक जरी धारण केला तरी अनंत फल प्राप्त होतें. कपाळीं भस्मधारण, शरीराचे ठिकाणीं रुद्राक्ष, धारण आणि वाणीचे ठाईं शिवनामोच्चार न करणारा पुरुष अंत्यंजसमान त्याज्य होय.

## ॥ तुळसीमाळाधारण ॥

॥ तुलसीकाष्ठसंभूतां यो मालां वहते द्विजः ॥
॥ अप्यशौचोप्यनाचारो मामवैति न संशयः ॥
॥ निवेद्य भक्त्या मां मालां तुलसीकाष्ठसंभवाम् ॥
॥ वहते यो नरो भक्त्या तस्य नास्तीति पातकम् ॥ स्कं० पु०

तुळसीच्या काष्ठांनीं निर्माण केलेली माळा जो कंठांत धारण करितो, तो अशुचि असो, व अनाचारी असो अंतःकाळीं मजप्रतच प्राप्त होतो यांत संदेह नाहीं. त्याचप्रमाणें प्रथम माळा मला समर्पण करून नंतर जो कंठांत धारण करितो, त्यास पापस्पर्श होत नाहीं असें महाविष्णूनें ब्रम्हदेवास सांगितलें आहे.

### ॥ तुळसीमाळाधारणमंत्रः ॥

॥ तुलसीकाष्ठसंभूते माले विष्णुजनप्रिये ॥
॥ बध्नामि त्वामहं कंठे कुरु मां कृष्णवल्लभम् ॥

हा मंत्र म्हणून तुळसीकाष्ठमाळा कंठाचे ठाईं धारण करावी.

## ॥ शिखाबंधनाविषयींनियम ॥

॥ स्नानेदानेजपेहोमेसंध्यायां देवतार्चने ॥
॥ शिखाग्रंथिविना कर्म न कुर्याद्वै कदाचन ॥
॥ आसनेशयनेसंगे भोजनेदंत धावने ॥
॥ शिखामुक्तिंसदाकुर्यादित्येतन्मनुरब्रवित् ॥ ग्रं०

स्नान, दान, जप, होम, संध्या, देवतार्चन, हीं कर्मे शिखेला ( शेंडी ) ग्रंथी ( गांठ ) दिल्या शिवाय कधींही करूं नये. आणि बसणें, निजणें, संभोगसमयीं, भोजनसमयीं आणि दंत धावनसमयीं शिखेला ग्रंथी देऊं नये असें मनूचें मत आहे.

## ॥ आचमनाविषयीं ॥

॥ रेतोमूत्रपुरीषाणामुत्सर्गेऽशुद्ध भाषणे ॥
॥ ष्ठीवित्वाध्ययनारंभे कासश्वासागमेतथा ॥
॥ चत्वारंवास्मशानंवासमागम्यद्विजोत्तमः ॥
॥ संध्ययोरुभयोस्तद्वदाचांतोप्याचमेत्पुनः ॥ आ०म०

॥ दानेभोजनकालेचसंध्यायोरुभयोरपि ॥
॥ आचांतः पुनराचामेज्जपहोमार्चनेषुच ॥ व्यासः

रेतस्खल झाल्यावर, मळमूत्रविसर्जनानंतर, अशुद्ध भाषणांतीं, गरड आल्यावर, कास व श्वास यांचे अंतीं, चव्हाट्याहून आल्यावर, स्मशानांतून आल्यावर, संध्या, दान, भोजन, जप, होम, आणि अर्चन इ॰ कर्मांत द्विराचमन करावें.

## ॥ आचमनविधि ॥

॥ सहतांगुलिनातोयंगृहीत्वापाणिनाद्विजः ॥
॥ मुक्तांगुष्ठकनिष्ठेनशेषेणाचमनंचरेत् ॥
॥ माषमात्रंसुवर्णस्ययत्रमज्जतिवैमणिः ॥
॥ एतदाचमनंप्रोक्तंपवित्रंकायशोधनं ॥ ना॰देव

अंगुष्ठ व कनिष्ठिका सोडून तळहाताचे ठिकाणीं एक मासा सोनें बुडेल इतकें पाणी प्रत्येक वेळीं घेत जाऊन आचमन करावें म्हणजे शरीर पवित्र होतें.

## ॥ आचमनफलं ॥

॥ त्रिःप्राश्नीयाद्यदंभस्तु प्रीतास्तेनास्यदेवताः॥
॥ ब्रह्माविष्णुश्चरुद्रश्च भवंतीत्यनुशुश्रुम ॥ शंख.
तीन वेळां केलेलें आचमन सर्व देव आणि ब्रम्हा, विष्णु, शिव यांस संतुष्ट करतें.

॥ जलाभावी आचमन ॥

॥ गंगाचदक्षिणेकर्णेनासिकायां हुताशनः॥
॥ उभयोःस्पर्शनेचैव तत्क्षणादेवशुद्धयति॥ परा॰
॥ कुर्यादाचमनंस्पर्शं गोपृष्ठस्यार्कदर्शनम्॥
॥ कुर्वीतालंभनंचापि दक्षिणश्रवणस्यच ॥ मार्क॰

द्विजाच्या उजव्या कानांत गंगा व नासिकेचे ठिकाणीं अग्नि आहे म्हणून उभयठिकाणीं स्पर्श केला असतां आचमनाचें फळ प्राप्त होतें. तसेंच गायीचे पाठीला स्पर्श केल्यानें, अथवा सूर्य दर्शनानें किंवा उजवे कानासच फक्त हातानें स्पर्श केला म्हणजे प्रत्यक्ष आचमनाचें फल प्राप्त होतें.

॥ पवित्रधारणम्॥

॥ स्नानेहोमेजपे दानेस्वाध्यायेपितृकर्मणि॥
॥ करौसदर्भौकुर्वीत तथासंध्याभिवादने ॥ प्र॰पा॰

स्नान, होम, जप, दान, स्वाध्याय, पितृकर्म, आणि संध्यावंदन इत्यादि कर्मांत दर्भाचें पवित्र धारण करावें.

॥ दर्भपवित्राभावी अन्यपवित्र ॥

॥ अन्यान्यपिपवित्राणिकुशदूर्वामयानिच ॥
॥ हेमात्मकपवित्रस्य कलान्नार्हंतिषोडशीम् ॥ हेमाद्रौ

कुशदुर्वादि अनेक पवित्रें आहेत परंतु तीं सोन्याच्या पवित्राच्या सोळाव्या हिश्शाचीही बरोबरी करीत नाहींत-म्हणजे कुशदुर्वादि पवित्रांपेक्षां १६ पट अधिक फळ सोन्याचें पवित्र देतें.

॥ सोन्याचे पवित्राचें प्रमाण ॥

॥ माषाणां षोडशादूर्ध्वं कुर्याद्धेमपवित्रकम् ॥
॥ तेभ्यःस्वल्पतरंन्यूनंनकुर्वीतकदाचन ॥ ना॰दे॰

सोन्याचें पवित्र सोळा माशांचें किंवा त्यापेक्षां ज्यास्त वजनाचें करावें. परंतु सोळा माशांपेक्षां

किंचित्‌ही कमी करूं नये. शास्त्रमानानें "पंचगुंजोभवेन्माषः" या वाक्यावरून सोळा माशां-च्या गुंजा ८० होत. सबब या मानानें पवित्र करावें.

## ॥ प्राणायाम ॥

॥ प्राणायामैर्विनायद्यत्‌कृतंकर्मनिरर्थकम्‌ ॥
॥ अतोयत्नेनकर्तव्यःप्राणायामःशुभार्थिना ॥ अ॰ सं॰
॥ सव्याहृतिंसप्रणवांगायत्रींशिरसासह ॥
॥ त्रिःपठेदायतप्राणःप्राणायामःसउच्यते ॥ याज्ञ॰

प्राणायामावांचून केलेलें कर्म निष्फल होतें; या करितां कल्याणेच्छु पुरुषानें प्राणायाम अवश्य करावा. व्याहृति, ॐकार आणि शिरोभाग यांसह तीन वेळां गायत्रिमंत्राचें पठण करून प्राणायाम करावा

## ॥ प्राणायामप्रकार ॥

॥ दक्षिणेरेचयेद्वायुंवामेनापूरितोदरम्‌ ॥
॥ कुम्भकेनजपंकुर्यात्प्राणायामोभवेदिति ॥ कात्या॰

॥ पंचाङ्गुलीभिर्नासाग्रंपीडयेत्प्रणवेनवै ॥
॥ मुद्रेयंसर्वपापघ्नीवानप्रस्थगृहस्थयोः॥
॥ कनिष्ठानामिकांगुष्ठैर्यतेश्चब्रम्हचारिणः॥ प्र०पारि०

गृहस्थ आणि वानप्रस्थ यांनीं उजव्या हाताच्या पांची बोटांनीं नाक धरून उजवी नाकपुडी दाबावी आणि प्रथम डाव्या नाकपुडीनें "ॐ भुः" पासून "स्वरोम्" पर्यंत म्हणत वायु वर ओढावा; यास "पूरक" म्हणतात. नंतर दोन्ही नाकपुडया दाबून "ॐ भुः" पासून "स्वरोम्" पर्यंत म्हणत वायूस स्तब्ध ठेवावें; यास "कुंभक" म्हणतात. व पुनः "ॐ भुः" पासून "स्वरोम्" पर्यंत म्हणत उजवी नाकपुडी मोकळी करून सावकाश वायु सोडावा; यास "रेचक" म्हणतात. या प्रमाणें प्राणायाम करावा. ब्रह्मचारी आणि सन्याशी यांनीं आंगठा, करंगळी आणि अनामिका या तीन बोटांनींच नाक धरून वरील प्रमाणें प्राणायाम करावा.

॥ प्राणायामफल ॥

॥ यथापर्वतधातूनांदोषान् दहतिपावकः॥
॥ एवमंतर्गतंपापं प्राणायामेनदह्यते ॥ ना०दे०

॥ यदन्हाकुरुतेपापंकर्मणामनसागिरा ॥

॥ त्रिकालसंध्याकरणात्प्राणायामैर्व्यपोहति ॥ स्मृ.सं.

अग्नि ज्या रीतीनें पर्वत व सुवर्णादि धातु यांतील दोष तापानें नाहींसें करितो त्याप्रमाणें शरीरांतील सर्व पातकें प्राणायाम केल्यानें नाहींसे होतात. तसेंच संध्या न झाल्यामुळें जो दोष लागतो तो व कायीक, वाचिक व मानसिक दोष हे ही प्राणायाम केल्यानें नाशाप्रत पावतात.

॥ मार्जनकरण्याचेंफल ॥

॥ गंगायांवापिकायाचतडागेचतथैवच ॥

॥ वामहस्तेजलगृण्हन्नकुर्यान्मार्जनंद्विजः ॥

॥ पात्रस्थितोदकेनैववामहस्तोदकेनवा ॥

॥ संध्यायांमार्जनंकुर्यात्गृहेचेत्यब्रवीन्मनुः ॥

॥ संवत्सरकृतंपापंमार्जनेनविनश्यति ॥

॥ वामांगुलिमधःस्थाप्यश्रीतुलस्याकुशैर्द्विजः ॥

॥ तर्जनीमध्यमाभ्यांवामूर्ध्निसिंचेज्जलंद्विजः ॥ ऋ.

नदी, बारव, तलाव इतक्याठिकाणीं डाव्या हातांत पाणी न घेतां आंतील जल दर्भानें घेऊन मार्जन करावें. घरीं मात्र एखाद्या पात्रांत किंवा डाव्या हातांत पाणी ग्रहण करून मार्जन करावें. मार्जन केल्यानें एका वर्षांत झालेलें पाप नाहींसें होतें. मार्जन दर्भानें, तुळसीपत्रानें किंवा तर्जनीनें व मधल्या बोटानें मस्तकावर करावें.

## ॥ अघमर्षण ॥

॥ उद्धृत्यदक्षिणेहस्तेजलंगोकर्णवत्कृते ॥
॥ निःश्वासंनासिकाग्रेतुपाप्मानंपुरुषंस्मरेत् ॥
॥ दक्षनासापुटेनैवपाप्मानमपसारयेत् ॥
॥ तज्जलंनावलोक्यातवामभागेक्षितोक्षिपेत् ॥ शौन०
॥ मनोवाक्कायजंसर्वंक्षपयेदघमर्षणात् ॥ ऋ.वि.

गोकर्णाकृति हातांत जल घेऊन नाकाच्या अग्राजवळ न्यावें आणि पाप पुरुषाचें स्मरण करून उजव्या नाकपुडींतून त्यास बाहेर काढावें ( अशी भावना करावी ) व नंतर तें पाणी न पाहतां डाव्या बाजूकडे जमिनीवर टाकावें. या अघमर्षणानें सर्व शरीरांतील कायिक, वाचिक व मानसिक

पातक निघून जातें.

॥अर्घ्यदान व त्याचें फल॥

॥ ईषन्नम्रः प्रभाते तु मध्यान्हे ऋजुसंस्थितः॥
॥ द्विजोऽर्घ्यं प्रक्षिपेद्देव्या सायं तूपविशन्भुवि॥ दौ.
॥ कराभ्यां तोयमादाय गायत्र्या चाभिमंत्रितम्॥
॥आदित्याभिमुखस्तूष्णीं त्रिरूर्ध्वं संध्ययोः क्षिपेत्॥
॥ सकृदेव तु मध्यान्हे क्षेपणीयं द्विजातिभिः॥ व्या.
॥ गायत्रीं शिरसा हीनां महाव्याहृतिपूर्वकाम्॥
॥ प्रणवाढ्यां जपंस्तिष्ठंश्च क्षिपेदंजलित्रयम्॥
॥ द्वौ पादौ तु समौ कृत्वा पूरयेदुदकांजलीन्॥
॥ गोशृंगमात्रमुत्क्रम्य जलमध्ये जलं क्षिपेत्॥
॥ तेन वज्रोदकेनाशु मंदेहा नाम राक्षसाः॥
॥ सूर्योदयः प्रलीयंते शैला वज्रहता इव॥

॥ काललोपोनकर्तव्योद्विजेनस्वहितेच्छुना ॥
॥ अर्द्धोदयास्तसमयेतस्माद्वज्रोदकंक्षिपेत् ॥
॥ प्रायश्चित्तार्थमाचम्यमुच्यतेदैत्यहत्यया ॥ सं.

प्रातः कालीं किंचित् लवून मध्यान्ह कालीं सरळ उभे राहून, व सायंकाळीं खालीं बसून दोन्ही हातांत गायत्री मंत्रानें अभिमंत्रित केलेलें उदक ग्रहण करून, सूर्याकडे मुख करून तीन वेळां वर फेंकावें. मध्यान्हीं मात्र एक वेळ फेंकावें, व हातांत पाणी घेतेवेळीं शिरोभाग रहित व महाव्याहृति ॐकार यानीं युक्त गायत्रिमंत्र जपावा; नंतर दोन्ही पाय सारखे जोडून गाईचे शिंगा इतकें उंच उडवून तें जल जलांत टाकावें. हें दिलेलें अर्घ्यजल वज्रासारखें होऊन पर्वताप्रमाणें 'मंदेह' नामक सूर्याचे शत्रु नष्ट करितें. अर्थात् सूर्यनारायण स्वशत्रु नष्ट झाल्यामुळें अर्घ्यदात्याचें चतुर्विध पुरुषार्थ परिपूर्ण करितो. यास्तव कल्याणेच्छु पुरुषानें काल न घालवितां अर्धोदयाला व अर्धास्त समयाला अवश्य अर्घ्यदान करावें. व दैत्यरूपी ब्राम्हण हत्येपासून मुक्त होण्याकरितां आचमन करावें किंवा 'असावादित्योब्रम्हा' या मंत्रानें प्रदक्षिणा करून अंगाभोवतीं पाणी फिरवावें.

## ॥ गायत्रिजप, संख्यावत्याचें फल ॥

॥ ध्यायेत्तु मनसा मंत्रं जिह्वौष्ठौ न विचालयेत् ॥<br>
॥ न कंपयेच्छिरोग्रीवां दंतान्नैव प्रकाशयेत् ॥ याज्ञ.

॥ प्रातर्नाभौ करं कृत्वा मध्यान्हे हृदि संस्थितम् ॥<br>
॥ सायं जपति नासाग्रे जपस्तु त्रिविधः स्मृतः ॥

॥ प्रातर्मध्यान्हयोस्तिष्ठन् गायत्रीजपमारभेत् ॥<br>
॥ ऊर्ध्वजानुस्तु सायान्हे ध्यानालोकनतत्परः ॥ ध. प्र.

॥ पर्वभिस्तु जपेद्देवीं माला काम्यजपे स्मृता ॥<br>
॥ गायत्री वेदमूलास्याद्वेदः पर्वसु गीयते ॥

॥ आरभ्यानामिका मध्यं पर्वाण्युक्तान्यनुक्रमात् ॥<br>
॥ तर्जनीमूलपर्यंतं जपेद्दशसु पर्वसु ॥

॥ मध्यमांगुलिमूले तु यत्पर्वद्वितयं भवेत् ॥<br>
॥ तं वै मेरुं विजानीयाज्जपे तं नातिलंघयेत् ॥ गा॰ कल्पे.

॥ अष्टोत्तरशतंनित्यमष्टाविंशतिरेववा ॥
॥ विधिनादशकंवापित्रिकालेषुजपेद्बुधः॥ व्या.
॥ ॐकारपूर्वमुच्चार्यभूर्भुवस्वस्तथैवच ॥
॥ गायत्री प्रणवश्चांतेजपएवमुदाहृतः ॥
॥ सप्तभिःपावयेद्देहं दशभिःप्रापयेद्दिवं ॥
॥ विंशत्यावर्तितादेवीनयतेचेश्वरालयम् ॥
॥ अष्टोत्तरशतंजप्तातारयेज्जन्मसागरात् ॥ याज्ञ.
॥ नतथावेदजपतःपापंनिर्दहतिद्विजः ॥
॥ यथासावित्रिजपतःसर्वपापैःप्रमुच्यते ॥ बृह॰
॥ वस्त्रेणाच्छाद्यतु करं दक्षिणंयःसदाजपेत् ॥
॥तस्यस्यात्सफलंजाप्यंतद्धीनमफलंस्मृतम् ॥ वृ.म.

जिव्हा, ओष्ठ, मस्तक, व ग्रीवा न हालवितां व दांत बाहेर न दिसूं देतां एकाग्रचित्तानें गायत्री मंत्रोच्चार करावा. – प्रातःकाळीं नाभीजवळ, मध्यान्हकाळीं, हृदयाजवळ आणि सायंकाळीं नाकाज,

वळ हस्त धरून जप करावा. प्रातःकाळीं व मध्यान्ही उभे राहून व सायंकाळीं उकड बसून जप करावा. वेद हा गायत्रीचें मूळ आहे तो ब्राह्मणाचे अंगुली पर्वाचे(पेरे) ठिकाणीं मानला जातो सबब त्यांनीं (पर्वानीं) जप करावयाचा तो येणें प्रमाणें अनामिकेच्या मधल्या पेऱ्यापासून तर्जनीच्या खालील पेऱ्यांपर्यंत दहाची संख्या करावी. रुद्राक्षादिकांची माळा काम्यजपास सांगितली आहे. एकशें आठवेळां जप करणें हा मुख्यपक्ष आहे; व अठ्ठावीस वेळां अथवा दहावेळांही जप करण्यास सांगितलें आहे; परंतु तो गौणपक्ष आहे. जप करतेवेळीं प्रथमतः ॐकार नंतर महाव्याहृति (भूर्भुवस्वः) उच्चारून नंतर गायत्री म्हणून अंतीं ॐकार पठण करावा. व तो जप सात वेळ केला असतां देहशुद्धि व दहावेळ केल्यास स्वर्गप्राप्ति वीस वेळां केले असतां कैलास अगर वैकुंठ याची प्राप्ति व अष्टोत्तर शतवेळां (१०८) केल्यास जन्ममरण परंपरा सुटते. फारतर काय सांगावें सर्व वेदाच्या जपानें सुद्धां जें पाप नष्ट होत नाहीं तें पाप गायत्री जपानें नाहींसें होतें. उजवा हात वस्त्रांनीं वेष्टित करून केलेला जप सफळ होतो, तसें न केल्यास निष्फळ होतो. या करितां वस्त्र अगर गोमुखी घेऊन जप करावा. — हल्लीं जानवें धरून जप करण्याचा प्रघात आहे, पण त्यास कोठें आधार नसून उलट फार दोष सांगितला आहे. करितां जानवें धरून जप करूं नये.

॥ संध्यावश्यकता, फल आणि अभावी दोष ॥

॥ संध्यामुपासते ये तु सततं शंसितव्रताः ॥
॥ विधूतपापास्ते यांति ब्रम्हलोकं सनातनम् ॥ अत्रिः
॥ यावंतोस्यां पृथिव्यां हि विकर्मस्थास्तु वै द्विजाः ॥
॥ तेषां वै पावनार्थाय संध्या सृष्टा स्वयंभुवा ॥ या०
॥ संध्या येन न विज्ञाता संध्या येनानुपासिता ॥
॥ जीवमानो भवेच्छूद्रो मृतः श्वा चाभिजायते ॥ मरि०
॥ संध्याहीनोऽशुचिर्नित्यमनर्हः सर्वकर्मसु ॥
॥ यदन्यत्कुरुते कर्म न तस्य फलभाग्भवेत् ॥ दक्ष.

जे यथोक्त नियमानें संध्योपासना करितात ते द्विज निष्पाप होऊन ब्रह्मलोकाप्रत जातात. द्विजांच्या हातून जीं अनेक पातकें घडतात त्यांच्या नाशार्थ ब्रह्मदेवानें संध्या उत्पन्न केली आहे. ज्याला संध्याज्ञान नाहीं व जो संध्योपासना करीत नाहीं तो याच जन्मीं शूद्रप्राय होतो. व मरणानंतर कुत्र्याचे जन्मास जातो. संध्या न करणारा पुरुष अपवित्र व सर्व कर्मांत अयोग्य मानला आहे, त्यानें केलेलीं कर्में निष्फल होतात.

## ॥ पूजाविधि ॥

### ॥ प्रतिमादि विचार ॥

॥ सौवर्णीराजतीवापि ताम्रीरत्नमयीतथा ॥

॥ शैलीदारुमयीवापि लोहसंघमयीतथा ॥

॥ अंगुष्ठपर्वादारभ्यवितस्तिंयावदेवतु ॥

॥ गृहेषु प्रतिमाः कार्यानाधिकाशस्यतेबुधैः ॥ मात्स्ये.

॥ एकमूर्तिर्नपूज्यैवगृहिणास्वेष्टमिच्छता ॥

॥ अनेकमूर्तिसंपन्नः सर्वान् कामानवाप्नुयात् ॥

॥ गृहेलिंगद्वयंनार्च्यं गणेशत्रितयंतथा ॥

॥ शंखद्वयं तथासूर्यौ नार्च्यौशक्तित्रयंतथा ॥

॥ द्वेचक्रे द्वारकायाश्च शालिग्रामशिलाद्वयम् ॥

॥ तेषांतुपूजनेनैवउद्वेगंप्राप्नुयाद्गृही ॥ स्मृ०

॥ शालिग्रामशिलायास्तु प्रतिष्ठानैवविद्यते ॥ स्कां०

॥ बाणलिंगानि राजेन्द्र ख्यातानि भुवनत्रये ॥
॥ न प्रतिष्ठा न संस्कारस्तेषां चावाहनं तथा ॥ भवि॰
॥ कंबुश्चक्रं शैलभवा नार्मदेयाब्जिनीपती ॥
॥ बाणो विष्णुशिला चैषां प्रतिष्ठां नैव कारयेत् ॥ मार्कं॰
॥ शैलीं दारुमयीं हैमीं धात्वाद्याकारसंभवाम् ॥
॥ प्रतिष्ठां वै प्रकुर्वीत प्रासादे वा गृहे नृप ॥ वृ॰पा॰

पूजेकरितां देवाच्या मूर्ति करणें त्या सोनें, रुपें, तांबें, रत्नें, पाषाण, लांकूड आणि पंचधातु इत्यादि आपल्या अनुकूलतेनुरूप कराव्या. त्या अशा कीं:- अंगुष्ठाच्या पर्वाहून लहान नसून वीतभरापेक्षां मोठया नसाव्या. अशा प्रकारची मूर्ति घरच्या पूजेस असावी. घरीं एकच मूर्ति न पूजितां अनेक मूर्ति पुजाव्या, म्हणजे सर्व कामना पूर्ण होतात. घरच्या देवांत २ लिंगें; गणपती ३; शंख २; सूर्य २; देवी ३; द्वारकाचक्रें २; शालिग्राम २; असे न पूजितां यांपेक्षां कमीज्यास्त असावे. कारण याप्रमाणें पूजिले असतां त्या घरांत संकटें प्राप्त होतात. सोनें, रुपें इत्यादि धातुमूर्ति नवीन केल्यावर प्राणप्रतिष्ठादि संस्कार आणि नित्यशः आवाहन विसर्जन करीत जावें

परंतु शंख, चक्रांकित, बाण, नर्मदेंतील गणपती, सूर्यकांत आणि शालिग्राम यांचा प्राण प्रतिष्ठादि संस्कार किंवा रोज अवाहन आणि विसर्जन करूं नये. कारण यांचे ठिकाणीं अक्षेय्य देवतावास आहे.

॥ पूजेचाकाल ॥

॥ प्रातर्मध्यंदिने सायं देवपूजां समारभेत् ॥

॥ अशक्तो विस्तरेणैव प्रातः संपूज्य केशवम् ॥ मात्स्ये.

देवपूजा त्रिकाल, म्हणजे- प्रातःकालीं, माध्यान्हकालीं व सायंकालीं ही करावी. याप्रमाणें न झाल्यास प्रातःकालींच यथासांग अनुकूलते प्रमाणें भक्तिपुरःसर करावी.

॥ पंचायतन मांडण्याचे प्रकार ॥

गण॰ पं॰ ॥ हेरंबंतु यदा मध्ये ऐशान्यामच्युतं यजेत् ॥
॥ आग्नेय्यां पंचवक्त्रं तु नैर्ऋत्यां तु द्युमणिं यजेत् ॥
॥ वायव्यामंबिकां चैव यजेन्नित्यमतंद्रितः ॥

शिवपं॰ ॥ यदा तु शंकरं मध्ये ऐशान्यां श्रीपतिम्यजेत् ॥

॥ आग्नेय्यांच तथा हंसं नैर्ऋत्यां पार्वती सुतम् ॥
॥ वायव्यांच सदा पूज्या भवानी भक्तवत्सला ॥

विष्णु पं०- ॥ यदातु मध्ये गोविंद मैशान्यां शंकरं यजेत् ॥
॥ आग्नेय्यां गणनाथंच नैर्ऋत्यां तपनंतथा ॥
॥ वायव्यामंबिकांचैव यजेन्नित्यं समाहितः ॥

देवी पंचा० ॥ भवानी तु यदा मध्ये ऐशान्यां माधवं यजेत् ॥
॥ आग्नेय्यां पार्वती नाथं नैर्ऋत्यां गणनायकम् ॥
॥ प्रद्योतनं तु वायव्यामाचार्यस्तु प्रपूजयेत् ॥

सूर्य पं०- ॥ सहस्त्रांशुर्यदा मध्ये ऐशान्यां पार्वतिपतिम् ॥
॥ आग्नेय्यामेकदंतंच नैर्ऋत्यामच्युतं तथा ॥
॥ वायव्यां पूजयेद्देवीं भोगमोक्षैक भूमिका ॥

याचा अर्थ स्पष्ट समजण्या करितां खालीं आकृति करूनच दाखविला आहे.

शिव पंचायतन




देवी पंचायतन




विष्णु पंचायतन




गणपती पंचायतन




सूर्य पंचायतन



॥ कलशादिकांचाविचार ॥

॥ सुवासितजलैः पूर्णं सव्ये कुंभंसुपूजयेत् ॥
॥ कलशस्येति मंत्रेण तीर्थान्यावाहयेत्ततः ॥
॥ शंखमद्भिः पूरयित्वा प्रणवेनच दक्षिणे ॥
॥ संपूज्यत्वंपुरेत्यादि मंत्रेण प्रार्थयेत्ततः ॥ पू॰ सा॰
॥ महाभिषेकं सर्वत्र शंखेनैव प्रकल्पयेत् ॥
॥ सर्वत्रैव प्रशस्तोब्जः शिवसूर्यार्चनं विना ॥
॥ घंटां संपूज्यमध्येत्वागमार्थमितिवादयेत् ॥ तं॰ तरे
॥ दीपं दक्षिणतोदद्यात् पुरोनैवतुवामतः ॥
॥ वामतस्तुतथाधूपमग्रेवानतुदक्षिणे ॥ यामले
॥ धूपेनीराजने स्नाने पूजाकाले विलेपने ॥
॥ ममाग्रेवादयन् घंटां मुक्तमंलभतेफलम् ॥ वि॰ ध॰
॥ उत्तोल्यदृष्टिपर्यंतं घंटांवामदिशिस्थिताम् ॥

॥ वादयन्वामहस्तेन दक्षहस्तेन चार्चयेत् ॥ गीत.

पूजेच्या वेळीं सुवासित गंधपुष्पांनीं युक्त असा उदकानें भरलेला कलश ( तांब्या ) आपल्या डाव्या बाजूस ठेवावा; नंतर त्याची पूजा करून त्यांत "कलशस्येत्यादि" मंत्रानें तीर्थाचें अवाहन करावें. तसेंच ॐकार म्हणून शंखजलपूरित करावा. शंख आपल्या उजव्या बाजूस ठेवून त्याची पूजा करावी; आणि "त्वंपुरेत्यादि" मंत्रानें त्याची प्रार्थना करावी. शिव आणि सूर्य यांचे शिवाय सर्व देवांस शंखोदकानें अभिषेक करावा. घंटा आपले डावे बाजूस ठेवावी, व तिची पूजा करून "आगमार्थंतु" या मंत्रानें घंटा वाजवावी. धूप, दीप, आरती, स्नान, पूजा आणि विलेपन समयीं घंटानाद करावा. डाव्या हातानें घंटा वाजवीत उजवे हातानें कर्म करीत जावें. दीप आपले उजवे बाजूस व धूप डावे बाजूस ठेवावा.

## ॥ शंखघंटावश्यकता ॥

॥ नित्यंसंस्नापयेद्यो मां शंखेन सुरसत्तम ॥
॥ गंगास्नानफलं प्राप्य नित्यं नंदति देववत् ॥
॥ शंखे तोयं समादाय यः स्नापयति मां सुत ॥

॥ नमोनारायणेत्युक्त्वा मुच्यते सर्व किल्बिषैः ॥
॥ नाद्यंतडागजंवापि वापीकूपादिजंचयत् ॥
॥ गांगेयं जायतेसर्वं जलशंखकृतंचयत् ॥
॥ मदीयार्चनवेलायां घंटानादं करोतियः ॥
॥ नश्यंतितस्यपापानि शतजन्मार्जितान्यपि ॥
॥ विधिबाह्यात्कृतापूजा सफलाजायतेनृणाम् ॥
॥ घंटानादेन तुष्टोहं प्रयच्छामिस्वकंपदम् ॥
॥ घंटादंडस्यशिरसि सुचक्रं स्थापयेत्तुयः ॥
॥ मत्प्रियं वैनतेयं वास्थापितं भुवनत्रयम् ॥
॥ अभावे वैनतेयस्य चक्रस्यापि नसंशयः ॥
॥ घंटानादेन भक्तानां प्रसादं प्रकरोम्यहम् ॥ स्कं॰पु॰

भगवंतानें ब्रम्हदेवास असें सांगितलें आहे कीं, जो नित्यशः मला शंखोदकानें स्नान घालि-तो त्याला नित्य गंगास्नानाचें फल प्राप्त होऊन तो देवाप्रमाणें आनंद पावतो. शंखांत उदकपा-

लून व " नमोनारायणाय " हा मंत्र म्हणून जो मला शंखोदकानें स्नान घालितो तो सकलपापापासून मुक्त होतो. नदी, तळें, विहीर इत्यादिकांतील जल शंखांत घातलें असतां तें गंगोदकासमान होतें. तसेंच जो माझे पूजनसमयीं घंटा वाजवितो त्याचीं शतजन्मांचीं पातकें भस्म होतात. विधिहीन पूजा असूनही त्यांत जर घंटानाद आहे तर त्यानेंच मी संतुष्ट होऊन त्यास स्वपद देतों. ज्यानें घंटेच्या दांड्यावर उत्तमप्रकारचें चक्र अथवा मला अतिप्रिय असा गरूड स्थापन केला आहे त्यानें त्रैलोक्य स्थापन केलें असें जाणावें. गरूड किंवा चक्र जरी नसेल तरी घंटेचा शब्द करावा. केवळ घंटेचा जरी शब्द मीं श्रवण केला तरी त्यास प्रसन्न होऊन त्यावर प्रसाद करितों.

## ॥ गंधपुष्पादि विचार ॥

॥ सर्वेषुगंधजातेषु प्रशस्तो मलयोद्भवः ॥
॥ तस्मात्सर्व प्रयत्नेनदद्यान्मलयजंसदा ॥
॥ गंधेनलभतेकामंगंधोधर्म प्रदःसदा ॥
॥ अर्थानांसाधकोगंधोगंधेमोक्षःप्रतिष्ठितः ॥ वाच॰
॥ तुलसीकाष्ठसंभूतंचंदनंयच्छतेमम ॥

॥ दह्यामि पातकं सर्वं पूर्वजन्म शतैकृतम् ॥
॥ सर्वेषामेव देवानां तुलसीकाष्ठचंदनम् ॥
॥ पितृणां च विशेषेण सदाभीष्टं यथा मम ॥
॥ मल्लिका मालती चैव यूथिका चातिमुक्तका ॥
॥ पाटला करवीरं च जयंती विजया तथा ॥
॥ कुब्जकस्तवकश्चैव कर्णिकारं करंटकः ॥
॥ चंपकश्चातकः कुंदो बाणकर्चूरमल्लिकाः ॥
॥ अशोकस्तिलकश्चैव तथैवापूरयूथिकः ॥
॥ शमीपुष्पप्रकाशस्तु शस्तो मे पूजने सुत ॥
॥ येषां संति च पुष्पाणि प्रशस्तानि ममार्चने ॥
॥ तेषां पत्राणि शस्तानि तदभावे फलानि च ॥
॥ एतैः पत्रैश्च पुष्पैश्च फलैश्चापि तथा हि माम् ॥
॥ अर्चन् दशसुवर्णस्य प्रत्येकं फलमश्नुते ॥

॥ धनं पुत्रं तथादारान् यत्किंचिद्वांछतेहिसः ॥
॥ तत्तद्ददामिविप्रेन्द्र पुष्पैरेभिः प्रतोषितः ॥ स्कं॰ पु॰

सर्व चंदनांत मलय पर्वतापासून उत्पन्न झालेलें चंदन उत्तम असून तें प्रयत्नें करून परमेश्वरास अर्पण करावें. चंदन अर्पण केल्यानें धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त होतात. तसेंच तुळसीचें काष्ठ उगाळून निर्माण केलेलें चंदन जो विष्णूस अर्पण करितो त्याचे अनंत जन्मांचे पातकांचा क्षय होतो. तुळसीकाष्ठाचें चंदन सर्व देवांस प्रिय असून पितरांसही अतिप्रिय आहे. भगवंताचे पूजेस प्रशस्त पुष्पें मोगरा, मालती, जुई, कण्हेर, ( तांबडा व त्याहीपेक्षां पांढरा फार प्रिय ) कुसरी, पाटला, जयंती, विजया, कुब्जक, स्तबक, कर्णिकार, कुरंटक, चांपा, चातक, कुंद, बाण, कचूर अशोक, तिलक, अपूर युथिक, शमीपुष्प इ॰ असून प्रभूची प्रीति उत्पन्न करणारे होत. हीं पुष्पें न मिळाल्यास त्या वृक्षांचीं पानें अगर फळें करून पूजन केलें असतां दशभार सुवर्ण दानाचें प्रत्येक पुष्पाचें फल असून त्यांस द्रव्य, पुत्र, स्त्री इ॰ जेंजें इच्छील तेंतें प्राप्त होईल.

॥ वर्ज्य पुष्पें ॥

॥ कृमिकीटावपन्नानिशीर्णपर्युषितानिच ॥

॥ स्वयंपतितपुष्पाणि त्यजेदुपहितानिच ॥
॥ कुसुमैर्नार्चयद्देवमपक्वंननिवेदयेत् ॥
॥ शूद्रानीतैः क्रयक्रीतैः कर्मकुर्वन्पतत्यधः ॥
॥ तथादेवोपरि धृतंवामहस्तेनयद्धृतम् ॥
॥ अधोवस्त्रधृतंचैवजलेन क्षालितंचयत् ॥
॥ देवतास्तन्नगृण्हंति पुष्पंनिर्माल्यतांगतम् ॥ भवि०
॥ अक्षतैर्नार्चयेद्विष्णुं न तुलस्याविनायकम् ॥
॥ तदूर्वयायजेद्दुर्गांनोन्मत्तेनदिवाकरम् ॥ भट्टिः
॥ प्रहरंतिष्ठतेजाती करवीरमहर्निशम् ॥
॥ तुलस्यांबिल्वपत्रेषु सर्वेषुजलजेषुच ॥ स्कं०

कृमिकीटकयुक्त, शिळें, फाटलेलें, आपोआप गळलेलें, मळकट, न उमललेलें कच्चें, शूद्रांनीं दिलेलें विकत घेतलेलें पुष्प पूजेस वर्ज असून, या पुष्पांनीं पूजा केली असतां अधःपात होतो. एकदां वाहिलेलें, डाव्या हातांत धरलेलें, नेसत्या वस्त्रांत ठेवलेलें, पाण्यानें धुतलेलें, पुष्प देवता ग्रहण करीत

नसून तें निर्माल्यवत् होय. विष्णूस अक्षता, गणपतीस तुळस, देवीस दुर्वा, सूर्यास धोत्र्याचें फूल वर्ज्य आहे. जाईचें पुष्प एक प्रहर पर्यंत व कण्हेरीचें अहोरात्र शिळें होत नाहीं. तुळशी, बेल व जलांत उत्पन्न होणारीं कमलादि पुष्पें यांचे ठिकाणीं शिळेपणाचा दोष नाहीं. तसेंच माळयांनीं आपल्या घरीं आणून ठेविलेल्या पुष्पादिकांसही शिळेपणाचा दोष नाहीं.

## ॥तुलसी व बिल्वविचार॥

॥मणिकांचनपुष्पाणि तथा मुक्तामयानच ॥
॥तुलसीपत्रदानस्य कलांनार्हति षोडशीम् ॥
॥ तुलसीमंजरीभिर्यः कुर्याद्वै ममपूजनम् ॥
॥ नसगर्भगृहान् पापान्मुक्तिभागी भवेन्नरः ॥
॥ वर्ज्यं पर्युषितं पुष्पं वर्ज्यं पर्युषितंजलम् ॥
॥ नवर्ज्यं तुलसीपत्रं नवर्ज्यं जान्हवीजलम् ॥ स्कं॰ पु॰
॥ त्रिजटापत्रकैश्चैव सहांबं हरमर्चयेत् ॥
॥ कैवल्यं तस्यतेनैव शक्तिपूजाविशेषतः ॥

॥ पत्रं पुष्पं फलं तोयं नैवेद्यं धूपदीपकौ ॥
॥ दत्वा यद्यत्फलं प्राप्यं तस्मात्कोटिगुणं भवेत् ॥
॥ पत्रं वा यदि वा पुष्पं फलं नष्टमधोमुखं ॥
॥ यथोत्पन्नं तथा देयं बिल्वमत्र मधोमुखम् ॥
॥ षण्मासानंतरं बिल्वपत्रं पर्युषितं भवेत् ॥
॥ पूज्या एतेन वै देवाः सूर्यलंबोदरौ विना ॥ पटले

रत्नखचित पुष्पें, सुवर्णपुष्पें, व मोतीं जरी परमेश्वरास अर्पण केलीं तरी तुळसीपत्राच्या एका सोळाव्या कळेची सुद्धां बरोबरी होत नाहीं. जो तुळसीच्या मंजरीनें प्रभूचें पूजन करितो, त्याला पुनः गर्भवास नसून तो मुक्त होतो. शिळें पाणी व पारोशीं पुष्पें वर्ज करावीं, परंतु तुळसी व गंगोदक कितीही दिवसांचें असलें तरी त्यांचा त्याग करूं नये. बिल्वपत्रांनीं पार्वतीसहित शंकराची पूजा करावी. आणि त्याच प्रमाणें शक्तीचीही करावी. पत्र, पुष्प, फल, जल, नैवेद्य, धूप आणि दीप यांनीं जें फल प्राप्त होतें त्याचे कोटिपट अधिक फल बिल्वपत्र अर्पण केल्यानें प्राप्त होतें. पत्र, पुष्प, आणि फल हीं ऊर्ध्व म्हणजे जशीं उत्पन्न होतात तशीं वाहवीं, व बिल्वपत्र अधोमुख वाहवें. बिल्वपत्र सहा महिन्यानंतर शिळें होतें. बिल्वपत्रांनीं

गणपती व सूर्य यांच्याशिवाय सर्व देवांची पूजा करावी.

॥ तुळसी आणि बिल्वग्रहणविचार ॥

॥ वैधृतौच व्यतीपाते भौम भार्गव भानुषु ॥
॥ पर्वद्वयेच संक्रांतौ द्वादश्यां सूतके द्वये ॥
॥ तुलसीं येविचन्वंतिते छिंदंति हरेः शिरः ॥ ध.सिं.
॥ देवार्थे तुलसीछेदो होमार्थे समिधांतथा ॥
॥ इंदुक्षयेन दुष्येत गवार्थे तु तृणस्यच ॥
॥ अस्नात्वा तुलसीं छित्वा यः पूजां कुरुतेनरः ॥
॥ सोपऽराधि भवेत्सत्यं तत्सर्वं निष्फलं भवेत् ॥ प.पु.
॥ कुहु पुर्णेन्दु संक्रांतौ अष्टम्यां इंदुवासरे ॥
॥ बिल्वपत्र न छेद्यंच छेद्यंच नरकंव्रजेत् ॥ स्मृ.सं.

वैधृति, व्यतीपात्, मंगळवार, शुक्रवार, रविवार, पौर्णिमा, आमावास्या, संक्रांत, द्वादशी, जननाशौच, आणि मृताशौच; या दिवशीं तुळसी तोडूं नयेत; तोडल्यास हरीचें शिर छेदाप्रमाणें दोष सांगितला आहे.

तथापि देवाकरितां तुलसी, होमाकरितां समीधा, आणि गाईकरितां गवत यांचा छेद अमावास्येला करावा स्नानापूर्वी तोडलेल्या तुलसींनीं पूजा करणारा अपराधी होऊन त्यानें केलेलें कर्म निष्फळ होतें. – आमावास्या, पौर्णिमा, संक्रांत, अष्टमी, सोमवार या दिवशीं बेल तोडूं नये. तोडलें असतां नरकाची प्राप्ति होते.

**तुलसीग्रहणमंत्रः – तुलस्यमृतजन्मासिसदात्वं केशवप्रिया ॥ केशवार्थेचिनोमित्वां वरदाभवशोभने** हा मंत्र म्हणून नंतर तुलसी तोडण्याचें करावें.

## ॥ धूपदीप ॥

॥ कृष्णागुरुसमुत्थेनधूपेनचममालयम् ॥
॥ धूपयेद्वैष्णवोयस्तु समुक्तोनरकार्णवात् ॥
॥ देहंगेहंपुनात्येव धूपस्त्वगुरुसंभवः ॥
॥ नाशयेद्यक्षरक्षांसि धूपःसर्वरसोद्भवः ॥
॥ नभयंविद्यतेतस्यदिव्यंभौमांतरिक्षजम् ॥
॥ ममधूपावशेषेण यस्यांगंपरिमार्जितम् ॥

॥ नचापद्विद्यतेतस्य भवंतिसंपदोखिलाः ॥
॥ धूपंदास्यतियोभक्तोममाग्रेश्रद्धयान्वितः॥
॥ बहुवर्तिसमायुक्तं घृतपूरसमन्वितम् ॥
॥ कुर्यादारार्तिकंयोवैकल्पकोटिदिवंवसेत् ॥
॥ मंत्रहीनंक्रियाहीनंयत्कृतंपूजनंमम ॥
॥ सर्वंसंपूर्णतामेतिकृतेनीराजनेसुत ॥
॥ ममाग्रेवैद्विजानांचदीपंदद्याच्चतुष्पथे ॥
॥ मेधाविज्ञानसंपन्नश्चक्षुष्मानजायतेनरः॥
॥ यःकरोतिनरोभक्त्या कर्पूरेणचदीपकम्॥
॥ अश्वमेधमवाप्नोतिकुलंचैवसमुद्धरेत् ॥ स्कं०
॥ नमिश्रीकृत्यदद्यात्तुदीपंस्नेहेघृतादिकम्॥
॥ घृतेनदीपकंदद्यात्तिलतैलेनवापुनः ॥
॥ कार्पासवर्त्तिकाग्राह्यानदीर्घानचसूक्ष्मका॥ का०पु०

श्री महाविष्णु ह्मणतात-जो कृष्णागरूपासून उत्पन्न होणाऱ्या धूपानें माझें गृह सुगंधित करितो तो समुद्ररूपी नरकांतून मुक्त होतो. अगरूचा धूप देहास व गृहास पवित्र करितो. व सर्व रसांपासून उत्पन्न झालेल्या धूपानें यक्ष, राक्षसांचा संहार होतो. मला धूप समर्पण करून त्याचा राहिलेला अंगारा जो आपल्या शरीरास लावितो त्याला पिशाच्यादि बाधा होत नाहींत. जो भक्तिपुरस्सर मजपुढें धूप जाळितो त्याला कोणच्याही प्रकारची अपत्ति प्राप्त न होतां, सर्व संपत्ति प्राप्त होतात. घृतयुक्त पुष्कळ वातींनीं जो परमेश्वराची आर्ति करील तो निश्चयें करून कोटिकल्प पर्यंत स्वर्गवास करील. मंत्र तंत्र रहीत जरी माझें पूजन केलें आणि शेवटीं दीपानें माझी आर्ति केली तर त्याचें तें सकल कर्म सांग होतें. जो माझ्या व ब्राह्मणाच्यापुढें, चव्हाट्यावर दीप लावितो तो जन्मांतरीं बुद्धिमान व ज्ञानसंपन्न होऊन त्याची दृष्टि फार उत्तम होते, जो भक्तिकरून कापुराचा दीप मला समर्पण करितो त्यास अश्वमेध यज्ञाचें फल प्राप्त होऊन तो आपल्या सकल कुलांचा उद्धार करितो असें भगवंतांनीं ब्रम्हदेवास सांगितलें आहे. तेल तूप एकत्र करून दीप समर्पण करूं नये; निव्वळ तेलाचा किंवा तुपाचा दीप असावा. दीपास कापुसाची वात असावी व ती फार लांब किंवा फार अरबूड नसावी.

## ॥ नैवेद्यविचार ॥

॥ वैश्वदेवंपुराकृत्वानित्येचाभ्युदयेतथा ॥
॥ स्वाभीष्टदेवतादिभ्योनैवेद्यंचनिवेदयेत् ॥
॥ अकृत्वावैश्वदेवंतुनैवेद्यंयोनिवेदयेत् ॥
॥ तदन्नंनचगृण्हंतिदेवाविष्ण्वादयोध्रुवम् ॥
॥ नानाव्यंजनसंयुक्तंरसैःषड्भिस्तुसंस्कृतम् ॥
॥ निवेद्यान्नंसमाप्नोतिफलम्यज्ञाधिकंद्विज ॥
॥ तुलसीगंधपुष्पैश्चसंपूज्यान्नंहरेःप्रियम् ॥
॥ धेनुमुद्रांप्रदर्श्याथततोदेवंनिवेदयेत् ॥
॥ नैवेद्यवस्तुलाभेतुफलान्यपिनिवेदयेत् ॥
॥ फलानामप्यलाभेतुतोयान्यपिनिवेदयेत् ॥
॥नैवेद्यमन्नंतुलसीविमिश्रंविशेषतःपादजलेनसिक्तम् ॥
॥ योश्नातिनित्यंपुरतोमुरारेः प्राप्नोतिलक्षायुतकोटिपुण्यम्॥ स्कं०

॥ द्रव्यमन्नं फलं तोयं शिवस्वं न स्पृशेत् क्वचित् ॥
॥ ग्राह्याग्राह्यविचारोयं बाणलिंगेन विद्यते ॥
॥ तदर्पितं जलं चान्नं ग्राह्यं भक्तैश्च श्रद्धया ॥ प॰पु॰

नित्य व अभ्यूदयिक म्हणजे श्रांत्यादि कर्माचे दिवशींही प्रथम वैश्वदेव करून नंतर देवांस नैवेद्य अर्पण करावा. वैश्वदेवावांचून नैवेद्य अर्पण केल्यास तें अन्न देवता ग्रहण करीत नाहींत. तुळसी, गंध, पुष्प यांनीं प्रथम अन्न पूजित करून नंतर जलानें प्रोक्षावें आणि धेनुमुद्रा करून देवांस नैवेद्य समर्पण करावा. शिवास अर्पित केलेलें द्रव्य, अन्न, उदक, याला स्पर्श सुद्धां करूं नये. विष्णूस समर्पित केलेलें तुळसी व तीर्थ मिश्रित अन्न जो भक्षण करितो, तो असंख्य "पुण्य पावतो. बाणरूपी शिवाला अर्पण केलेलें नैवेद्यान्न भक्षण करावें.

## ॥ देवप्रदक्षिणा व नमस्कार वि॰ ॥

॥ प्रदक्षिणीकृता तेन तावद्वारं वसुंधरा ॥
॥ मातुः प्रदक्षिणात द्वद्भूत धात्रीप्रदक्षिणाः ॥
॥ शालिग्रामशिलायाश्च सममेतत्त्रयं स्मृतम् ॥

॥ एकश्च दंडपातश्च सहेस प्रदक्षिणाः ॥
॥ सममेतद्द्वयं नोवा दंडपातोविशिष्यते ॥
॥ प्रदक्षिणे दंडपातं यः करोति सदा मम ॥ स्कं०

परमेश्वरास जितक्या प्रदक्षिणा कराव्या तितक्या त्या पृथ्वीस प्रदक्षिणा जाणाव्या. मातुश्रीस प्रदक्षिणा, पृथ्वीस प्रदक्षिणा आणि शालिग्रामशिलेस प्रदक्षिणा या तिन्हीही प्रदक्षिणा समान होत. या प्रमाणें सात प्रदक्षिणा केल्याचें जें श्रेय तें भगवंतास एक साष्टांग नमस्कार केला असतां प्राप्त होतें. भगवंताला जो प्रत्येक प्रदक्षिणेला नमस्कार करितो त्याला त्या प्रदक्षिणेपेक्षां अधिक फल प्राप्त होतें.

## ॥ पूजावश्यकता ॥

॥ योमोहादथवालस्यादकृत्वा देवतार्चनम् ॥
॥ भुंक्ते स याति नरकं सूकरेष्वभिजायते ॥ कू० पु०

मोहानें किंवा आळसानें कां होइना, जो देवपूजा केल्यावांचून भोजन करितो, तो नरकाप्रत जाऊन पुढें त्याला सूकरयोनि प्राप्त होते. यासाठीं पूजा अवश्य करावी.

## ॥पूजाफल ॥

॥ स्वयं यजतिचेद्देवमुत्तमासोदरात्मजैः ॥
॥ मध्यमायायजेद्भृत्यैरधमायाजनक्रिया॥ शं०र०
॥ धर्मार्जितधनक्रीतैर्यः कुर्यात्केशवार्चनम्॥
॥ उद्धरेत्स्वेनसहितान्दशपूर्वान्दशापरान् ॥ भवि०
॥ कामासक्तोथवाक्रुद्धःशालग्रामशिलार्चनात्
॥ भक्त्यावायदिवाऽभक्त्याकलौमुक्तिमवाप्नुयात्॥ स्कं०पु०

स्वतः केलेली पूजा उत्तम, मुलगा अगर बंधूकडून करविलेली मध्यम, व दुसऱ्याकडून करविलेली अधम होय. जो पुरुष स्वकष्टांनीं संपादन केलेल्या द्रव्यांनीं पूजा करितो, तो आपले सुद्धां दहापूर्वींचे व दहा पुढील अशा एकवीस कुलांचा उद्धार करतो. कामाच्या स्वाधीन असो, अथवा क्रोधयुक्त असो, भक्तीनें किंवा अभक्तीनें जो कलीमध्यें शालिग्रामशिलेची पूजा करितो, तो मोक्षास जातो.

## ॥तीर्थग्रहणम् ॥

॥ प्रायश्चित्तंहिपापानांकलौपादोदकंहरेः॥

॥ धृतेशिरसिपीतेचसर्वास्तुष्यंति देवताः ॥ प॰ मा॰

॥ शालग्रामशिलातोयंयः पिबेद्बिंदुनासमम् ॥

॥ मातुःस्तन्यंपुनर्नैवसपिबेन्भक्तिमान्नरः ॥ स्कं॰

॥ अग्राह्यंशिवनैवेद्यंपत्रंपुष्पंफलंजलम् ॥

॥ शालग्रामशिलासंगात्सर्वंयातिपवित्रता ॥

कलियुगामध्यें पातकाचें निरसन होण्यास प्रायश्चित्तअसें विष्णूचें तीर्थ होय. तें तीर्थ मस्तकावर धारण केल्यानें व प्राशन केल्यानें सर्व देवता संतुष्ट होतात. जो शालिग्राम शिळेचें उदक एक बिंदु मात्र प्राशन करील तो पुनः या संसारांत प्राप्त होऊन पुनः मातुश्रीचे स्तनपान करीत नाहीं. कारण तो मुक्त होतो. शिवास अर्पण केलेला नैवेद्य, पत्र, पुष्प, फल, जल हीं अग्राह्य होत; परंतु शालग्रामशिळेच्या संबंधानें सर्व नैवेद्यादिक पवित्र होतें.- तसेंच या संबंधानें धर्मसिंधूंत असें सांगितलेंआहे कीं:- ज्योतिर्लिंगादौतुपूजकेनदत्तंफलतीर्थादिकं भक्त्याशुद्ध्यर्थंग्राह्यंनलोभेन ॥ पञ्चायतनस्थितलिंगेषुचेरषु प्रतिमासुचान्नादेरपि स्वयंग्रहणेपिन दोषः ॥ अर्थ- ज्योतिर्लिंग इत्यादिकांचें, पूजकानें दिलेलें फल, तीर्थादिक भक्ती करून शुद्धि करितां ग्रहण करावें.

लोभानें ग्रहण करूंनये. पंचायतनांतील चरबाणलिंगें व प्रतिमा यांचा अन्नादिक नैवेद्यही स्वतः ग्रहणकेला असतां दोष नाहीं.

॥ विष्णुपादाभिषिक्तंयःपात्रेणैवपिबेज्जलम् ॥
॥ सर्वपापविनिर्मुक्तःसयातिपरमांगतिम् ॥
॥ यःपादसलिलंविष्णोः करेणपिबतेयदि ॥
॥ समूढोनरकंयातियावदिन्द्राश्चतुर्दश ॥ भवि०

जो पुरुष विष्णुपादोदकतीर्थ पात्रांत घालून प्राशन करितो, तो सर्वपाप निर्मुक्त होऊन उत्तम गतीला पावतो. तसें न करितां जो हातानें तीर्थ घेतो तो मूर्ख नरकाप्रत जातो.

॥तीर्थग्रहणमंत्रः॥

॥ आकालमृत्यहरणं सर्वव्याधिविनाशनम् ॥
॥ विष्णोःपादोदकंतीर्थंजठरे धारयाम्यहम् ॥
॥ प्रथमंकायशुद्ध्यर्थंद्वितीयंधर्मसाधनम् ॥
॥ तृतीयंमोक्षितंचैवएवंतीर्थंत्रिधापिबत् ॥

## ॥ वैश्वदेवावश्यकता ॥

॥ पंचसूनागृहस्थस्य चुल्ली पेषिण्युपस्करी॥
॥ कंडणी चोदकुंभी च तासां पापस्य शांतये ॥
॥ पंचक्लृप्ता महायज्ञाः प्रत्यहं गृहमेधिनाम्॥
॥ पंचैतान्यो महायज्ञान्न हापयति शक्तितः॥
॥ स गृहेपि वसन्नित्यं सूनादोषैर्न लिप्यते॥ मनुः

गृहस्थाश्रमी मनुष्यास सर्वदा पंचसूना संबंधीं दोष प्राप्त होतात. ते असेः- (१) पेषणी-म्हणजे जातें, पाटा वरवंटा इत्यादि पिष्ट करण्याचें साधन, (२) कंडणी-म्हणजे उखळ, मुसळ, इ० कांडण्याचें साधन, (३) चुल्ली- म्हणजे चूल, आहाळ इत्यादि पाक करण्याचें साधन, (४) उदकुंभ -म्हणजे घट, हंडा इत्यादि उदक ठेवण्याचें साधन, आणि (५) उपस्करी- म्हणजे केरसुणी, खराटा, कुंचा इ० गृहशुद्धि करण्याचें साधन. याप्रमाणें हीं पांच साधनें कृमिकीटकादिकांची अलक्षित हिंसा होण्याचीं स्थळें त्या पांच सूना होत. यासाठीं हा पंचसूना दोष (पाप) परिहारास्तव वैश्वदेव अवश्य करावा.

## ॥पंचमहायज्ञः॥

॥ पाठोहोमश्चातिथीनांसपर्यातर्पणंबलिः ॥

॥ एतेपंचमहायज्ञाब्रम्हयज्ञादिनामकाः ॥ मनुः

वैश्वदेव केल्यानें पंचमहायज्ञ घडतात ते असेः- अग्नींत जो होम दिलाजातो तो देवयज्ञ; बलीहरणामध्यें ॐ धात्रेनमः या ठिकाणीं भूतयज्ञ; ॐ पितृभ्यःस्वधा या ठिकाणीं पित्रयज्ञ; (या योगानें नित्यश्राद्धाची सिद्धि होते) ॐ हन्तते सनकादि मनुष्येभ्यो० या ठिकाणीं मनुष्ययज्ञ; आणि पांचवा ब्रम्हयज्ञ. (हा ब्रम्हयज्ञ ज्या त्या शाखेंतील प्रयोगा प्रमाणें न झाल्यास "निर्णेजन" झाल्यावर ब्रम्हयज्ञ सिध्यर्थ तीन गायत्रि जपाव्या, म्हणजे ब्रम्हयज्ञ होतो) असें अ० सू० त सांगितलें आहे.

## ॥वैश्वदेवपात्राणि ॥

॥ नचूल्यामायसेपात्रे नभूमौनचखर्परे ॥

॥ वैश्वदेवंप्रकूर्वीत कुंडेवास्थंडिले ऽपिवा ॥ गृ०ह०



चूल, लोखंडीपात्र, भूमि, खापर यांत वैश्वदेव करूनये. कुंड किंवा स्थंडील यांचे ठिकाणीं

वैश्वदेव करावा.

## ॥ अग्नि प्रज्वलनम् ॥

॥ न पाणिना न शूर्पेण न चामेध्यादिनापि वा ॥
॥ मुखेनोपधमेदग्निं मुखादेव व्यजीयते ॥
॥ पङ्केन भवेद्व्याधिः शूर्पेण धननाशनम् ॥
॥ पाणिना मृत्युमाप्नोति कर्मसिद्धिर्मुखेन तु ॥ वि॰ क॰
॥ स धूम्रं कर्णमित्याहुः सकृज्ज्वाला तु नासिके ॥
॥ धूम्रज्वाला भवेन्नेत्रे प्रज्वलं तु मुखोदरम् ॥
॥ कर्णे चिश्चानमृत्युश्च नासिके च धनक्षयः ॥
॥ नेत्रयोःप्रियनाशाय मुखे तु वर्धन प्रजा ॥ स्मृ. स.

हातानें, सूपानें, किंवा वस्त्रादिकांनीं अग्नि प्रज्वलन न करितां वेणु धम्नि म्हणजे फुंकणी घेऊन अग्नि प्रज्वलन करावा. वस्त्रादिकांनीं अग्नि प्रज्वलन केला असतां व्याधि उत्पन्न होते, सुपानें केला असतां धनाचा नाश होतो, हातानें प्रज्वलन केला असतां मृत्यु प्राप्त होतो, आणि फुंकणी घेऊन

मुरवानें अग्नि प्रज्वलन केला असतां कर्माची सिद्धि प्राप्त होते. धुरांत अग्निमध्यें आहुति दिली असतां ती अग्नीच्या कानांत पडते, जाळ होऊन लागलींच विझाला अशा स्थितींत आहुति दिली असतां ती अग्नीच्या नासिकेंत पडते, कांहीं धूर आणि कांही जाळ अशा स्थितींत आहुति दिली असतां ती अग्नीच्या नेत्रांत पडते आणि प्रज्वलित अग्नींत आहुति दिली असतां ती अग्नीच्या मुखांत पडते. अग्नीच्या कर्णामध्यें आहुति दिली असतां : श्वानवत् मृत्यु प्राप्त होतो, नासिकेंत दिली असतां धनाचा क्षय होतो, नेत्रांत दिली असतां इच्छित फलाचा नाश होतो, आणि अग्नीच्या मुखांत आहुति दिली असतां संततीची वृद्धि होते.

## ॥ वैश्वदेवाभावी दोष ॥

॥ अकृत्वा वैश्वदेवं तु यो भुंक्तेऽन्नं यदि द्विजः॥
॥ समूढो नरकं याति कालसूत्रमवाक्शिराः॥ अन्हि॰

वैश्वदेव केल्यावांचून जो भोजन करितो त्यास मरणानंतर कालसूत्र नांवाच्या नरकाची प्राप्ति होते.

## ॥ वैश्वदेव फलम्॥

॥ यत्फलं सोमयागेन प्राप्नोति धनवान् द्विजः ॥

॥ सम्यक् पंचमहायज्ञैर्दारिद्र्यं नश्यतेक्षणात् ॥ या०

जो नित्यशः पंचमहायज्ञ करितो त्यास सोमयज्ञाचें फळ प्राप्त होते, आणि त्याच्या दारिद्र्या चा तात्काल नाश होऊन त्यास लक्ष्मीची प्राप्ति होते.

## ॥ अतिथी पूजनम् ॥

॥ मूर्खोवापंडितोवापिश्रोत्रियःपतितोपिवा ॥
॥ ब्रम्हतुल्योतिथिर्वैश्यमध्यान्हेयःसमागतः ॥१॥
॥ प्राप्तात्वदृष्टपूर्वाश्च भोक्तुकामाःक्षुधातुराः ॥
॥ यद्गृहेतृप्तिमायांति ब्रम्हलोके वसंतिते ॥२॥ प० पु०

माध्यान्हकाळीं भोजनास प्राप्त झालेला अतिथी मूर्ख असो, वा पंडित असो, वेदाध्ययन पूर्वक अग्निहोत्री असो किंवा पतित असो, त्यास ब्रम्ह तुल्य जाणावें. ज्याला पूर्वीं कधींही पाहिलें नाहीं असा ब्राम्हण अतिथी होऊन आला असतां त्यास जो अन्न घालितो तो ब्रम्हलोकीं वास करितो.

## ॥ अतिथीअनादरम् ॥

॥ अतिथिर्विमुखोयस्य संगच्छेत् गृहमागतः ॥

॥ मध्यान्हे वैश्यसायंवासप्रयातियमालयम् ॥ १॥
॥ नास्ति नास्ति वचः श्रुत्वात्यक्ताशोद्यातिथिर्व्रजेत् ॥
॥ आजन्मसंचितंपुण्यंगृण्हातिगृहमेधिनः ॥ २॥ प॰पु॰
॥ अतिथि द्वारितिष्ठंति अन्नं भक्षंतियेनराः ॥
॥ उदकंचसुरापानं अन्नंगोमांसभक्षणम् ॥ स्मृ॰सं॰

ज्या गृहस्थाचे घरीं माध्यान्हकाळीं अगर सायंकाळीं अतिथी येऊन त्याचा सत्कार न होतां तो विन्मुख गेला तर तो गृहस्थ यमलोकीं जातो. अतिथी आला असतां, आमचे घरीं अन्न नाहीं व उदकही नाहीं, असें उत्तर मिळून, तो परत गेला तर तो जातांना, गृहस्थाश्रमी यानें आजन्म केलेलें सर्व पुण्य घेऊन जातो. अतिथी द्वारावरी तिष्ठत असतां, जो गृहस्थ घरामध्यें भोजन करितो, तो जें उदकपान करितो तें मद्यासमान व अन्न भक्षण करितो तें गोमांसासमान होय.

## ॥ अतिथिलक्षणम् ॥

॥ नमित्रमतिथिं कुर्यान्नैकग्रामनिवासिनम् ॥
॥ अज्ञातकुलनामानं तत्कालेसमुपस्थितम् ॥

॥ बुभुक्षुमागतं श्रांतं याचमानमकिंचनम् ॥
॥ ब्राम्हणं प्राहुरतिथिं संपूज्य शक्तितो बुधैः ॥ आ.म.

मित्र, स्वग्रामीं राहणारा परिचयाचा वगैरे अशास अतिथी समजूं नये. ज्याचें कुळ, नाम, संबंध माहित नसेल असा अपरिचित्, भुकेला, थकलेला, याचना करणारा गरीब ब्राम्हण अथवा अन्य कोणी असो, वैश्वदेव समयीं, वेळेस आलेला असा अतिथी पूज्य होय.

॥ अतिथी फलम् ॥

॥ सुदिप्तेषु विमानेषु भुंक्ते पीयूषमानवः ॥
॥ याति स्वर्गच्युतो वैश्य उत्तरांश्च कुरून्प्रति ॥
॥ ततश्च भारते वर्षे राजा भवति धार्मिकः ॥
॥ अन्नदो दीर्घमायुश्च विंदते सुखसंपदः ॥

ज्यानें अतिथीचा सत्कार केला आहे, तो कित्येक दिवस स्वर्गवास करून नंतर उत्तम प्रकारच्या विमानांत बसून व अमृतपान करीत उत्तरकुरु संज्ञक देशाप्रत प्राप्त होतो. नंतर भारत वर्षांत (खंडांत) धार्मिक राजा होतो. अतिथीस अन्न घालणारा दीर्घायु होऊन अनेक सुखसंपत्ती प्रत प्राप्त होतो.

## ॥ दैनिकषटकर्मे ॥

॥ स्नानं संध्याजपश्चैवदेवतानांचपूजनम्॥
॥ वैश्वदेवंतथातिथ्यंषट्कर्माणिदिनेदिने॥ बृ.पा.

स्नान, संध्या, जप, देवतापूजन, वैश्वदेव, आणि अतिथीपूजन, हीं षट्कर्मे ब्राम्हणाचीं नित्यकरण्याचीं होत. यासाठीं सदरी अतिथी पूजना पर्यंत हीं नित्यकर्मे, त्यांचा विधि व फळ वगैरे सांगून आतां पुढें भोजनादि इतरविधि सांगण्यांत येत आहेत.

## ॥ गृहस्थाश्रम प्रशंसा ॥

॥ गृहस्थ एवयजते गृहस्थस्तप्यतेतपः॥
॥ चतुर्णामाश्रमाणां तु गृहस्थस्तुविशिष्यते॥
॥ यथानद्यो नदाःसर्वे समुद्रे यांतिसंस्थितिम्॥
॥ एवमाश्रमिणः सर्वे गृहस्थे यांति संस्थितिम्॥
॥ यथामातरमाश्रित्य सर्वेजीवन्ति जंतवः॥
॥ एवं गृहस्थमाश्रित्य सर्वेजीवन्तिभिक्षुकाः॥

यज्ञयागादि कर्में व तपादि अनुष्ठानें गृहस्थाश्रमांतच होतात. ब्रम्हचर्यत्व, गृहस्थाश्रम, वानप्रस्थ आणि सन्यास यांत गृहस्थाश्रमच श्रेष्ठ आहे. जशा सर्व नद्या आणि नद यांचा समावेश समुद्रांत होतो त्याप्रमाणें सर्व आश्रमांचा समावेश गृहस्थाश्रमांत आहे. मातुश्रीच्या योगें जसें जीवांचें जीवन होतें, तसें गृहस्थाश्रमाचे योगें याचकांचें जीवन होतें; म्हणून गृहस्थाश्रमच मुख्य होय. (वसिष्ठ)

## ॥ नित्यदानम् ॥

॥ एकस्मिन्नप्यतिक्रांते दिने दानविवर्जिते ॥
॥ दस्युभिर्मुषितस्येव युक्तमाक्रंदितुं भृशम् ॥ ध. सिं.

दानावांचून एकही दिवस गेला तर, चोरांनीं घर लुटून सर्वस्वापहार केला असतां जसा तो दिवस अत्यंत दुःखास पात्र, तसा दान विरहित दिवस दुःखास पात्र होय. ( याकरितां जसें ऐश्वर्य असेल तदनुसार धन, धान्य इत्यादिक कांहीं अल्पतरी दान करावें. द्रव्य, धान्य इत्यादिक देण्यास शक्ति नसेल तर सुपारी इत्यादिकांचें ही दान प्रतिदिवशीं करावें. )

## ॥ दानावश्यकता ॥

॥ नादत्तं लभते क्वापि ब्रह्माद्यैरपि दैवतैरपि ॥

॥ दानेनहीनस्कभवेदकिंचनोनिष्किंचनत्वाच्चकरोतिपापम्॥
॥ पापादवश्यंनरकंप्रयातिदातव्यमस्मात्सुखमिच्छतासदा॥ स्कं०

नारद सांगतात हे अंबरीष, दिल्यावांचून ब्रह्मादि देवांसही प्राप्त होत नाहीं. जो दानहीन तोच दरिद्री होतो. आणि दरिद्री असल्या कारणानें पुनः पाप करितो तो पापा पासून अवश्य नरकास जातो. यास्तव ज्याला सुखेच्छा असेल त्यानें अवश्य दान करावें.

## ॥ दानफलम् ॥

॥ दानेनप्राप्यतेस्वर्गोदानेनप्राप्यतेसुखम्॥
॥ दानेनहीयतेपापंमहापातकजंनृप॥
॥ दानंविनातपोभांतिह्यसूर्यंगगनंयथा॥
॥ अंसंततिकुलंपद्मदाचारेणविनागृहम्॥
॥ नातःपरतरंकिंचित्पवित्रंपापनाशनम्॥
॥ विद्याधरायसंगीतंभृगुणामणिपर्वते॥ पद्म०
॥ पुनःसुखीपुनर्भोगीपुनर्धर्मपरायणः॥

॥ आसप्तजन्मराजेंद्र जायते सर्वतो जयी ॥
॥ पश्चात्सप्तकुलैर्युक्तो ब्रम्हभूयाय कल्पते ॥
॥ यथाजलगताचोर्णा नजलैर्बध्यते क्वचित् ॥
॥ तथा संसार गोजंतुः संसारेनचबध्यते ॥ स्कं० पु०

दानानें स्वर्ग प्राप्त होतो; दानानें सुख प्राप्ती होते; आणि महापातकादि पापें ही दानानेंच नष्ट होतात. सूर्यहीन आकाशा प्रमाणें, संततीहीन कुला प्रमाणें व आचारहीन गृहाप्रमाणें, दानहीन तप शोभतें. दाना सारखें पवित्र व पापनाशक कांहींच नाहीं असें भृगुऋषीनें मणिपर्वतावर विद्याधर नामक गंधर्वास कथन केलें. दान देणारा पुनः पुनः सुखी व पुनःपुनः भोगी व पुनः पुनः धर्मपरायण असा सात जन्म पर्यंत होतो. व सर्वत्र विजयी होतो. नंतर सप्त कुलासहित मुक्त होतो. जलावर टाकलेली लोंकर जशी जलानें भिजत नाहीं, त्या प्रमाणें दान करणारा पुरुष संसारांत असूनही संसारानें बद्ध होत नाहीं.

## ॥ अन्नदान प्रशंसा ॥

॥ सद्यस्त्राप्यायनं नृणामन्नदानं नराधिप ॥

॥ तस्मान्नानेन सदृशं दानं लोकेषु विद्यते ॥
॥ मार्गश्रांताय विप्राय प्रश्रयं प्रददाति यः ॥
॥ तस्य पुण्यफलं वक्तु ब्रम्हणापि न शक्यते ॥
॥ दारापत्यगृहादीनि वासोलंकार भूषणम् ॥
॥ असह्यं चानाश्नतः पुसः सह्यं भुङ्क्वतो ध्रुवम् ॥
॥ तस्मादन्नसमं दानं न भूतं न भविष्यति ॥
॥ अन्नदो मातृपित्रादिन् विस्मारयति भूमिप ॥
॥ तस्मादन्नं प्रशंसंति लोकास्त्रैलोक्यवर्तिनः ॥
॥ मातरः पितरश्चापि केवलं जन्महेतवः ॥
॥ अन्नदं पितरं लोके वदंति च मनीषिणः ॥
॥ अन्नदे सर्वतीर्थानि अन्नदे सर्वदेवताः ॥
॥ अन्नदे सर्वधर्माश्च निष्ठंत्यरि धराजया ॥ स्कं. पु.

अन्नदान हें तत्काल मनुष्यास तृप्ति करणारें आहे. यास्तव त्रैलोक्यांत ही अन्नदाना सारखें श्रेष्ठ

दान नाहीं. मार्गांत श्रम पाऊन आलेल्या ब्राम्हणास त्याच्या इच्छे प्रमाणें जो त्यास दान करील त्यांचें पुण्य ब्रम्हदेवही कथन करण्यास शक्य नाहीं. स्त्री, पुत्र, गृह, वस्त्र, अलंकार आणि भूषणें हीं सर्व उपोषित पुरुषास अप्रिय आहेत आणि भोजन करून तृप्त झाला असतां हे सर्व पदार्थ त्याला प्रिय होतात. यास्तव अन्नदानासारखें दान मागें झालें नाहीं व पुढेंही होणार नाहीं. अन्नदान करणारा आई बापांचें विस्मरण करितो. यास्तव सर्व त्रैलोक्यांत वास करणारे प्राणी अन्नदात्याचें वर्णन करितात. माता आणि पिता हे केवळ जन्म देण्यासच कारण, आणि अन्नदान करून पोषण करणारा जो पुरुष त्यासही पिता असें म्हणतात. कारण तोच देहाचा पोषक आहे. अन्नदात्याचे ठिकाणीं सर्व देवता, सर्व तीर्थें आणि सर्व धर्म वास करितात.

## ॥ ब्राम्हण प्रशंसा ॥

॥ हुतभुग्ब्राह्मणश्चैव वदनं मम मानद ॥
॥ ब्राह्मणाख्यं मुखं श्रेष्ठं न तथा हव्यवाहनः॥
॥ ब्राम्हणाख्ये मुखे पुत्र हुतं कोटिगुणं भवेत् ॥
॥ अग्न्याख्यं ब्राम्हणाधीनं स्वतंत्रा ब्राम्हणाः किल ॥ स्कं. पु.

महाविष्णु ह्मणतात ब्राम्हण व अग्नि हें माझें मुख आहे त्यांत जसें ब्राम्हण हें माझें मुख्य मुख आहे त्याचप्रमाणें अग्नि हें माझें मुख्य मुख नाहीं. ब्राम्हणाच्या मुखांत हुत झालें असतां तें कोटिगुण होतें. कारण अग्निरूप जें माझें मुख तें ब्राम्हणाच्या स्वाधीन आहे, आणि ब्राह्मण हें मुख स्वतंत्र आहे.

॥ तीर्थानिदक्षिणेपादे वेदास्तन्मुखमाश्रिताः॥
॥ सर्वांगेष्वाश्रितादेवाः पूजितास्तेतदर्चया॥
॥ अव्यक्तरूपिणोविष्णोः स्वरूपंब्राम्हणाभुवि॥
॥ नावमान्यानोविरोध्याःकदाचिच्छुभमिच्छता॥ पद्मपु.

ब्राम्हणाच्या दक्षिण पादाचे ठायीं सकल तीर्थें, मुखांत वेद, व सकल शरीरांत देव वास करितात. यास्तव ब्राह्मणाचें पूजन झालें असतां इतक्या सर्वांचें पूजन होतें. अव्यक्तरूपी जो परमात्मा त्याचेंच रूप ब्राम्हण आहेत. यास्तव कल्याणेच्छु पुरुषानें त्यांचा अवमान व तिरस्कार कधींही करूं नये.

॥ सत्पात्रपूजनम्॥
॥ ज्वलंतमग्निमुत्सृज्यनहिभस्मनिहूयते॥

॥ बहुधावर्णितस्यापि सौगंध्यादियुतस्य च ॥
॥ कंटकान्वितवृक्षस्य न कुर्वंति समर्चनम् ॥
॥ विशिष्टानां पादपानाम श्वत्थः सेव्यतां मतः ॥
॥ तुलसीं तु समुत्सृज्य वृहतीं पूज्यते नु किम् ॥
॥ अनाथत्वं पूज्यतायां न प्रयोजकतामियात् ॥
॥ पंग्वाद्यायेप्यनाथा हि सेवापात्रं हि केवलम् ॥
॥ तपोनिष्ठा ज्ञाननिष्ठाः श्रुतिशास्त्रविशारदाः ॥
॥ विष्णुरूपाः सदा पूज्या नेतरे तु कदाचन ॥ स्कं. पु.

अग्नि प्रदिप्त असतां राखेंत कोणी तरी हवन करतो काय? देव बाभूळ या नांवाच्या वृक्षाचें पुष्कळ चांगलेपणाचें वर्णन केलें वजरी त्याला गंधयुक्त पुष्पें येतात म्हणून त्या कंटक वृक्षाचें कोणी पूजन करतो काय? इतर वृक्ष कांहीं एक गुणांनीं अधिक जरी आहेत तरी पूज्यतेप्रत प्राप्त होणार अश्वत्थच नसें तुलसीचा त्याग करून कोणी बोरीचें पूजन करील काय? केवळ आंधळे, पांगळे, जरी आहेत तरी ते केवळ अपात्रच जाणावे. तपोनिष्ठ, ज्ञाननिष्ट, श्रुति आणि शास्त्रें यांत जे निपूण असे हे विष्णु रूपी जाणून त्यांचें

च पूजन करावें, इतरांचें करूं नये.

## ॥ चंदन (गंध) धारणम् ॥

॥ कुंकुमंचंदनं वापि कृष्णागुरुविमिश्रितम् ॥
॥ उष्णंवातकफध्वंसिशीतकाले तदिष्यते ॥
॥ चंदनंघनसारेणवालकेनच मिश्रितम् ॥
॥ सुगंधिपरमंशीत मुष्णकाले प्रशस्यते ॥
॥ चंदनंघुसृणोपेतं मृगनाभिसमायुतम् ॥
॥ नचोष्णंचनवाशीतंवर्षाकाले तदिष्यते ॥
॥ अनुलेपस्तृषामूर्च्छादुर्गंधश्रमदाहनुत् ॥
॥ सौभाग्यतेजस्त्वग्वर्णप्रीत्योजोबलवर्धनः ॥ नि. र.
॥ श्यामंशांति करंप्रोक्तंरक्तंवश्यकरं भवेत् ॥
॥ श्रीकरं पीतमित्याहुर्वैष्णवंश्वेतमुच्यते ॥ ब्राम्हे.

केशर, चंदन किंवा कृष्णागुरु यांणीं युक्त धारण केलें असतां उष्णवात व कफ यांचा नाश करितें,

हें शीतकाळीं योग्य आहे. व चंदन, कापूर आणि वाळा यांनीं मिश्र केलें असतां सुगंधि परमशीत म्हणून उष्णकाळांत हितावह होतें; त्याचप्रमाणें चंदन, केशर व कस्तुरी यांनीं युक्त केलें असतां तें उष्ण व शीत नव्हे म्हणून समाधान होतें, हें वर्षाऋतूंत श्रेष्ठ आहे. सुगंधानुलेपन हें तृषा, मूर्च्छा, दुर्गंध, श्रम व दाह यांचा नाश करितें. आणि सौभाग्य, त्वचेचा रंग, प्रीति, तेज आणि बळ यांना वाढवितें. श्यामवर्ण- शांतिकर; आरक्त- वशीकरण करणार; पीतवर्ण-लक्ष्मीप्रद; व शुभ्र-विष्णुप्रद असें चंदन धारणाचें फळ कथन केलें आहे.

## ॥ भोजनविधि ॥

### ॥ भोजनकाल ॥

॥ याममध्ये न भोक्तव्यं यामयुग्मं न लंघयेत् ॥
॥ याममध्ये रसोत्पत्तिर्यामयुग्माद्बलक्षयः ॥
॥ क्षुत्संभवति पक्वेषु रसदोषमलेषु च ॥
॥ काले वा यदि वा काले सोऽन्नकाल उदाहृतः ॥ नि.र.
॥ पंचयज्ञावशिष्टं च यो भुंक्ते सोऽमृताशनः ॥ देवलः
॥ सायं प्रातर्द्विजातीनामशनं श्रुतिनोदितम् ॥ मनुः

पहिले प्रहरांत जेऊं नये; आणि दोन प्रहरांपुढें उपाशी राहूं नये. पहिला प्रहर रसोत्पत्तीचा असल्यानें भोजन करणें चांगलें नाहीं; व दोन प्रहरांनंतर भोजन केल्यानें बलक्षय होतो, आणि रस, दोष व बल हे पक्व झाले असतां चांगली क्षुधा उत्पन्न होते. ( सबब क्षुधेचा काल तो भोजन काल समजावा) तसेंच स्नान संध्यादि नित्यकर्म करून पंचमहायज्ञावशिष्ट अन्नाचें भोजन करावें, म्हणजे तें अमृताप्रमाणें होतें. ब्राम्हणानें दिवसास एकवेळ व रात्रीं एकवेळ असें दोनवेळां भोजन करावें अर्थात रात्र झाल्यावांचून दिवसासच दोनवेळां भोजन करूं नये.

## ॥ भोजनसमयीं वर्ज्यासन ॥

॥ गोशकृन्मृन्मयंभिन्नंतथापालाशपिप्पलम् ॥
॥ लोहबद्धंतथैवार्कं वर्जयेदासनंबुधः ॥ प्रचेताः

शेण व माती यांचे केलेले, फुटलेले, तसेच पळस, पिंपळ यांच्या लांकडाचे केलेले लोखंडानें युक्त असे पाटावर बसून भोजन करूं नये.

## ॥ भोजनास ग्राह्य पात्र ॥

॥ दोषहृद्दृष्टिदंपथ्यंहैमंभाजनभोजनम् ॥

॥ रौप्यं भवति चक्षुष्यं पित्तहृत्कफवातकृत् ॥
॥ पैत्तलं वातकृद्रुक्षं शूलकृमिकफप्रणुत् ॥
॥ पात्रं पत्रमयं रुच्यं दीपनं विषपापनुत् ॥ नि. र.

भोजनास सोन्याचें पात्र, हें दोषनाशक, चक्षुष्य, व पथ्य कारक असें आहे. रुप्याचें चक्षुष्य, पित्तनाशक व कफ, वायु यांना करणारें असें आहे. पितळेचें वातकर, रुक्ष व शूल, कृमि आणि कफ यांचें नाशक आहे. पत्रावळीवर भोजन केलें असतां रुचिकर, दीपन, विष व पातक यांचें नाशक आहे.

स्मृत्यर्थसारांत 'कदली कुटजमधुजंबूपनसाम्रचंपकोदुंबरपत्राणि प्रशस्तानि' - कदली, कुडा, मोह, जांबूळ, फणस, आंबा, चांफा आणि उंबर यांचीं पानें व पत्रावळी प्रशस्त होत.

॥ भोजनास वर्ज पात्र ॥

॥ मृन्मये पत्रपृष्टे वा आयसे ताम्र भाजने ॥
॥ नाऽश्नीयादपि चेद्भुंक्ते नरकं प्रतिपद्यते ॥ व्यासः

मृत्तिकापात्र, पाठथें पान, लोखंडी व ताम्रपात्र यांवर भोजन करूं नये. त्यांत भोजन केल्यापासून नरकाची प्राप्ति होते. तसेंच रुई, पिंपळ, वड इ० चीं पानें निसिद्ध होत असें ध. सिं. त सांगितलें आहे.

## ॥भोजनासदिशावत्याचें फल॥

॥आयुष्यं प्राङ्मुखो भुङ्क्ते यशस्वी दक्षिणामुखः॥
॥श्रियं प्रत्यङ्मुखो भुङ्क्ते श्रेयो भुंङ्क्तेउदङ्मुखः॥
॥ पुत्रवांस्तु गृहे नित्यं ना श्नीयादुत्तरामुखः ॥
॥ सोमवारे तथाऽभ्यंगं वर्जयेत्तु सदाबुधः ॥ दे०

पूर्वेस मुख करून भोजन केलें असतां आयुष्याची वृद्धि होते, दक्षिणेस मुख केलें असतां यशाची प्राप्ति, पूर्वेस मुख केल्यानें लक्ष्मीची प्राप्ति आणि उत्तरेस मुख करून भोजन केलें असतां कल्याणाची प्राप्ति होते. परंतु पुत्रवानानें उत्तरेस मुख करून भोजन करूं नये, तसेंच त्यानें सोमवारीं अभ्यंग करूं नये.

## ॥भोजनासपदार्थवाढण्याचेनियम॥

॥शाकादिद्दक्षिणेस्थाप्य भक्ष्यंभोज्यंचवामतः॥
॥अन्नंमध्येप्रतिष्ठाप्यदक्षिणे घृतपायसम्॥ स्मृ०

भोजन पात्रावर पदार्थ वाढावयाचे ते असेः- शाकभाजी भोजन करणाऱ्याच्या उजव्या बाजूस, चटण्यादि पदार्थ डाव्याबाजूस, मध्यभागीं भात व त्याच प्रमाणें तूप, खीर इ० पदार्थ उजव्या बाजूस वाढावे.

## ॥भोजनासमंडलावश्यकता॥

॥उपलिप्तेसमेस्थानेशुचौश्लक्ष्णसमन्विते॥
॥चतुरस्त्रंत्रिकोणंच वर्तुलंचार्धचंद्रकम्॥
॥कर्तव्यमानुपूर्व्येण ब्राम्हणादिषुमंडलम्॥ ब्र.पु.

पवित्र जागेवर ब्राह्मणांनीं चौकोणी, क्षत्रियांनीं त्रिकोण, वैश्यांनीं वर्तुल व शूद्रांनीं अर्धचंद्राकृति पात्रावळीं मंडल करावें.

## ॥मंडलाभावी दोष॥

॥यातुधानाःपिशाचाश्चक्रूराश्चैवतुराक्षसाः॥
॥हरन्तिरसमन्नंच मंडलेनविवर्जितम्॥ मा.पु.

भोजनकाळीं पात्रावळीं जर मंडल केलें नाहीं तर यातुधान पिशाच्च व क्रूर राक्षस हे अन्नाचा रस घेऊन जातात.

## ॥पंक्तिवारणम्॥

॥अग्निना भस्मना चैवस्तंभनेसलिलेनच॥

॥ एकपङ्क्त्युपविष्टानां दुष्कृतं यद्दुरात्मनः॥
॥ सर्वेषां तत्समं तेषां यावत्पङ्क्तिर्नभिद्यते॥ गोभिलः

अग्नि, भस्म किंवा उदक यांची पात्रा भोवतीं रेषा करावी म्हणजे पंक्ति भेद होतो. असें न केल्यास एका पंक्तीस बसलेल्या इतर भोक्त्यांचे दोष लागतात.

॥अन्नस्तुत्यादि प्रकार॥

॥ अन्नं दृष्ट्वा प्रणम्यादौ प्रांजलिं कारयेततः॥
॥ अस्माकं नित्यमस्त्वेतदिति भक्त्याथवन्दयेत्॥ ब्रा.
॥ अमृतोपस्तरणमसि स्वाहेत्यपः पिबेत् ॥
॥ करेण सलिले विष्णुं ध्यात्वा ब्रम्हपिबेदपः॥
॥ प्राणाग्निहोत्रं जुहुयाच्छेषं भुङ्क्ते द्विजोत्तमः॥
॥ स्वाहान्ताः प्रणवाद्याश्च नाम्ना मंत्राः प्रकीर्त्तिताः॥
॥ जिव्हयाच ग्रसेदन्नं दन्तान्नैस्तन्न संस्पृशेत्॥
॥ अनिंद्यं भक्षयेदन्नं वाग्यतोऽन्नमकुत्सयन् ॥

॥ पंचग्रासान्महामौनं प्राणाद्यांश्चसमाचरेत्॥ स्मृ.सं.

पात्रावर वाढिलेलें अन्न पाहिल्याबरोबर नमस्कार करून हात जोडावे व हें अन्न नेहमीं मिळावें असें म्हणून पुनः वंदन करावें. आणि हातामध्यें जल घेऊन त्यांत परब्रम्ह विष्णूचें ध्यान करावें व "अमृतोपस्तरमसि" या मंत्रानें पान करावें. नंतर मौन धारण करून अन्नाची निंदा न करितां "स्वाहा" शब्द अंतीं व "ओंकार" आदि आहे ज्यांच्या अशा "ॐ प्राणायस्वाहा" इत्यादि मंत्रांनीं दंतांचा स्पर्श न होऊं देतां पंच प्राणाहुति घ्याव्या; यांस "प्राणाग्नि होत्र" म्हणतात.

## ॥ चित्राहुती ॥

॥ चित्राहुतिबलिन्द्याद्बलिहीनंनभोजयेत्॥

॥ तत्रस्थाने करस्पर्शेनभोक्तव्यंकदाचन॥ मनुः

चित्राहुति बलि दिल्यावांचून भोजन करूं नये. व त्या दिल्यावर पुनः त्यास स्पर्श करूं नये.

## ॥ आपोशन ॥

॥ आपोशानेनोपरिष्टादधस्तादश्नतातथा॥

॥ अनग्नममृतंचैव कार्यमन्नंद्विजन्मना ॥ याज्ञ.

॥ आपोशानमकृत्वा तु यो भुङ्क्तेऽनापदि द्विजः॥
॥ भुंजानो वा तथा ब्रूयाद्गायत्र्यष्टशतं जपेत्॥ पुल.

आपत्कालावांचून आपोशान न करितां भोजन करूं नये. आपोशानानें अन्नाचे ठिकाणीं अनग्नता व अमृतत्व प्राप्त होतें. आपोशान न करितां भोजन केलें तर तद्दोष निवारणार्थ एकशें आठ गायत्रीजप करावा.

## ॥ योग्यायोग्य अन्न ॥

॥ अत्युष्णान्नं बलं हन्ति शीतं शुष्कं च दुर्जरम्॥
॥ अतिक्लिन्नं ग्लानिकरं युक्तियुक्तं हि भोजनम्॥
॥ अतिद्रुताशिताहारो गुणान्दोषान्न विन्दति ॥
॥ भोज्यं शीतमहृद्यं च स्याद्विलंबितमश्नतः॥ नि. र.

अति उष्ण अन्नानें बलाचा नाश होतो; तसेंच अति थंड व वाळलेलें अन्न हें दुर्जर होय, त्यानें लवकर पचन होत नाहीं. अति क्लिन्न अन्न ग्लानि उत्पन्न करितें. अति जलद भक्षण केलें असतां त्यापासून गुण व दोष कांहींच होत नाहींत. फारवेळ (वेंगटपणानें) भक्षण करीत राहिलें असतां तें अन्न थंड व अप्रि

य असें होतें. म्हणून योग्यरीतीनें भोजन असावें.

## ॥ भोजनप्रकार ॥

॥ अश्नीयात्तन्मना भूत्वा पूर्वंतु मधुरान्नकम् ॥
॥ लवणाम्लौ तथा मध्ये कटुतिक्तादिकंततः ॥ पुलस्त्यः
॥ अन्ते पुनर्द्रवाश्नीतु बलारोग्यैर्न मुंचति ॥
॥ जठरं पूरयेदर्धमन्नै र्भागंजलस्यच ॥
॥ वायोःसंचारणार्थायचतुर्थमवशेषयेत् ॥ वि.पु.

अगोदर पातळ व गोड पदार्थ खावें; मध्यें खारट, अंबट, कडू, तिखट, कठीण पदार्थ खावें व शेवटीं पुनः पातळ व मधुर पदार्थ भक्षण करावें. जठराचा अर्धभाग अन्नानें पूरित करावा. तिसरा भाग जलानें पूरित करून चौथा भाग उदरांतील वायु मोकळेपणानें वाहण्याकरितां रिकामा ठेवावा, म्हणजे बल व आरोग्य राहतें

## ॥ मिताहार ॥

॥ अनारोग्यमनायुष्यमस्वर्ग्यमतिभोजनम् ॥
॥ अपुण्यंलोकविद्विष्टंतस्मात्तत्परिवर्जयेत् ॥ मनुः

फार खाण्यानें रोग, आयुष्याचा क्षय, स्वर्गाची अप्राप्ति होते व लोकांची दृष्टि लागते या करितां मिताहार करावा.

॥ भोजनकालीचेनियम ॥

॥ भुंजानोन बहुब्रूयान्ननिंदेदपिकंचन ॥
॥ जुगुप्सितकथांनैवशृणुयादपि चावदेत् ॥ नि.र.

जेवीत असतां फार बोलूं नये व कोणाची निंदा करूं नये. त्याच प्रमाणें निंद्य कथा श्रवण करूं नये व आपण ही बोलूं नये.

॥ भोजनाचे गुण ॥

॥ आहारः प्रीणनःसद्योबलकृद्देह धारणः ॥
॥ स्मृत्यायुःशक्तिवर्णौजः सत्वशोभाविवर्धनः ॥ नि.र.

प्राणीमात्राला आहार हा संतुष्ट करणारा, देह धारक व बल, स्मृति, आयुष्य, शक्ति, वर्ण, तेज, सत्व आणि शोभा वाढविणारा आहे.

॥ अकालीभोजनाचे दोष ॥

॥ कालेऽतीतेऽश्नतोजंतोर्वायुर्नेोपहतेऽनले॥
॥ कृच्छ्राद्विपच्यते भुक्तं नस्याद्भोक्तुं पुनःस्पृहा॥
॥ अप्राप्तकाले भुंजानो ह्यसमर्थ तनुर्नरः॥
॥ तांस्तान्व्याधीनवाप्नोति मरणंचाधिगच्छति॥ नि.र.

भोजनकाल निघून गेल्यावर भोजन केलें असतां वायूच्या कोपानें अग्नि मंद होतो. आणि खा-ल्लेलें अन्न पचन होण्यास कठिण जातें व पुनः भोजनाची इच्छा होत नाहीं; अकालीं भोजन केलें असतां दुर्बळ होतें, व शिरोव्यथा, अतिसार, विलंबिका, अलसक (महामारीचे भेद) इत्यादि अनेक व्याधि होतात. व त्या व्याधि शांत न झाल्या तर मरणही येतें.

॥ हस्तदत्ताग्राह्यपदार्थ॥

॥ पाणीयपायसंभिक्षं घृतंलवणमेवच॥
॥ हस्तेहस्तंचगृण्हीयात् प्रायश्चित्तंदिनेदिने॥ स्मृ.सं.
॥ लवणंव्यंजनंचैव घृतंतैलंतथैवच॥
॥ लेह्यंपेयंचविविधंहस्तदत्तंनभक्षयेत्॥ पैठी.

॥ दर्व्यादेयं शृतान्नंच समस्तंव्यंजनादिकम्॥
॥ अपक्वंस्नेहपक्वंच नतुदर्व्याकदाचन॥ मनु.॥

पाणी, पायस, तूप व मीठ हे पदार्थ हातावर घेतले असतां प्रायश्चित्तार्ह दोष प्राप्त होतात. मीठ, चटण्या, तूप, तेल, चाटण्याजोगे व पिण्याजोगे पदार्थ हातांनीं वाढूं नये, व वाढलेले भक्षणही करूं नये. हे पदार्थ पळीनें वाढावें, पण कच्चे व तळलेले पदार्थ मात्र पळीनें वाढूं नये.

## ॥ उदक प्राशनाचे नियम ॥

॥ भोजनेतु यदाविप्रो वामभागे स्थितंजलम्॥
॥ तज्जलं रुधिरं प्रोक्तं तदन्नं मांससंज्ञिकम्॥ स्मृ.सं.
॥ जलपात्रंसुवर्णस्य तदाभावेतु रौप्यकम्॥
॥ तदभावेच ताम्रस्य तदभावेतु पैत्तलम्॥
॥ इतिचत्वारि पात्राणि बलबुद्धि प्रदानिच ॥
॥ अत्यंबुपानान्नविपच्यतेऽन्न मन्नंबुपानाच्च सएव दोषः ॥
॥ तस्मान्नरो वह्निविवर्धनाय मुहुर्मुहुर्वारि पिबेद भूरि ॥

॥ भोजनादौ जलंपीतं कार्श्य मंदाग्नि दोषकृत् ॥
॥ मध्येग्नि दीपनं श्रेष्ठमंतेस्थौल्य कफप्रदम् ॥
॥ तृषितस्तु नचाश्नीयात्क्षुधितो नजलंपिबेत् ॥
॥ तृषितस्तु भवद्गुल्मी क्षुधार्तस्तुजलोदरी ॥ नि.र.

भोजन समयीं ब्राम्हणांनीं जलपात्र म्हणजे तांब्या, झारी इ॰ आपल्या डाव्या बाजूस ठेऊं नये, ठेविलें असतां तें पाणी रक्ताप्रमाणें व भक्षण करीत असलेलें अन्न मांसा प्रमाणें जाणावें. पाणी पिण्याचें भांडें — तांब्या, झारी, फुलपात्र, पेला इ॰ - सोन्याचें, चांदीचें, तांब्याचें किंवा पितळेचें असावें. या चारी जातीचीं भांडीं उत्तम असून एकाचे अभावी दुसरें घ्यावें. हीं चारी जातीचीं भांडीं बल व बुद्धि वर्धक होत. फार पाणी प्यालें असतां अथवा मुळींच प्यालें नसतां अन्न पचन होत नाहीं. या करितां अग्नि वृद्ध्यर्थ वरचेवर थोडें थोडें पाणी पीत जावें. भोजनाचे पूर्वी पाणी प्यालें असतां तें कृशपणा, व मंदाग्नित्व हे विकार करितें. भोजना मध्यें प्राशन केलें असतां अग्नीला प्रदिप्त करितें. भोजनाच्या अंतीं प्यालें असतां स्थूलता व कफ यांना करितें. तहान लागली असतां भोजन करूं नये, व क्षुधा लागली असतां पाणी पिवूं नये. जर तहान लागली असतां जेवलें तर पोटांत गुल्म होतो आणि क्षुधा लागली असतां पाणी प्यालें

तर जलोदर होतें.

॥ द्रवाद्यन्नंतुचेत्सेवेत्तत्राम्बु नपिबेद्बहु ॥
॥ मध्येतुकठिनेभक्ष्येयथेष्टंशस्यतेजलम्॥ नि.र.

कढी इत्यादि पातळ पदार्थ खाल्यावर पाणी थोडें प्यावें. कठिण पदार्थ भक्षण करीत असतांना मधून मधून यथेच्छ पाणी पीत जावें.

## ॥भोजनोत्तर कृत्यें ॥

॥ अमृतापिधानसीत्यपः प्राश्य भुविक्षिपेत्॥
॥ अनन्तरंशिखांचैवबध्नीयाद्वामपाणिना ॥
॥ उत्थायबहिरागत्यमुखहस्तादिशोधयेत्॥
॥ आचम्यचततः कुर्याद्दंत काष्टस्य भक्षणम्॥ देवलः

यथेश्च भोजन झाल्यानंतर "अमृतापिधानमसी स्वाहा" या मंत्रानें तळहातांत पाणी घेऊन आपोशान घ्यावें, व डाव्या हातानें मुक्त असलेली शेंडी बांधून बाहेर यावें. आणि हस्त व मुख प्रक्षालन करून आचमन करावें.

## ॥ चूळ भरण्याविषयीं ॥

॥ कुर्याद्द्वादश गंडूषान् पुरीषोत्सर्जने ततः ॥
॥ मूत्रोत्सर्गे च चतुरो भोजनान्ते तु षोडश ॥ अम्ब०

भोजनानंतर सोळा, लघ्वी केल्यानंतर चार व मल विसर्जना नंतर बारा या प्रमाणें गुळण्या टाकाव्या.

## ॥ दंतशोधनाविषयीं ॥

॥ दन्तान्तरगतं चान्नं शोधनेनाहरेच्छनैः ॥
॥ कुर्यादनिहृतं तद्धि मुखस्यानिष्टगन्धताम् ॥
॥ दन्तलग्नमनिर्हार्यं लेपं मन्येत दन्तवत् ॥
॥ न तत्र बहुशः कुर्याद्यत्नं निर्हरणं प्रति ॥ नि. र.

चांगल्या खळखळून सोळा गुळण्या टाकल्यावरही दांतांतील खरकटें न निघालें तर दांत कोरण्यानें किंवा चारा वगैरेच्या काडीनें कोरून तें काढावें. दांतांत खरकटें राहिल्यानें त्यापासून तोंडास दुर्गंधी येऊं लागते. काडी वगैरेंनीं कोरल्यावरही दांतांतील खरकटें न निघालें तर तें काढण्याचा फार प्रयत्नही करूं नये, कारण ज्यास्त कोरल्यापासून हिरड्यांना इजा होते. तो अटकलेला पदार्थ दांतांचाच भाग समजावा, त्या-

ला कांहीं दोष नाहीं.

॥नेत्रोस्पर्शनम्॥

॥शर्यातिंच सुकन्यांच च्यवनं शक्रमश्विनौ॥
॥ भोजनान्ते स्मरेन्नित्यं तस्य चक्षुर्न नश्यति॥ स्मृ.सं.
॥ आचम्य जलयुक्ताभ्यां पाणिभ्यां चक्षुषी स्पृशेत्॥
॥ भुक्त्वा पाणितले घृष्ट्वा चक्षुषोर्यदि दीयते ॥
॥ अचिरेणैव तद्वारि तिमिराणि व्यपोहति ॥ नि.र.

आंचवल्यानंतर आचमन करून शर्याति, सुकन्या, च्यवन, इंद्र व अश्विनी कुमार यांचें स्मरण करावें व हातांनीं नेत्राला स्पर्श करावा. नंतर हातास हात चोळून ते ओले हात नेत्रांवर फिरवावें. असें केल्यानें तिमिरादि नेत्रपीडा नाहींशा होऊन दृष्टि नेहमीं सतेज राहते.

॥उदरालम्भनम्॥

॥ अगस्त्यं कुंभकर्णंच शनिंच वडवानलम्॥
॥ आहार पचनार्थाय स्मरेद्भीमं वृकोदरम्॥

॥ आतापी मारितो येन वातापीच निपातितः ॥
॥ समुद्रः शोषितो येन स मेऽगस्त्यः प्रसीदतु ॥
॥ इत्युक्त्वा तु स्वहस्तेन परिमार्ज्य निजोदरम् ॥ नारदः

अगस्ती, कुंभकर्ण, शनि, वडवानल व भीम यांचें, आहार पचन होण्या करितां स्मरण करावें; त्याच प्रमाणें आतापीला ज्यानें मारलें, वातापीचा ज्यानें निःपात केला व ज्यांनीं समुद्राचें शोषण केलें तो अगस्ती ऋषि माझें रक्षण करो असें म्हणून पोटावर हात फिरवावा; म्हणजे आहाराचें पचन होऊन आरोग्य प्राप्त होतें.

## ॥ निर्माल्यतुलसीग्रहणम् ॥

॥ भोजनानन्तरं विष्णोरर्पितं तुलसीदलम् ॥
॥ भक्षयेद्देहशुद्ध्यर्थं चान्द्रायणशताधिकम् ॥ ना.

भोजन झाल्यानंतर श्रीमहाविष्णूस अर्पण केलेलें असें निर्माल्य तुलसीपत्र भक्षण केलें असतां श-ताधिक चांद्रायणाचें फल प्राप्त होऊन देहशुद्धि होते.

## ॥ शतपदी ॥

॥ भुक्त्वा शतपदं गच्छेच्छनैस्तेन तु जायते ॥

॥ अन्नसंघातशैथिल्यं ग्रीवाजानुकटीसुखम्॥
॥ भुक्तोपविशतस्तुन्दं शयानस्यतुपुष्टता ॥
॥ आयुश्चंक्रममाणस्यमृत्युर्धावतिधावतः॥ नि.र.

भोजन झाल्यानंतर धीरेधीरे शतपदी करावी ( शंभर कदम चालावें ) या योगानें उदरांतील अन्नसंचय शिथिल होतो, व ग्रीवा, मांड्या आणि कंबर यांना सुख प्राप्त होतें. भोजन करतांक्षणीं लागलींच बसलें तर दोंद निघतें, निजलें तर मेद वाढून पुष्टता येते. धीरे धीरे डोललें असतां आयुष्याची वृद्धि होते. भोजना नंतर सहसा पळण्याचें करूंनये, कारण अशावेळीं जसजसें पळावें तसतसा मृत्यु त्याच्या बरोबर पळत येतो.

॥ भोजनान्ते शतपदं गत्वा ताम्बूल भक्षणम्॥
॥ शयनं वामकुक्षौ चेद्वैषज्यं किं प्रयोजनम्॥ स्मृ.सं.

भोजना नंतर शतपदी, तांबूल भक्षण, व वामकुक्षी इतक्या गोष्टी केल्या असतां त्याला औषधाचें कारण पडत नाहीं अर्थात् नेहमीं अरोग्य राहतें.

## ॥ताम्बूलभक्षणम्॥

॥ रतौ सुप्तोत्थिते स्नाते भुक्ते वान्ते च संगरे॥
॥ सभायां विदुषां राज्ञां कुर्यात्ताम्बूलचर्वणम्॥ नि.र.

भोजनानंतर, संभोगसमयीं, निजून उठल्यावर, स्नानसंध्यादि कृत्यें झाल्यावर, वमन (उलटी) झाल्यावर, युद्ध प्रसंगीं (कुस्ती किंवा संग्रामांत) सभास्थानीं असतांना इत्यादि प्रसंगीं विडा खाणें प्रशस्त होय.

## ॥ ताम्बुलाचे गुण ॥

॥ ताम्बूलं कटु तिक्त मुष्णमधुरं क्षारं कषायं सरम् ॥
॥ रुच्यं वीर्यकरं लघु प्रियतमं वैशद्य सौगन्ध्यकृत्॥
॥ आस्यस्याभरणं प्रसेकशमनं दौर्गन्ध्यहृच्छुद्धिकृ-
॥ ज्जन्तु श्लेष्ममरुद्गलामयहरं कांतिप्रदं वश्यकृत्॥
॥ वृष्यं दन्तविरंजनं श्रमहरं सौभाग्यदं कीर्त्तितम्॥
॥ जिव्हा जाड्यगदापहं मुनिवरैर्नक्षत्र गुण्यं मतम्॥

चरमरितपणा, कडुपणा, उष्णता, गोडी, खारटपणा, तुरटपणा रेचकता, रुचकरपणा, वीर्यकारक,

हलकेपणा; स्वच्छताकारक, सुगंधितपणा; तोंडाला शोभा आणणें, तोंडांतील लाळेच्या अवरोध करणें; मुखाची दुर्गन्धी नाहींशी करणें; शुद्धि करणें; कृमिनाशक; कफ, वायु, गळरोग, यांचा नाश करणें; कांतिउत्पन्न करणें; वशीकरण करणें; वृष्य; दांतांना रंगआणणें; श्रमनाशकता; सौभाग्यदायक; आणि जिभेची जडता नाहींशी करणें असे २७ गुण तांबुलाचेठिकाणीं आहेत.

## ॥ काथचुन्याचेंन्यूनाधिक्य ॥

॥ सुक्तेनचूर्णेनकरोतिरागंरागक्षयंपूगफलातिरिक्तम्॥
॥ चूर्णाधिकंवक्त्रविगंधकारि पत्राधिकंसाधुकरोतिगंधम्॥
॥ पत्राधिकंनिशिहितंसफलंदिवाच प्रोक्तान्यथाकरणमस्यविडंबनैव॥

बरोबर चूना असला तर विडा चांगला रंगतो; सुपारी अधिक असली तर विडा चांगला रंगत नाहीं; विडयांत ज्यास्त चुना असला तर तोंडाला दुर्गंधी येते; व पानें अधिक असलीं तर सुगंधउत्पन्न होतो. रात्रीं ज्यास्त पानांचा विडा खाणें चांगलें व दिवसा सुपारी सहित खाणें चांगलें; याव्यतिरिक्त विडाखाणें चांगलें नाहीं.

## ॥ पानाचेगुण ॥

॥ नवंतदेवमधुरं कषायानु सरं गुरु ॥
॥ बलासजनकं प्रायः पत्रशाकसमंस्मृतम् ॥
॥ पर्णपुराणमकटु क्षुल्लकंतनुपांडुरम् ॥
॥ विशेषाद्गुणवत्ज्ञेयं अन्यद्धीनगुणंमतम् ॥ नि.र.

नवें पान गोड, तुरट, जड, कफकारक व पत्रशाके प्रमाणें गुणकारक असते. जुनें पान जें हलकें, पातळ व पिंवळें असेंतें विशेष गुणकारक असतें. परंतु कोंवळें पान मात्र गुणरहित होतें.

॥ सुपारीचेगुण ॥

॥ पूगंगुरुहिमंरूक्षं कषायंकफपित्तनुत् ॥
॥ मोहनंदीपनंरुच्यंआस्यवैरस्यनाशनम् ॥
॥ पूगंस्यात् दृढमध्यंयत्स्विन्नंवापित्रिदोषनुत् ॥
॥ सरसंगुर्वभिष्यन्दितदृशंवन्हिनाशनम् ॥ नि.र.

सुपारी जड, थंड, रुक्ष, तुरट, कफपित्तनाशक, मोह उत्पन्न करणारी, दीपन, रुचिकर, व तोंडाची विरसता नाश करणारी आहे. शिजवून तयार केलेली अर्थात् चिकून सुपारी त्रिदोष नाशक, स्वादिष्ट,

जड, लाळ वाहविणारी, व वन्हि नाशक होय.

॥ ताम्बूललक्षणम् ॥

॥ काश्मीरैलालवङ्गैश्चजातिक्रमुकचूर्णकैः ॥
॥ ताम्बूलं खादयेन्नित्यं खादिरेण समन्वितम् ॥ स्मृ.सं.

केशर, लवंग, जायपत्री, सुपारी, चुना काथ व वेलदोडा इत्यादि पदार्थांनीं युक्त असा तांबूल नित्यशः भक्षण करावा.

॥ पानाचेंत्याज्याङ्ग ॥

॥ आयुरग्रेयशो मूले लक्ष्मी मध्ये व्यवस्थिता ॥
॥ तस्मादग्रं तथामूलं मध्यं पर्णस्य वर्जयेत् ॥
॥ पर्णमूले भवेद्व्याधिः पर्णाग्रे पापसंभवः ॥
॥ चूर्णपत्रं हरत्यायुः शिरा बुद्धिविनाशिनी ॥ नि.र.

पानाच्या अग्राच्या ठिकाणीं आयुष्य, मूलाच्या ठिकाणीं यश, आणि मध्याच्या ठिकाणीं लक्ष्मी वास करते याकरितां पानाचें मूल, मध्य व अग्र तोडल्यावांचून पान खावूं नये. पानाचें मूल भक्षण केल्या-

नें व्याधि उत्पन्न होतें, अग्रभाग भक्षणानें पाप लागतें, चुरा झालेलें किंवा वाळलेलें पान भक्षण के-
ल्यानें आयुष्याचा क्षय होतो व पानाच्या शिरा खाल्यानें बुद्धीचा नाश होतो.

## ॥ताम्बूलनिषेध॥

॥ ताम्बूलं नाति सेवेत नविरक्तो बुभुक्षितः॥
॥ देहदृक्केशदंताग्निश्रोत्रवर्णबलक्षयः॥
॥ शोषः पित्तानिलास्त्रं स्यादति ताम्बूलभक्षणात्॥
॥ ताम्बूलं नहितं दन्तदुर्बले क्षणरोगिणाम्॥
॥ विषमूर्च्छामदार्त्तानां क्षतिनां रक्तपित्तिनाम्॥ नि.र.

शौच्याचा उपद्रव झाला असतां किंवा भूक लागली असतां विडा खाऊं नये; खाल्ला असतां देह, दृष्टि, केंश, दांत, अग्नि, कान, कांति आणि बळ यांचा नाश होतो; त्याचप्रमाणें शोष, पित्त, वातरक्त हे विकार होतात. ज्याचे दांत दुर्बळ आहेत, ज्याला नेत्ररोग, विष, मूर्च्छा, मद, उरक्षत, रक्तपित्ती इ० विकार आहेत त्यांना तांबूल भक्षण करणें वर्ज आहे.

॥ ताम्बूलं विधवास्त्रीणां यतीनां ब्रम्हचारिणाम्॥

॥ तपस्विनांचविप्रेन्द्र सर्वपुण्यहरंस्मृतम् ॥ वाच॰

विधवा स्त्री, सन्यासी, ब्रम्हचारी, तपस्वी, विप्रेन्द्र यांनीं तांबूल भक्षण केला असतां त्यांचे सर्व पुण्य लयास जातें.

॥ अनिधायमुखेपर्णं पूगंखादतियोनरः ॥
॥ दशजन्मदरिद्रःस्यात्ततश्चाधोगतिं व्रजेत् ॥ नि.र.

विडया वांचून तुसती सुपारी खाणारा शतजन्म दरिद्री होऊन अधोगतीला जातो; परंतु हा नियम ज्यांना तांबूल निषेध आहे त्यांना लागू नाहीं.

॥ त्रयोदशपदार्थीताम्बूल ॥

चन्द्रश्चन्द्रनिभाननेचखदिरं पत्रंत्वगेला सुधा
जातीपत्र्यपिपत्रयुक्तवदने कङ्कोलजातीफलम् ॥
कस्तूरीचलवङ्गमेणिनयने बाल्हीकपूगीफलम्
द्रव्यैरेभिरपित्रयोदशमितैस्ताम्बूलमित्युच्यते ॥ नि.र.

कापूर, काथ, पान, दालचिनी, वेलदोडा, चुना, जायपत्री, कंकोळ, जायफळ, कस्तुरी, लवंग,

केशर, आणि सुपारी इ॰ पदार्थांनीं युक्त जो तांबूल तो भक्षण करणें प्रशस्त होय.

## ॥ भोजनानंतर वर्ज गोष्टी ॥

॥ शयनंचाशनंचाति नभजेन्न द्रवाधिकम् ॥
॥ नाग्न्यातपौ नप्लवनं नयानं नापिवाहनम् ॥
॥ व्यायामंच व्यवायंच धावनंच परिश्रमम् ॥
॥ युद्धं गीतंच पाठंच मुहूर्तं भुक्तवांस्त्यजेत् ॥ नि.र.

अति निजणें, अति खाणें, अति द्रवरूप पदार्थांचें भक्षण, शेकणें, ऊन घेणें, पोहणें, यान, वाहन, व्यायाम, स्त्रीसंग, धांवणें, अतिश्रम, युद्ध करणें, गाणें, अध्ययन हीं जेवल्यानंतर एक मुहूर्त (दोन घटका) पर्यंत करूं नये.

## ॥ वामकुक्षी ॥

॥ श्वासानष्टौ समुत्तानस्तान्द्विःपार्श्वेतुदक्षिणे ॥
॥ ततस्तु द्विगुणान्वामेश्चात्सुप्याद्यथासुखम् ॥
॥ वामदिशायामनलोनाभेरूर्ध्वोऽस्तिजंतूनां ॥

॥ तस्मात्तु वामपार्श्वेशयीतभुक्तप्रपाकार्य ॥ नि.र.

भोजन झाल्यानंतर आठ श्वास होई पर्यंत उताणें निजावें; नंतर उजवे कुशीवर सोळा श्वास होई पर्यंत निजावें; त्यानंतर डावे कुशीवर बत्तीस श्वास होईपर्यंत निजावें आणि नंतर इच्छेनुसार पाहिजेतसें निजावें. मनुष्याच्या वामभागीं नाभीवर अग्निस्थान आहे, याकरितां भोजन केलेलें जिरण्याकरितां डावे बाजूवर निजणें चांगलें होय.

## ॥ रात्रीविधि ॥

### ॥ संध्याकाल ॥

॥ उत्तमातारकोपेतामध्यमालुप्ततारका ॥
॥ अधमासूर्यसहिताप्रातःसंध्यात्रिधामता ॥
॥ उत्तमासूर्यसहितामध्यमालुप्तभास्करा ॥
॥ अधमातारकोपेता सायंसंध्यात्रिधामता ॥
॥ अर्ध्यर्धयामादासायंसंध्यामाध्यान्हिकीष्यते ॥ ध.सिं.



प्रातःकाळीं नक्षत्रें चांगलीं दिसत असतां संध्योपासनास आरंभ करणें हा उत्तम काल, नक्षत्रें

अदृश्य होत असतां आरंभ करणें तो मध्यम काल, आणि सूर्योदय झाल्यानंतर आरंभ करणें तो कनिष्ठ काल होय. याप्रमाणें प्रातःसंध्याकाल तीन प्रकारचा जाणावा. सायंकाळीं सूर्य चांगला दिसत असतां संध्योपासनास आरंभ करावा तो उत्तम काल, सूर्यास्त झाल्यावर आरंभ करणें तो मध्यम काल आणि नक्षत्रें दिसूं लागल्यावर आरंभ करणें तो कनिष्ठ काल जाणावा. याप्रमाणें सायंसंध्येचा काल तीन प्रकारचा होय. दीड प्रहर दिवसापासून सायंकालपर्यंत माध्यान्ह संध्याकाळ होय

## ॥ सन्ध्यास्थल ॥

॥ पुण्यक्षेत्रं नदीतीरं गुहापर्वतमस्तकम्॥<br>
॥ तीर्थप्रदेशाःसिन्धूनांसंगमः पावनं सरः॥<br>
॥ उद्यानानिविविक्तानि बिल्वमूलं तटंगिरेः ॥<br>
॥ देवाद्यायतनं कूलं समुद्रस्य निजं गृहम् ॥ शार०

पुण्यक्षेत्र, नदीतीर, गुहा, पर्वताचें शिखर, तीर्थ प्रदेश, नदीसंगमस्थान, पवित्र सरोवर, निर्जन बगीचा, बिल्ववृक्षाचें मूळ, गिरीतट, देवालय, समुद्र तीर व स्वकीय गृह हीं स्थलें संध्येस विहित

आहेत.



## ॥ सायंसंध्याफल ॥

॥ यदुपस्थकृतंपापं यच्चयोनिकृतंभवेत् ॥
॥ सायंसंध्यामुपस्थाय तेनतस्मात्प्रमुच्यते ॥ बोधा०

मनुष्याच्या गुह्येंद्रियकृत पापाचा सायंसंध्या नाश करणारी होय.

## ॥ संध्याकालातिक्रांताविषयी ॥

॥ कालातिक्रमणेचैवत्रिसंध्यमपिसर्वदा ॥
॥ चतुर्थार्घ्यंप्रकुर्वीतभानोर्व्याहृतिपूर्वकम् ॥ वसि०

कोणत्याही संध्येचा काल अतिक्रांत झाल्यास महाव्याहृतिपूर्वक सूर्यास चौथाअर्घ्य द्यावा म्हणजे दोषजातो.

## ॥ दीप विचार ॥

॥ रवेरस्तंसमारभ्ययावत्सूर्योदयोभवेत् ॥
॥ यस्यतिष्ठेद्गृहेदीपस्तस्यनास्तिदरिद्रता ॥

॥ आयुर्दः प्राङ्मुखोदीपो धनदःस्यादुदङ्मुखः॥
॥ प्रत्यङ्मुखो दुःखदोऽसौ हानिदो दक्षिणामुखः॥ मरिचिः

॥ नेत्राल्हादकरः सार्चिर्दूरतापविवर्जितः ॥
॥ सुशिखः शब्दरहितो निर्धूमो नातिन्हस्वकः॥
॥ कोशजं रोमजं वस्त्रंवर्तिकार्येन योजयेत् ॥
॥ नमिश्रीकृत्य दद्यात्तु दीपं स्नेहे घृतादिकम्॥
॥ कार्पासवर्त्तिका प्रोक्तादीपकृत्येषु सर्वदा॥
॥ नचैवस्थापयेद्दीपं साक्षाद्भूमौ कदाचन ॥
॥दीपनिर्वापणात्पुंसः कुष्मांडच्छेदनात् स्त्रियः॥
॥ अचिरेणैव कालेन वंशनाशो भवेद्ध्रुवम्॥ सुद०

ज्याचे घरीं सूर्यास्तापासून सूर्योदया पर्यंत दीप प्रज्वलित असतो त्यास कधींही दारिद्र्य येत नाहीं. पूर्वाभिमुख दीप आयुष्य प्रद, उत्तराभिमुख लक्ष्मी प्रद, पश्चिमाभिमुख दुःखप्रद, व दक्षिणाभिमुख हानिप्रद होतो. डोळयांस सुख देणारा, चांगल्या वातीनें युक्त, ताप न देणारा, ढळढळीत, फुर-

फुर शब्द न करणारा, निर्धूम, फार लहान नाहीं असा दीप असावा. त्या दिव्यांत कापसाची वात असावी. लोंकर, रेशीम व केंश हे वातीला वर्ज आहेत. तूप व तेल एकत्र करून दिव्यांत घालूं नये, व भूईवर दिवा ठेवूं नये. पुरुषानें दिवा मालवूं नये, व स्त्रियांनीं कुष्मांड फोडूं नये; तसें केल्यास वंशक्षय होतो.

## ॥ दीपस्तुति ॥

॥ दीपाज्योतिः परब्रम्ह दीपोज्योतिर्जनार्दनः ॥
॥ दीपो हरतु मे पापं संध्यादीप नमोस्तुते ॥
॥ शुभं करोतु कल्याणमारोग्यं सुखसंपदम् ॥
॥ शत्रुबुद्धि विनाशंच दीपज्योतिर्नमोऽस्तुते ॥

दीप प्रज्वलित करतांच वरील दोन श्लोकांनीं त्याची स्तुति करून त्याला नमस्कार करावा.

## ॥ प्रदोषकालीं वर्ज गोष्टी ॥

॥ आहारं मैथुनं निद्रां संपाठं गतिम ध्वनि ॥
॥ एतानि पंचकर्माणि संध्यायां वर्जयेद्बुधः ॥

॥ भोजनाज्जायतेव्याधिर्मैथुनाद्गर्भवैकृतिः ॥
॥ निद्रायांनिस्वतापाठादायुर्हानिर्गतेर्भयम् ॥ नि.र.

सायंकाळचे वेळीं भोजन, मैथुन, निद्रा, विद्याभ्यास आणि मार्ग क्रमण या पांच गोष्टी वर्ज कराव्या. सायंकाळीं भोजन केलें असतां व्याधि उत्पन्न होते, मैथुन केलें असतां संतति कुरुप होते, झोंप घेतली असतां दारिद्र्य प्राप्त होते, विद्याभ्यास केला असतां आयुष्याची हानि होते आणि मार्ग क्रमण केलें असतां भय प्राप्त होते. याकरितां या पांची गोष्टी वर्ज ठेवाव्या.

## ॥ रात्रौ भोजन काळ ॥

॥ रात्रौच भोजनंकुर्यात्प्रथम प्रहरान्तरे ॥
॥ किंचिदूनंसमश्नीयाद्दुर्जरंतत्रवर्जयेत् ॥ नि.र.
॥ रात्रौ भोजन कालेच यदादीपविनश्यति ॥
॥ पाणिभ्यांपात्रमादाय भास्करंमनसास्मरेत् ॥
॥ पुनर्दीपमुखंदृष्ट्वातच्छेषंभोजयेद्द्विजः ॥
॥ पुनरान्नंनभोक्तव्यंभुक्त्वाचांद्रायणंचरेत् ॥ स्मृ.सं.

रात्रौ भोजन करावयाचें तें पहिल्या प्रहरांत करावें. आणि अल्प अहार म्हणजे जितकी भूक असेल त्यापेक्षां कमी खावें. जडान्न म्हणजे लवकर पचन न होणारे कठिण पदार्थ रात्रीं खाण्याचें करूं नये. रात्रौ भोजन करतेवेळीं जर दिवा मालवलागेला तर पुनः दिवा लावी पावेतों, पात्राखालीं दोन्ही हात घालून सूर्याचें स्मरण करावें, दिवा लावल्यावर पात्रावर जेवढे पदार्थ असतील तेवढेच भक्षण करावें, ज्यास्त घेऊं नये, घेतलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त आहे.

## ॥ शयनकाल ॥

॥ उपास्य पश्चिमां संध्यां हुत्वाग्नीं स्तानुपास्य च ॥
॥ भृत्यैः परिवृतो भुक्त्वा नाति तृप्याथ संविशेत् ॥ याज्ञ.
॥ पूर्वरात्रे व्यतीते तु संगच्छेद्रति मन्दिरम् ॥
॥ पादौ प्रक्षालयेत्पूर्वं पश्चाच्छय्यां समाविशेत् ॥ यमः

सायंसंध्यादि नित्यकर्मे आणि भोजन झाल्यावर कांहीं वेळ पावेतों आनंदाच्या गोष्टी कराव्या. प्रहर रात्र लोटल्यानंतर शयन मंदिरांत गमन करावें आणि पाद प्रक्षालन करून नंतर उत्तम प्रकारच्या शय्येवर आरूढ व्हावें.

## ॥ शयनस्थल ॥

॥ विस्तीर्णे ललिते सुधाधवलिते चित्रादिनालंकृते ॥
॥ रम्ये प्रोन्नतमंचकेऽगुरुमहाधूपादिपुष्पान्विते ॥
॥ संगीतांगविराजिते स्वभवने दीपप्रभाभासुरे ॥
॥ निःशंकं सुरतं यथाभिलषितं कुर्यात्समं कांतया ॥ नि.र.

आपल्या घरांत विस्तीर्ण आणि चांगल्या जागेस सफेती देऊन चित्रादिकांनीं सुशोभित करून त्या मध्यें सुंदर आणि उंच असा पलंग मांडून त्यास अगरबत्या वगैरेच्या उत्तम सुगंधी धूपानें सुवासित करून त्यावर फुलाची सेज करावी. आणि तेथें वीणा, मृदंग इ॰ गायनाचीं साहित्यें, दूध, तांबूल इ॰ विलासाचे पदार्थ ठेविलेले असून चहुंकडे दिव्याचा चकचकाट असावा. अशा ठिकाणीं कांते सह वर्तमान शंकारहित इच्छेप्रमाणें रममाण व्हावें.

## ॥ शय्याविचार ॥

॥ त्रिदोषशमनी खट्वा तूली वातकफापहा ॥
॥ भूशय्या बृंहणी वृष्या काष्ठपट्टी तु वातला ॥

॥ भूशय्यावातलातीवरुक्षापित्तास्त्रनाशिनी ॥ नि॰र॰

पलंगावर निजलें असतां त्रिदोष नाश होतो; आणि गादीवर वायु व कफ यांचा नाश होतो. भूशय्या स्थूलता करिते व ती वृष्य आहे. लांकडाच्या फळीवर निजलें तर वायु कोपतो; भूशय्या वातकर रुक्ष व रक्तपित्त नाशक अशी आहे.

॥ सुशय्याशयनं हृद्यं पुष्टिनिद्रा धृतिप्रदम् ॥
॥ श्रमानिलहरं वृष्यं विपरीत मतोऽन्यथा ॥ नि॰

सुंदर सेजेवर शयन केल्यानें पुष्टि, निद्रा व धैर्य हीं प्राप्त होतात. तसेंच श्रम व वायु यांचा नाश होतो. शय्या जर चांगली नसली तर वरील प्रकारचें सौख्य प्राप्त न होतां विपरित परिणाम होतात.

## ॥ वायुविषयीं ॥

॥ प्रवातं रौक्ष्यवैवर्ण्यस्तंभकृद्दाहपित्तनुत् ॥
॥ स्वेदमूर्छापिपासाघ्नमप्रवात मतोऽन्यथा ॥
॥ सुखं प्रवातं सेवेत ग्रीष्मे शरदि चांतरा ॥
॥ निर्वातमायुषे सेव्यमारोग्याय च सर्वदा ॥

निजल्यावर वारा घेतला असतां तो रुक्ष आहे व विवर्णता, स्तंभ यांना करितो. आणि दाह, पित्त, स्वेद, मूर्छा, तृषा यांचा नाश करितो; आणि वारा घेतला नाहीं तर याच्या उलट परिणाम होतात. ग्रीष्म व शरदृतु यांचे ठायीं सुखानें वारा घ्यावा. मनुष्यानें नेहमीं वारा घेऊं नये, कारण तो न घेतल्यानें आयुष्य व आरोग्य वाढतें.

॥ व्यजनस्यानिलोदाहस्वेदमूर्च्छाश्रमापहः ॥
॥ तालवृन्तभवोवातस्त्रिदोषशमनोमतः ॥
॥ वंशव्यजनजस्तूष्णोरक्तपित्तप्रकोपनः ॥
॥ चामरोवस्त्रसंभूतोमायूरोवेत्रजस्तथा॥
॥ एतेदोषजितावाताःस्निग्धाहृद्याःसुपूजिताः॥ नि.

पंख्याचा वारा घेतल्यानें दाह, घाम, मूर्च्छा व श्रम यांचा नाश होतो. ताडाच्या पंख्याचा वारा त्रिदोष नाशक समजावा. बांसाच्या पंख्याचा वारा उष्ण व रक्तपित्त दूषित करणारा होय. तसेंच चवरी, वस्त्राचा पंखा, मयुरपिच्छ, मोरछल, व बेत इत्यादिकांच्या पंख्याचा वारा त्रिदोषनाशक, स्निग्ध, प्रिय व उत्तम समजावा.

॥ प्रवातंरौक्ष्यवैवर्ण्यस्तंभद्दाहपित्तनुत् ॥
॥ स्वेदमूर्च्छापिपासाघ्नमप्रवातमतोन्यथा ॥ नि.

झोंपेंतून उठतांच वारा घेणें रूक्ष असून विवर्णता, स्तंभ, यांची उत्पत्ति होते. आणि दाह, पित्त, घाम, मूर्च्छा, तृषा यांचा नाश करण्याचा वायूचे ठिकाणीं धर्म आहे, पण झोंपेंतून उठतांच वारा घेतल्यानें विपरीत परिणाम होतो; यासाठीं झोंपेंतून उठल्यावर कांहीं वेळानें वारा घेणें चांगलें.

## ॥ निद्रेचे गुण ॥

॥ निद्रातुसेविताकाले धातुसाम्यमतंद्रिकाम् ॥
॥ पुष्टिवर्णबलोत्साहान्वह्निदीप्तिं करोतिच ॥ नि.

योग्य वेळेस निद्रा केली असतां ती धातूंचें साम्य व अनालस्य, पुष्टि, कांति, बळ, हुषारी व जठराग्नीचें दीपन यांना करिते.

## ॥ अयोग्य शय्या ॥

॥ नविशालांनवाभग्नांनासमांमलिनांनच ॥
॥ नचजंतुमयीं शय्यामधितिष्ठेदनास्तृताम् ॥ नि.

फार मोठी, किंवा फार लहान, तुटलेली, उंचनिंच व जींत ढेंकुण, पिसा इत्यादि प्राणी असून गलिच्छ असेल अशा शय्येवर निजूं नये.

## ॥ दिग्विचार ॥

॥ प्राक्शिराःशयनेविन्द्याद्धनमायुश्चदक्षिणे ॥
॥ पश्चिमे प्रबलाचिन्ताहानिर्मृत्युरथोत्तरे ॥ मा०

पूर्वेकडेस मस्तक करून निजल्यास धनाची वृद्धि होते, दक्षिणेकडेस केल्यास आयुष्य वाढते, पश्चिमेकडेस केल्यास चिंता प्राप्त होते, आणि उत्तरेकडेस मस्तक करून निजल्यास हानि व मृत्यु प्राप्त होतो.

॥ उपानहौवेणुदंडमंबुपात्रंतथैवच ॥
॥ तांबूलादिनिरम्यानिसमीपेस्थापयेद्गृही ॥
॥ नार्द्रवासाश्चनग्नश्चशून्येभ्यक्तश्चखेऽशुचिः ॥

निजण्याचे ठिकाणीं पायांतील जोडा, बांसाची काठी, पाणी भरलेलें भांडें आणि विडयाचें सामान ठेवण्याचें करावें. ओल्या वस्त्रांनीं, नग्न, ओसाड घरांत, तेल लावून, अत्यंत उंच ठिकाणीं आणि अमंगळ ठिकाणीं निजण्याचें करूं नये.

## ॥ संभोगविचार ॥

॥ शरीरेजायते नित्यं देहिनां सुरतस्पृहा ॥
॥ अव्यवायान्मेह मेदो वृद्धिः शिथिलतातनोः ॥ नि.

प्राणीमात्रास नित्य स्त्रीभोगाविषयीं इच्छा उत्पन्न होणें हा सृष्टिधर्मच आहे. व तो न केल्यास मेह व मेद वाढतात; आणि शरीराला अगदीं सैलपणा येतो.

## ॥ स्वस्त्री प्रसन्न ठेवण्याचा प्रकार ॥

॥ बालातांबूल मालाद्यैस्तरुणी भूरि भूषणैः ॥
॥ सुप्रेम्णारज्यति प्रौढावृद्धास्वालापगौरवैः ॥ नि.

अकरा वर्षांपासून सोळा वर्षें पर्यंत जी स्त्री तिला बाला ह्मणतात. ती पुष्पें, विडा, वेणींत घालावया चे गजरे, चांगले गोड पदार्थ खाण्यास देणें, इत्यादिकें करून चांगली प्रसन्न होते. सोळा वर्षांपासून तों तीस वर्षांपर्यंत जी स्त्री तिला तरुणी अशी संज्ञा आहे. ती अलंकार, नवीन चांगलीं वस्त्रें वगैरे भूषणा नें प्रसन्न राहते. तीस वर्षांपासून पंचावन वर्षें पर्यंत जी स्त्री ती प्रौढा. ती चांगल्या प्रेमानें प्रसन्न रा हते. पुढें ती वृद्धा समजावी. ती मोठेपणाचे स्तुतीनें प्रसन्न राहते.

## ॥ स्त्री उदास होण्याचीं कारणें ॥

॥ कार्पण्यादतिमानरोगविरहोद्योगादिपारुष्यतो ॥
॥ मालिन्यासमयज्ञतादि भयतःशोकाद्दरिद्रादपि ॥
॥ भर्तॄणांतनुतादिभिश्चवपुषः काठिन्यतःशंकना ॥
॥ दोषाणांचवृथाप्रयांतिवनितावैराग्यमुच्चैःसदा ॥ नि.

१ नेहमीं कृपणपणा करणें, २- मर्यादा व मान फार धरविणें, ३- रोगाचा उपद्रव, ४- भ्रताराचा विरह ५- फार कामकाज करविणें, ६- मारणें, ७- शिव्या देणें, ८- मलिनपणा, ९- वेळ अवेळ न पाहून वर्तणें, १० फार धाक दाखविणें, ११- शोक, १२- दरिद्रपणा, १३ भ्रताराची अशक्तता, १४- निर्दयपणा करणें, १५ वाईट कर्माचा आरोप घालणें अशा या पंधरा कारणांनीं स्त्रियांचें मन बिघडून त्या विदेही म्हणजे उदासीन होतात, किंवा भ्रष्ट होतात. यासाठीं स्त्रियांस इतक्या गोष्टीं विषयीं होतां होईल तितकें जपलें पाहिजे.

## ॥ स्त्रियांच्यामतिभंगाचीं कारणें ॥

॥ पितृसदननिवासःसंगमःपुंश्चलीभिः ॥

॥ प्रवसनमपिपत्युर्बाधकंसेर्ष्यताच ॥
॥ वसतिरथचपुंभिर्दुष्टशीलैस्त्ववश्यं ॥
॥ क्षतिरपिनिजवृत्तेर्योषितांनाशहेतुः ॥
॥ निर्लज्जाविधवाकलासुकुशलागोष्ठीपरादुर्भगा ॥
॥ क्लीबस्थूलकठोरवामनजरद्भार्याविरूपस्यच ॥
॥ द्वारावस्थितिशीलिकातिचपलावंध्यामहामानिनी ॥
॥ प्रत्यस्तातरुणीमहाविरहिणीसाध्याःसुखेनांगनाः ॥ नि.

१ स्त्रीस मोठेपणीं फार वर्षे पर्यंत माहेरीं ठेवणें, २- व्यभिचारिणी स्त्रियांची संगत, ३- भ्रतार फार दिवस प्रवासास गेलेला, किंवा म्हातारा व रागीट, ४- वाईट कर्मे करणाऱ्या मनुष्यांत वस्ती, ५- निर्वाहाची अडचण, इतक्या कारणांनीं स्त्रियांचा मतिभंग होऊन त्या अवश्य भ्रष्ट होण्याचा संभव आहे. तसेंच १- मर्यादा रहित, २- विधवा, ३ नृत्यगायनादिकांत कुशल, ४- गोष्टी वेल्हाळ, ५- दरिद्री, ६- जिचा पति षंढ, अति स्थूल, निर्दय, खुरटा, वृद्ध व कुरूप आहे अशी, ७- दारांत उभी राहणारी, ८ फार चंचळ, ९- वांझ, १०- बढाईखोर, ११- पतिविरहित झालेली, १२- अत्यंत उमेदवार, १३- फारदि-

वस पतिवियोग झालेली, इतक्या प्रकारच्या स्त्रियांस फार जपलें पाहिजे. कारण त्या कोणत्या वेळीं भ्र
ष्ट होतील याचा नेम नाहीं

## ॥ स्त्रियांचा ऋतुकाल ॥

॥ ऋतुःस्वाभाविकःस्त्रीणांरात्रयःषोडशस्मृताः ॥
॥ तासामाद्याश्चतस्त्रस्तुनिंदितैकादशीचया ॥
॥ त्रयोदशीचशेषाःस्युप्रशस्तादशवासराः ॥
॥ तस्मात्रिरात्रंचांडालींपुष्पितांपरिवर्जयेत् ॥
॥ रात्रौचतुर्थ्यांपुत्रस्यादल्पायुर्धनवर्जितः ॥
॥ पंचम्यांपुत्रिणीनारीषष्ठ्यांपुत्रस्तुमध्यमः ॥
॥ सप्तम्यामप्रजायोषिदष्टम्यामीश्वरःपुमान् ॥
॥ नवम्यांसुभगानारीदशम्यांप्रवरःसुतः ॥
॥ एकादश्यामधर्म्यःस्याद्द्वादश्यांपुरुषोत्तमः ॥
॥ त्रयोदश्यांसुतापापावर्णसंकरकारिणी ॥

॥ धर्मज्ञश्चकृतज्ञश्चआत्मवेदीदृढव्रतः ॥
॥ प्रजायतेचतुर्दश्यांपंचदश्यांपतिव्रता ॥
॥ आश्रयःसर्वभूतानांषोडश्यांजायतेपुमान् ॥ ज्यो.शा.

ऋतुदर्शन झाल्यापासून स्वभावें करून स्त्रीचे ठिकाणीं तो सोळा रात्री असतो. त्यांमध्यें प्रथम ३ रात्रीं पुष्पवती चांडाळीसम होय. आणि चौथी, अकरावी व तेरावी ह्यानिंदित वर्ज करून शेष १० रात्री गमनास प्रशस्त होत. चौथे रात्रीस स्त्री संग केला असतां अल्पायुषी आणि धनवर्जित असा पुत्र होतो. पांचव्या रात्रीस कन्या; सहाव्या रात्रीस मध्यम पुत्र; सातव्या रात्रीस अपत्य होणार नाहीं. आठव्या रात्रीस ईश्वरभक्त पुत्र; ९ व्या रात्रीस सौभाग्यवृद्धि; १० व्या रात्रीस गुणवान् पुत्र; ११ व्या रात्रीस अधार्मिक पुत्र; १२ व्या रात्रीस उत्तम पुरुष; १३ व्या रात्रीस पापकर्मी कन्या; १४ व्या रात्रीस धर्म, कृतज्ञता जाणणारा, आत्मवेत्ता व दृढव्रत करणारा असा पुत्र होईल; १५ व्या रात्रीस पतिव्रता कन्या आणि १६ वे रात्रीस सर्वभूतांस आश्रय देणारा असा पुत्र होईल.

॥ संभोगास वर्ज काल व स्थल ॥

॥ नोपेयात्पुरुषोनारींसन्ध्ययोर्नचपर्वसु ॥

॥ गोसर्गेचार्धरात्रेचतथामध्यंदिनेपिच ॥
॥ चतुर्दश्यष्टमीचैवआमावास्याचपूर्णिमा ॥
॥ देशेगुरुजनासन्नेविवृतेतिचपाकरे ॥
॥ श्रूयमाणव्यथाहेतुवचनेचरमेन्नच ॥
॥ वन्हिब्राम्हणपूज्यवर्गनिकटेनद्यांचदेवालये ॥
॥ दुर्गादौचचतुष्पथेपरगृहेऽरण्येस्मशानेदिवा ॥
॥ संक्रांतौशशिसंक्षयेथशरदीग्रीष्मेज्वरार्तेर्व्रते ॥
॥ संध्यायांचपरिश्रमेषुसुरतंकुर्यान्नविद्वान्क्वचित् ॥ नि.

प्रातःकाळचा व सायंकाळचा संधिसमय, गाय सोडण्याची वेळ, मध्यान्हरात्र, दिवस, या वेळां व त्याचप्रमाणें चतुर्दशी, अष्टमी, आमावास्या, पौर्णिमा, संक्रांत्यादि पर्वकाळ, एकादशी आणि श्राद्धादि व्रत दिवस, अत्यंत थंडी व अत्यंत गर्मीच्या वेळीं, ज्वरादि प्रसंगीं आणि परिश्रम केल्यानंतर संभोग करणें सर्वथा वर्ज होय. तसेंच गुरुजन ह्मणजे मातापित्यादि श्रेष्ठजनाचे सान्निध्य, देव, अग्नि, ब्राम्हण यांचे समोर, नदीच्या कांठीं, देवालयांत, किल्ल्यादिकांचे ठिकाणीं, चव्हाट्यावर, परक्याचे घरीं, स्मशानांत, अत्यंत निर्ल-

ज्य पणानें आणि ज्या ठिकाणीं त्रासदायक शब्द ऐकूं येत असतील अशा ठिकाणीं संभोग करणें वर्ज होय.

## ॥ संभोगविधि ॥

॥ धौतवस्त्रंचताम्बूलंसंयोगेचसुखावहम् ॥
॥ भर्तुःपादौनमस्कृत्यपश्चाच्छय्यांसमाविशेत् ॥
॥ संस्मृत्यपरमात्मानंपत्न्याजङ्घे प्रसारयेत् ॥
॥ रेतःसिञ्चेत्ततोयोन्यांतस्माद्गर्भंबिभर्तिति ॥ आचा.
॥ आहाराचारचेष्टाभिर्यादृशीभिःसमन्वितौ ॥
॥ स्त्रीपुंसौसमुपेयातांतयोःपुत्रोऽपितादृशः ॥ स्मृ.सं.

संभोगसमयीं स्त्रीनें धौतवस्त्र नेसून तांबूल सेवन केल्यावर आनंदित होऊन पतीला नमस्कार करावा व परमेश्वराचें ध्यानांत मन निमग्न करून पतीशीं रममाण व्हावें. गर्भसंभव समयीं ज्या प्रमाणें आहार, चेष्टा आणि उभयतां स्त्री पुरुषांची जशी मनोभावना असेल तदनुरूप गर्भ उत्पन्न होईल. त्यासाठीं त्यावेळेला उभयतांनीं आपलीं आनंदयुक्त मनें ईश्वर भावनेंत ठेवावीं.

## ॥ संभोगास अयोग्य पुरुष ॥

॥अत्याशितोऽधृतिः क्षुद्धान्सव्यथांगः पिपासितः॥
॥बालोवृद्धोन्यवेगार्तस्त्यजेद्रोगीचमैथुनम्॥ नि.

फार भोजन केलेला, अधीर, भुकेला, व्यथितांग, तृषार्त बालक, म्हातारा व इतर रोगपीडित अशा पुरुषांनीं मैथुन करूं नये.

## ॥संभोगास अयोग्य स्त्री॥

॥रजस्वलामकामांचमलिनामप्रियांतथा॥
॥वर्णवृद्धांवयोवृद्धांतथाव्याधिप्रपीडिताम्॥
॥हीनांगांगर्भिणींद्वेष्यांयोनिरोगसमन्वितां॥ नि.

रजस्वला, कामरहित, मलिन, नावडती, जातीनें व वयानें आपल्याहून श्रेष्ठ, रोगपीडित, व्यंग, गरोदर, द्वेष करणारी, आणि योनिरोग असलेल्या स्त्रीशीं संभोग करूं नये.

## ॥योग्यसंभोगाचें फल॥

॥स्मृतिमेधायुरारोग्यपुष्टींद्रिययशोबलैः॥
॥अधिकामंदजरसोभवंतिस्त्रीषुसंयताः॥ नि.

संभोग संबंधीं सांगितलेले नियमा प्रमाणें जे वर्तन करतील त्यांस स्मृति, बुद्धि, आयुष्य, आरोग्य, पुष्टि, शुक्र, यश, व बल यांची वृद्धि होते व वार्धक्य लौकर प्राप्त होत नाहीं.

## ॥ अयोग्यसंभोगाचा परिणाम॥

॥ भ्रमक्लमोरुदौर्बल्यबलधात्विंद्रियक्षयः॥
॥ अपर्वमरणंचस्यादन्यथागच्छतःस्त्रियं॥ नि.

संभोगसंबंधाचे योग्य नियम मोडून वर्तन करतील त्यांना भ्रम, ग्लानि, मांड्या गळणें, बल, धातु व इंद्रियें यांची क्षीणता व अकाली मरणही प्राप्त होतें.

## ॥ शयनसमयीं अवश्यक कर्मे ॥

॥ रात्रिसूक्तंजपन्स्मृत्वादेवांश्चसुखशायिनः॥
॥ नमस्कृत्वाव्ययंविष्णुंसमाधिस्थंस्वपेन्निशि॥ मार्क०

रात्रि सूक्त जप, सुखशायि देवांचें स्मरण, आणि श्री विष्णूस नमस्कार करून शयन करावें.

## ॥ शयनसमयीं पठणाचे श्लोक॥

॥ हनुमानंऽजनीसूनुर्वायुपुत्रोमहाबलः॥ रामेष्ट फाल्गुनसखा पिंगाक्षोमितविक्रमः॥

॥ उदधिः क्रमणश्चैवसीताशोक विनाशनः॥ लक्ष्मण प्राणदानाचदशग्रीवस्यदर्पहा ॥
॥ एवं द्वादश नामानि कपींद्रस्य महात्मनः ॥ स्वापकालेपठेन्नित्यं यात्राकालेविशेषतः॥
॥ तस्यरोगभयंनास्तिरणेचविजयीभवेत्॥ राजद्वारे महारण्ये भयंनास्ति कदाचन ॥
॥ जलेरक्षतु वाराहः स्थलेरक्षतु वामनः ॥ अटव्यांनारसिंहश्च सर्वतः पातुकेशवः ॥
॥ जलेरक्षतुनंदीशःस्थलेरक्षतुभैरवः॥ अटव्यांवीरभद्रश्च सर्वतः पातुशंकरः ॥
॥ अर्जुनःफाल्गुनोजिष्णुःकिरीटीश्वेतवाहनः॥ बीभत्सुर्विजयीकृष्णःसव्यसाचीधनंजयः॥
॥ तिस्त्रोभार्याः कफलस्यदाहिनी मोहिनीसती॥ तासांस्मरणमात्रेणचोरोगच्छतिनिष्फलः

कफल्लुकः कफल्लुकः कफल्लुकः

असें ह्मणून त्रिवार टाळी वाजवावी आणि नंतर खालीं लिहिलेले आस्तिकांचे स्मरण करावें.

॥ अगस्तिर्माधवश्चैव मुचुकुंदो महाबलः॥
॥ कपिलोमुनिरास्तीकः पंचैते सुखशायिनः॥
॥ नर्मदायैनमः प्रातर्नर्मदायै नमोनिशि ॥
॥ नमोऽस्तुनर्मदेतुभ्यंत्राहिमांविषसर्पतः॥

॥ सर्पापसर्प भद्रंते दूरंगच्छ महाविष ॥
॥ जनमेजयस्य यज्ञान्ते आस्तीक वचनंस्मर॥
॥ आस्तीकवचनंश्रुत्वायःसर्पोननिवर्तते॥
॥ शतधाभिद्यतेमूर्ध्निशिंशवृक्षफलंयथा॥
॥ एतान् गारुड मंत्रास्तु निशायां पठतेयदि॥
॥ मुच्यतेसर्वबाधाभ्यो नात्र कार्या विचारणा॥

येणें प्रमाणें पठण करून कांहीं वेळ विष्णु शिवादि इष्टदेवतेचें भक्तिपुरःसर नामोच्चारण (कीर्तन) करावें. आणि उषःकाळीं निजून उठल्यापासून रात्रौ निजेपर्यंत जें पुण्यपापात्मक कर्म केलें असेल तें सर्व ईश्वराला समर्पण करावें. याविषयीं:- कामतोऽकामतोवापि यत्करोमि शुभाशुभं॥ तत्सर्वंत्वयिसंन्यस्तंत्वत्प्रयुक्तः करोम्यहं॥ अर्थ- परमेश्वर प्रेरणेनें जें पुण्य किंवा पाप जाणून किंवा नजाणतां केलें तें संपूर्ण हे परमेश्वर, तुमचे ठायीं अर्पण करितों. अशी भावना करून सदर मंत्रानें पाणी सोडावें आणि श्री महाविष्णूस नमस्कार करून सुखानें निद्रा करावी.

॥ इतिनित्याचारसमाप्तः॥

## ॥ अथ ब्रम्हयज्ञ तर्पण आणि श्राद्धसंबंधीं सामान्य विचार लिख्यते

ब्रम्हयज्ञ तर्पण आणि श्राद्ध हे विषय फार मोठे व विस्ताराचे असून शाखापरत्वें ज्या त्या सूत्रास अनुसरून असल्यानें या संबंधीं सदरीं क्रमवारीनें न लिहितां समाप्ति लगत या ठिकाणीं सर्व शाखोपयोगी अशीं कांहीं अवश्यकर्तव्याकर्तव्य संबंधानें थोडीशी माहिती देण्याचें केलें आहे.

### ॥ ब्रम्हयज्ञ तर्पणावश्यकतावफल ॥

॥ यश्चश्रुतिजपः प्रोक्तो ब्रह्मयज्ञस्तु संस्मृतः ॥<br>
॥ सचार्वाक् तर्पणात्कार्यः पश्चाद्वा प्रातराहुतेः ॥ १ ॥<br>
॥ वैश्वदेवावसाने वा नान्यत्रेतिनिमित्तकात् ॥ छं. प.

॥ नास्तिक्यादवस्थितोयस्तु तर्पयेन्नपितृन्द्विजः ॥<br>
॥ पिबंति देहनिःस्त्रावं पितरस्तज्जलार्थिनः ॥ १ ॥<br>
॥ नास्तिक्ये नापियोविप्रस्तर्पयेपितृदेवताः ॥<br>
॥ सततृप्तिकृतो धर्मात्प्राप्नुयात्परमांगतिम् ॥ २ ॥ बृ. पा.

वेदादिपठण जो श्रुतिजप त्यासच ब्रह्मयज्ञ असें म्हटलें आहे. यापासून जपयज्ञादि कर्माची

सिद्धि होते. माध्यान्हकाळीं, माध्यान्ह संध्या करून नंतर ब्रह्मयज्ञ तर्पण करावें. अथवा प्रातःकाळीं आहुति दिल्यानंतर किंवा वैश्वदेवाच्या शेवटीं करावें. जो ब्राम्हण नास्तिकपणानें तर्पण करणार नाहीं त्याचे पित्तर जळाभावीं त्याच्या देहांतील रक्तपान करितात. आणि जो नास्तिकपणानें जरी नित्यशः तर्पण करील, तरी त्याच्या त्या नित्यतर्पणाच्या योगानें देव, ऋषि, मनुष्य, आणि पितर यांची तृप्ति होऊन त्या तृप्तिकृत धर्मापासून त्यास उत्तम गति प्राप्त होईल. या साठीं ज्या त्या शाखेंतील प्रयोगा प्रमाणें ब्रम्हयज्ञतर्पण नित्यशः आणि अवश्य करीत जावें.

## ॥ तर्पणाच्या पितरदेवता,क्रमव प्रकार ॥

तातास्बात्रितयंसपत्नजननी मातामहादि त्रयं ।
सस्त्रिस्त्री तनयादितातजननी स्वभ्रातरःसस्त्रियः ॥
तातांबात्मभगिन्यपत्य धवयुक्जायापितासद्गुरुः ।
शिष्याप्ताः पितरोमहालयविधौतिर्थेतथातर्पणे ॥१॥ स्मृ. सं.

बाप, आजा, पणजा, आई, आजी, पणजी, सापत्नआई, आईचा बाप, आजा, पणजा, हे आपल्या स्त्रियांसहित, आपली बायको, पुत्र, कन्या, चुलता, मामा, बंधु हे आपल्या स्त्रियांसहित, आत,

मावशी, बहीण, ह्या आपले नवरे आणि मुलें या सहित, सासरा, मोक्षगुरू, हित करणारे शिष्य, याप्रमाणें महालय, तीर्थश्राद्ध, आणि तर्पण यांचे ठिकाणीं पितर, देवता, व क्रम समजावा.

॥ संबंधमनुकीर्त्यैव नामगोत्रमनंतरम् ॥

॥ वस्वादिरूपंसंकीर्त्यस्वधाकारेणतर्पयेत् ॥

॥ एकैकमंजलिंदेवा द्वौद्वौतु सनकादयः ॥

॥ अर्हंतिपितरस्त्रींस्त्रीं स्त्रियएकैकमंजलिं ॥

॥ मातृमुख्यास्तुयास्तिस्त्रस्तासांस्त्रींस्त्रीन्जलांजलीन् ॥

॥ सपत्नाचार्यपत्नीनां द्वौद्वौदद्याज्जलांजलीन् ॥

तर्पणाचे ठायीं प्रथम नात्याचा उच्चार करावा; नंतर नाम व गोत्र यांचा उच्चार करावा. नंतर वसु, रुद्र आदित्य अशा क्रमानें पिता, पितामह, प्रपितामह, इत्यादिकांचा उच्चार करावा. नंतर स्वधा शब्द ह्मणून तर्पण करावें. देवाला एक, सनकादिकांस दोन, पितरांस तीन, स्त्रियांस एक, मातुश्री प्रमुखनीन स्त्रिया यांस तीन, सापत्न मातोश्रीस दोन. याप्रमाणें अंजलि द्यावेत.

## ॥ अशक्तसमयींसंक्षिप्तब्रम्हयज्ञतर्पण ॥

॥ ब्रम्हयज्ञप्रसिध्यर्थं गायत्र्येकांजपेत्ततः ॥
॥ तेनप्रीतिंपरांयांतिदेवदेवोजनार्दनम् ॥ प्रा.म.

ब्रम्हयज्ञसिध्यर्थ भक्ति युक्त गायत्रीमंत्र अशक्त समयीं ह्मणावा. ह्मणजे तेणें करूनच प्रभुजनार्दनाच्या प्रीतीस पात्र होईल. तसेंच तर्पण संबंधानेंही अशक्त समयीं

॥ आब्रह्मस्तंबपर्यंतंदेवर्षिपितृमानवाः ॥
॥ तृप्यंतुपितरःसर्वेमातृमातामहादयः ॥
॥ अतीतकुलकोटीनांसप्तद्वीपनिवासिनां ॥
॥ आब्रम्हभुवनाल्लोकादिदमस्तुतिलोदकम् ॥ ध.सिं.

हे मंत्र ह्मणून तीन तीन अंजलि द्यावेत.

## ॥ तर्पणाभावी दोष ॥

॥ देवताश्चमुनींश्चैवपितॄन्योह्निनतर्पयेत्॥
॥ देवादीनामृणीभूत्वानरकंप्रतिपद्यते ॥ आ.म.

जो नित्यशः देव ऋषि, आणि पितृतर्पण करणार नाहीं, तो यांचा ऋणि राहून अंतीं नरकाप्रत जाईल.

## ॥ श्राद्धविचार ॥

## ॥ श्राद्धशब्दाविषयीं ॥

॥ मृतान्पितॄंश्चनिर्दिश्यद्विजोभ्योभोजनादियत् ॥

॥ श्रद्धयादीयते यत्र तच्छ्राद्धं परिकीर्तितम् ॥

मृत झालेले जे आपले पितर, त्यांच्या उद्देशानें श्राद्धास विहीत जो काल, त्याचे ठायीं ब्राह्मणास श्रद्धापूर्वक भोजन, अमान्न किंवा द्रव्य देणें यास श्राद्ध असें ह्मणतात.

श्राद्धामध्यें नित्य ह्मणजे न केलें असतां प्रत्यय आहे अशीं ९६ श्राद्धें आहेत तीं येणें प्रमाणें:- दर्शश्राद्धें १२, युगादि ४, मन्वादि १४, संक्रांतीसंबंधीं १२, व्यतीपात १२, भाद्रपद कृष्णांतील महालय १५, अष्टका ५, अन्वष्टका ५ वैधृति १२ आणि पूर्वेद्यु श्राद्धे ५ एकुण ९६ श्राद्धें असून शिवाय नित्य, नैमित्तिक, वृद्धिश्राद्ध, पार्वणश्राद्ध इत्यादि भेदानें अनेक आहेत. आणि या संबंधीं विचार पाहणें तो कालतत्वविवेचन, निर्णयसिंधु, धर्मसिंधु, इत्यादि ग्रंथांत पाहवा. या ठिकाणीं सांवत्स-

रीक आणि महालय यांसंबंधानेंच थोडा अवश्य विचार घेतला आहे.

॥ सांवत्सरिकश्राद्धाविषयीं ॥

॥ प्रतिसंवत्सरं कार्यं मातापित्रोर्मृतेऽहनि ॥
॥ पितृव्यस्याप्यपुत्रस्य भ्रातृज्येष्ठस्यचैवहि ॥
॥ सर्वेषामपि श्राद्धानां श्रेष्ठं सांवत्सरंमतम् ॥
॥ भोजकोयस्तुवै श्राद्धं नकरोतिखगाधिप ॥
॥ मातापितृभ्यां सततं वर्षे वर्षे मृतेऽहनि ॥
॥ सयाति नरकं घोरं तामिस्रं नामनामतः ॥
॥ मृताहंच सपिंडंच गयाश्राद्धं महालयं ॥
॥ आपन्नोऽपि नकुर्वीत श्राद्धमामेनबर्हिर्वित् ॥ नि. सिं.

मातापितरांचे मृतदिवसाचे ठायीं जे प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करावयाचें तें सर्व श्राद्धांत श्रेष्ठ श्राद्ध आहे. अपुत्र चुलत्याचेंही श्राद्ध केलें पाहिजे. तसेंच अपुत्र ज्येष्ठबंधूचेंही केलें पाहिजे. जो पुत्र मातापितराकारणें वर्षावर्षाचे ठिकाणीं श्राद्ध करीत नाहीं तो स्वतः आणि आपले आईबाप यांसह तामिस्र

नांवाच्या नरकांत पडतो. आपदा असतांही सांवत्सरिक श्राद्ध, गयाश्राद्ध, आणि महालय आमान्नादिकें करून नकरतां अन्नें करूनच करावींत.

## ॥ महालयश्राद्धविषयीं ॥

॥ मध्येवायदिवाप्यंते यत्रकन्यांव्रजेत्‌रविः ॥
॥ सपक्षः सकलश्रेष्ठः श्राद्ध षोडशकं प्रति ॥
॥ यो वैश्राद्धं नरः कुर्यात् एकस्मिन्नपि वासरे ॥
॥ तस्यसंवत्सरं यावत् संतृप्ताः पितरो ध्रुवं ॥
॥ वृश्चिके समतिक्रांते पितरो दैवतैःसह ॥
॥ निश्वस्य प्रतिगच्छंति शापंदत्वासुदारुणं ॥ वृ. मनु.

भाद्रपद कृष्णांत कन्याराशीला सूर्य कधींही येवो, षोडशमहालय करण्यास कृष्णपक्ष संपूर्ण श्रेष्ठ आहे. अनुकूल असल्यास सोळा महालय अवश्य करावे. निदान एकदिवस तरी केलाच पाहिजे. वतो पित्याची जी मृततिथी असेल त्यातिथीस करावा. त्या तिथीस निषेधतिथीचा आणि वारांचा दोष नाहीं. सदरप्रमाणें मृततिथीच्या दिवशी प्रसंगोपात महालय न झाल्यास पुढें वृश्चिक संक्रांती पर्यंत "आमा

पाते भरण्यांच द्वादश्यां पक्षमध्यके". आमावास्या, व्यतीपात, भरणीनक्षत्र, द्वादशी, आणि आष्टमी या पर्वांवर करावा वृश्चिक संक्रांती पूर्ण होई पर्यंत पितर, देवते सहवर्तमान महालयाची वाट पाहून, पुत्रादिकोनें ते न केले असतां निराश होऊन आपले वंशांत कोणी नाहीं ह्मणजे असून नसून त्या सारखे समजून श्वासोश्वास टाकीत भयंकर अकल्याणदायक शाप देऊन स्वस्थानीं जातात. या साठीं निदान एकवेळ तरी महालय अवश्य करावा.

## ॥ श्राद्धास उक्त ब्राम्हण ॥

॥ वेदाध्ययनसंपन्नाः शांताः शास्त्रविशारदाः ॥
॥ स्वधर्मनिरताः शुद्धाः सुशीलाः सत्यभाषिणः ॥
॥ कुष्टादिरोगरहिताः शिवविष्णुपरायणाः ॥
॥ युवानश्च सपत्निकाः द्विजाः श्राद्धेषु पूजिताः ॥
॥ असमान प्रवरको ह्यसगोत्रस्तथैवच ॥
॥ असंबंधीचविज्ञेया ब्राह्मणाः श्राद्धसिद्धये ॥
॥ अभावे ह्यन्यगोत्राणामेकगोत्रास्तु भोजयेत् ॥

॥ षड्भ्यस्तु पुरुषेभ्योर्वाक् श्राद्धा होनैवगोत्रिणः ॥

॥ गायत्रीसारमात्रोपि वरंविप्रः सुयंत्रितः ॥

॥ नायंत्रितश्चतुर्वेदी सर्वाशी सर्वविक्रयी ॥

॥ निमंत्रयीत पूर्वेद्युः स्वशाखीयान् द्विजोत्तमान् ॥

॥ स्वशाखीयद्विजाभावेद्विजानन्यान्निमंत्रयेत् ॥

॥ विनामाषैश्चमधुनाविनादक्षिणयाशिषा ॥

॥ परिपूर्णं भवेच्छ्राद्धं यतिषु श्राद्धभोजिषु ॥

॥ आमंत्रितस्तु योविप्रो भोक्तुमन्यत्र गच्छति ॥

॥ नरकाणां शतंगत्वा चांडालेष्वभिजायते ॥

॥ आमंत्रितस्तु यः श्राद्धे विलंबं कुरुते द्विजः ॥

॥ देवद्रोही पितृद्रोही पच्यते नरकेषु सः ॥

वैदिक ( वेदाध्ययन केलेला ) तसें व्याकरण धर्मशास्त्र, मिमांसाशास्त्र, इत्यादि शास्त्रांतील एक अथवा अनेक शास्त्रांचें ज्यानें अध्ययन केलें आहे, असें शांत आपल्यास योग्य जो ब्रा

ह्मणाचा आचार त्यास अनुसरून वागणारे, शुचिर्भूत, ज्यांचा स्वभाव चांगला आहे असे, तसेंच स्वरभाषण करणारे, कुष्ट, अपस्मार, (फेंफरें), आदि रोगांनें रहित, शिव अथवा विष्णु यांचे भक्त, तरुण, सपत्निक, असे ब्राह्मण श्राद्ध भोजनास योग्य जाणावे.

श्राद्धास ब्राह्मण भिन्न गोत्री, भिन्न प्रवरी, तसेंच ज्याचा आपल्याशीं कांहीं संबंध नाहीं असा असावा. भिन्न गोत्राचा जर मिळत नसेल तर एक गोत्राचाही सांगावा. परंतु तो सहा पुरुषांच्याआंतील नसावा.

इंद्रियदमन केलेला, केवळ गायत्री मंत्रोपदेश झालेला अविद्वान ब्राह्मणही श्रेष्ठ, परंतु चतुर्वेद पाठक ब्राम्हण सर्व निषिद्ध पदार्थ भक्षण करणारा, तसेंच तेलादि सर्व पदार्थ विक्रय करणारा असा जर असेल तर तो उपयोगी नाहीं.

आपल्या शाखेचे ब्राह्मणास श्राद्धाच्या पूर्व दिवशीं निमंत्रण करावें. आपल्या शाखेचे ब्राह्मण जर न मिळतील तर अन्य शाखेचे सांगावे.

श्राद्धास जर सन्याशी मिळेल तर फार उत्तम, कारण त्या श्राद्धामध्यें उडीदाचें अन्न, मध, दक्षिणा, आशिर्वाद हे जरी नसतील, तरी केवळ यति भोजनानें तें श्राद्ध परिपूर्ण होतें, अशी श्रा-

ह्यास पतिप्रशंसा सांगितली आहे. जो ब्राह्मण प्रथमतः आमंत्रण घेऊन त्या स्थळीं न जातां दुस-
रीकडे भोजनास जातो, तो शतावधि नरकांमध्यें पडून अंतीं चांडालयोनीमध्यें उत्पन्न होईल. जो ब्रा-
ह्मण श्राद्धाचें आमंत्रण घेऊन भोजनास येण्यास विलंब करितो, तो देव आणि पितर यांचा द्रोही
होऊन नरकास जातो.

## ॥ श्राद्धासमध्यमब्राम्हण ॥

॥ मातामहोमातुलोवाजामाताभगिनीसुतः॥
॥ श्वशुरोशालकःशिष्योपितृष्वसृसुत स्तथा॥
॥ गुरुर्मातुलपुत्रश्चमातृष्वसृसुतोऽतिथिः॥
॥ दौहित्रोमध्यमाह्येते श्राद्धे प्रोक्ताद्विजातयः॥ स्मृ.सं.

मातामह ( आईबाप ), मामा, जावई, बहिणीचा मुलगा( भाचा ), सासरा, शालक ( बाय-
कोचा भाऊ ) शिष्य, आते भाऊ, गुरू, मामेभाऊ, मावसभाऊ, अतिथि, मुलीचा मुलगा, हे ब्रा-
ह्मण श्राद्धास मध्यम सांगितले आहेत.

## ॥ श्राद्धास वर्ज्य ब्राम्हण ॥

॥ काणाः कुब्जाश्च षंढश्च कृतघ्नागुरुतल्पगाः ॥
॥ राजभृत्यांधबधिरमूकखल्वाटपंगवः ॥
॥ गलरोगीच गंडुमान् स्फुटितांगश्च सज्वरः ॥
॥ ईदृशा ब्राह्मणाज्ञेया अपांक्ते याह्य पत्निकाः ॥
॥ रजस्वलापतिर्वर्ज्यस्तथैव गर्भिणीपतिः ॥
॥ ये सदाचाररहिता निंद्यायेनिर्दयाद्विजाः ॥
॥ वर्ज्यनीयाः पूर्वमेव तेपि योज्यानिमंत्रिताः ॥
॥ ब्राह्मणान्नपरीक्षेत तीर्थेक्षेत्रनिवासिनः ॥
॥ पूजितेषुचसंतुष्टाः पितृभिः सहदेवताः ॥

काणा, कुबडा, षंढ, केलेला उपकार न जाणणारा, आंधळा, बहिरा, मुका, टक्कल पडलेला, पांगळा, गळरोग झालेला, ज्यास वारुळ झाला आहे असा, ज्याचें अंग फुटलें आहे असा, ज्वरित, अपत्निक (विधुर) हे ब्राह्मण श्राद्धास वर्ज्य करावे. तसेंच ज्याची स्त्री रजस्वला किंवा गर्भिणी आहे तो,

सदाचार रहित, निंद्यकर्म करणारा, निर्दय असा ब्राह्मण श्राद्धास वर्ज्य होय. हा सर्व विचार आमंत्रण सांगण्यापूर्वीच करावा, आमंत्रण सांगितल्यानंतर त्यास श्राद्धीं बसवावें. ही ब्राम्हणाची परीक्षा तीर्थाचे ठिकाणीं करावयास नको. कारण क्षेत्रसंबंधीं निर्गुण ब्राम्हणाची ही पूजा केली असतां सर्व देव आणि पितर संतुष्ट होतात.

॥ श्राद्धब्राम्हणसंख्येविषयीं ॥

॥ शुचीनिमंत्र्य द्वौ दैवे त्रीन्विप्रान्पितृकर्मणि ॥
॥ प्राङ्मुखौ दैविकौ विप्रौ पितरस्त्रिरुदङ्मुखाः ॥
॥ एकैको वापि विप्रः स्यादसंपत्ताविति क्रमः ॥

सत्पात्र दोन ब्राम्हण देवस्थानीं आणि तीन ब्राम्हण पितृस्थानीं सांगावें. देवस्थानचे दोन ब्राम्हण पूर्वेकडेस तोंड करून बसवावें व पितृस्थानचे ब्राह्मण उत्तराभिमुख बसवावे. गरीबी असेल तर एक ब्राम्हण देवस्थानीं व एक पितृस्थानीं बसवावा.

॥ श्राद्धास सुवासिनीविषयीं ॥

॥ पतिमत्यक्षयाहादौ ब्राम्हणान्भोजयेततः ॥

॥ स्त्रीश्चसंभाजयेत्तासामाराधनममंत्रकम् ॥
॥ क्षयाहं वर्जयित्वैकं स्त्रीणां नास्ति पृथक्क्रिया ॥
॥ अन्वष्टकासु वृद्धौच गयायांच क्षयेऽहनि ॥
॥ अत्रमातुः पृथक्श्राद्ध मन्यत्र पतिनासह ॥ स्मृ. सं.

जी स्त्री सुवासिनी अवस्थेंत मरण पावली असेल तिच्या श्राद्धाचे दिवशीं ब्राम्हण व सुवासिन सांगावी. ब्राम्हणाचें आराधन मंत्रयुक्त करावें व सुवासिनीचें आराधन मंत्ररहित करावें. मृतदिवसा वांचून स्त्रियांचें वेगळें श्राद्ध नाहीं. अष्टका श्राद्ध, वृद्धिश्राद्ध, गयाश्राद्ध आणि सांवत्सरीकश्राद्ध हीं श्राद्धें मातोश्रीचीं वेगळीं करावीं. याहून अन्यश्राद्ध पतिसह करावे.

## ॥ गयाश्राद्धाचें महाफल ॥

॥ शमीपत्रप्रमाणेनपिंडंदद्यात् गयाशिरे ॥
॥ उद्धरेत् सप्त गोत्राणि कुलमेकोत्तरं शतम् ॥
॥ पिता माताच भार्याच भगिनी दुहिता तथा ॥
॥ पितृमातृष्वसाचैव सप्त गोत्राणि वै विदुः ॥

॥ तत्वानिविंशतिनृपा द्वादशैकादशादश ॥

॥ अष्टाविंतिच गोत्राणांकुलमेकोत्तरंशतम्॥ स्मृ. सं.

गयाशिरांवर शमीपत्र प्रमाण पिंड दिला असतां त्याच्या योगानें सात गोत्रें व त्यांतील एकशेंएक कुलें यांचा उद्धार होतो. तीं सात गोत्रें अशीं:- पितृगोत्र, आईचें गोत्र, सासऱ्याचें गोत्र, बहिणीचें गोत्र, मुलीचें गोत्र, आतेचें गोत्र, आणि मावशीचें गोत्र. पितृगोत्रांतील पित्याच्यापूर्वींचे बारा, आणि पित्या पुढील बारा, मातृकुलांतील वीस, सासऱ्याच्या कुलांतील सोळा, बहिणीचे बारा मुलीचे अकरा, आतेचे दहा आणि मावशीच्या कुलांतील आठ. याप्रमाणें १०१ पुरुष जाणावें.

## ॥ श्राद्धोपयोगीपदार्थाविषयीं ॥

॥ यद्दिष्टंजीवतस्यासीत्तद्द्यात्तस्ययत्नतः॥

॥ अन्नंतुसदधिक्षीरं गोघृतंशर्करान्वितम्॥

॥ मासं प्रीणाति सर्वान्वैपितॄनित्याहकेशवः॥

॥ हविष्यान्नेनवैमासंपायसेनतुवत्सरम्॥ हे.

ज्याचें श्राद्ध करावयाचें त्यास जिवंतपणीं जे जे पदार्थ प्रिय असतील ते ते पदार्थ निषिद्ध जर

नसतील तर ब्राम्हणांस अर्पण करावें. दही, दूध, गायीचें तूप, साखर, यांनीं युक्त अन्न ब्राम्हणांस अर्पण केलें असतां पितरांची एक महिनाभर तृप्ति होते आणि क्षीर अर्पण केली असतां पितरांची तृप्ति एकवर्षभरपर्यंत होते.

॥ श्राद्धालायोग्यायोग्यपुष्पें ॥

॥ अगस्त्यंभृंगराजंचतुलसींकमलंतथा ॥
॥ चंपकंतिलपुष्पंच दूर्वाश्चपितृवल्लभाः ॥
॥ जलोद्भवैश्चकुसुमैर्मल्लिकाच्यूतपुष्पकैः ॥
॥ अतिमुक्तैश्चतगरैः संपूज्याः पितरः सदा ॥

हदग्याचीं फुलें, माका, तुळस, कमळ, चाफा, तिळाचीं फुलें, दुर्वा या पितरांसप्रिय आहेत. जलांत उत्पन्न झालेलीं पुष्पें, मोगरी, आंब्याचा मोहोर, मधुमाधवीचीं पुष्पें, आणि तगरीचीं फुलें यांनीं सर्वकाल पितरांची पूजा करावी.

॥ श्राद्धासउक्तपात्रें ॥

॥ अब्देतुमोहपत्राणिं तदर्धंकदलीदले ॥

॥ पलाशस्तु त्रयोमासान्नन्यपात्रंनिरर्थकम्॥ स्मृ. स.

श्राद्ध भोजनास मोहाच्या पात्रापासून पितरांची एक वर्ष तृप्ति आहे. केळीचे पानापासून सहा महिने, पळसाच्या पानापासून तीन महिने तृप्ति होते. इतर पात्रें निरर्थक होत.

## ॥ श्राद्धदिवशीं नियम ॥

॥ निमंत्रणंतुविप्राणांपूर्वेद्युःसद्यएववा ॥
॥ कुर्याद्विप्रांश्चनियमांच्छ्रावयेत्पैतृकान्बुधः॥
॥ अक्रोधनैः शौचपरैः सततंब्रह्मचारिभिः ॥
॥ भवितव्यं भवद्भिश्चमयाचश्राद्धकारिणे ॥ ध. सिं.

ब्राह्मणास श्राद्धाचें निमंत्रण करणें तें पूर्व दिवशीं अथवा श्राद्धदिवशीं करावें. श्राद्ध दिवशीं आपण नियम करावें, ते नियम ब्राम्हणाकडून श्रवण करवावे ते असेः- "क्रोधरहित, शुचिर्भूत व निरंतर ब्रम्हचारी असा मीं श्राद्ध कर्ता व तुह्मी असावें." (हे नियम ब्राम्हण निमंत्रित केल्यावेळपासून श्राद्धान्न पचेपर्यंत श्राद्ध कर्ता आणि ब्राह्मण यांनीं पाळावेत.)

## ॥ मातामह श्राद्धविषयीं ॥

॥ जातमात्रोपि दौहित्रो जीवत्यपि च मातुले ॥
॥ कुर्यान्मातामह श्राद्धं प्रतिपद्याश्विनेसिते ॥ स्मृ.सं.

आश्विन शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं आईच्या बापाच्या उद्देशानें, नातु लहान असला तरी मामा जिवंत असतांही मातामह श्राद्ध करावें.

## ॥ विभक्ताविभक्तश्राद्धनि० ॥

॥ विभक्तास्तु पृथ कुर्युः प्रतिसांवत्सरादिकं ॥
॥ एकेनैवा विभक्तेषु कृते सर्वैस्तु तत्कृतम् ॥ स्मृ.स.

बंधु विभक्त असतील तर संवत्सरादि श्राद्धें प्रत्येकानें वेगळालीं करावीं, परंतु सर्वत्र एकत्र असतील तर वडिल बंधूनेंच श्राद्ध कर्म करावें.

## ॥ श्राद्धाचें शेषान्न भक्षणाविषयीं ॥

॥ श्राद्धावशिष्ट भोक्तारस्तेवैनिरयगामिनः ॥
॥ सगोत्राणां सकुल्यानां ज्ञातीनां न च दोषकृत् ॥

॥ विप्रस्त्वन्यगृहे श्राद्धशिष्टान्नभोजनंचरेत् ॥
॥ प्राजापत्यंविशुद्धिःस्यात् ज्ञातिगोत्रेणदोषकृत् ॥
॥ श्वशुरस्यगुरोर्वापि मातुलस्यमहात्मनः ॥
॥ ज्येष्टभ्रातुश्चपुत्रस्य ब्रम्हनिष्टस्ययोगिनः ॥
॥ एतेषांश्राद्धशिष्टान्नंभुक्त्वा दोषेनविद्यते ॥
॥ नशूद्रंभोजयेत्तस्मिन् गृहे यत्नेन तद्दिने ॥
॥ श्राद्धशेषंनशूद्रेभ्यः प्रदद्या दखिलेष्वपि ॥ स्मृ. सं.

श्राद्धाचें शेषान्न भक्षण केल्यास नरकाची प्राप्ति होते. परंतु हा निषेध सगोत्र, सपिंड, यांतील मनुष्यास नाहीं. दुसऱ्याचे घरीं श्राद्धावशेषान्न ब्राम्हणानें भक्षण केलें तर त्याला प्राजापत्य प्रायश्चित्त घेतल्यावांचून शुद्धता नाहीं. परंतु सासरा, गुरु, मामा, वडिलबंधु, मुलगा, (हे येथें दत्तक झालेले-घ्यावे. कारण वरील स्मृतींत सपिंड सगोत्र शुद्ध आहे) ब्रह्मनिष्ट, योगी पुरूष यांच्या श्राद्धावशेषान्नाचें भक्षण केलें असतां दोष नाहीं. श्राद्धाचे दिवशीं शूद्रास घरीं भोजन घालूं नये. आणि श्राद्धावशेषान्नही शूद्रास देऊं नये.

## ॥ श्राद्धाचें फल ॥

॥ सर्वेषामेव दानानां श्राद्धदानं विशिष्यते ॥
॥ मेरुतुल्यं महापापं श्राद्धदानं व्यपोहति ॥
॥ श्राद्धात् परतमं नान्यत् श्रेयस्करमुदाहृतं ॥
॥ तस्मात् सर्वप्रयत्नेन श्राद्धं कुर्याद्विचक्षणः ॥
॥ आयुः पुत्रान् यशः स्वर्गं कीर्तिं पुष्टिं श्रियं बलं ॥
॥ पशुंसुखं धनं धान्यं प्राप्नुयात् पितृपूजनात् ॥ स्मृ. सं.

सर्व दानामध्यें श्राद्धदान विशेष आहे. मेरुसमान महापापी जरी असला तरी श्राद्धदानानें त्या पातकापासून मुक्त होतो. कल्याण होण्यास श्राद्धाच्या बरोबरीचें दुसरें साधन नाहीं. ह्मणून सर्व प्रयत्नानें सूज्ञजनांनीं श्राद्ध करीत जावें. श्राद्धापासून आयुष्य, कीर्ति, सुख, धन, धान्य, पुत्र, पौत्र, आणि अंतीं स्वर्ग यांची प्राप्ति होते.

॥ इति श्राद्धविचार समाप्तः ॥

## ॥ अपनित्याचाराचें शुद्धिपत्र ॥

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ३ | उक्तीनें | उक्तीचें | ५ | ६ | इत्थ | इत्थं |
| १ | १७ | स्मरञ्च | स्मरेञ्च | " | ७ | भगत्प्रसादान् | भगवत्प्रसादात् |
| २ | ७ | यत्वया | यत्त्वया | " | ९ | बाध्यते स्मरणाप्रा | बाधते. स्मरणात्प्रा |
| ३ | १ | अस्तिहेको | अस्ति ह्येको | " | १० | बाध्यते | बाधते |
| ३ | १९ | स्तोत्राणी | स्तोत्राणि | " | १४ | बाध्यते | बाधते |
| ४ | २ | जगद्यानिं | जगद्योनिं | ७ | १४ | पाणिमहेश्वरः | पाणिर्महेश्वरः |
| ४ | १३ | देमोपे- | दमोपे- | " | १५ | बाधानबाध्यते | बाधानच बाधते |
| ४ | १७ | सर्वरूपस्य | सर्वरूपस्यं | " | १६ | बाध्यते | बाधते |
| " | २० | प्रणांशानं. संभवे | प्रणाशानं. सम्भवे. | " | १७ | बाध्यते | बाधते |
| ५ | ३ | चलाभ्र्वं | चलाभ्र्व | " | १८ | बाध्यते | बाधते |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ५ | १३ | व्याख्यातं कीर्तये | व्याख्यान कीर्तय | १३ | १४ | योश्शशि | योःशशि |
| " | २० | स्मेरनित्यं | स्मेरन्नित्यं | १४ | ९ | हेतु | हेतुं |
| ६ | २२ | आज्ञानो | अज्ञानो | १४ | १६ | भूषाम | भूषाम् |
| ७ | ११ | त्रितियंचरेत गंगेच | त्रितयंचरेत् गंगाच | " | १८ | दक्षाम | दक्षाम् |
| " | १२ | देह | देव | | | | |
| ८ | १४ | शौच्य | शौच | " | २४ | खड्वांग | खड्वांग |
| १० | १६ | उदंबरे | उदुंबरे | " | २५ | प्रातर्ननामि | प्रातर्नमामि |
| " | १८ | आपामार्गे | अपामार्गे | १५ | २ | ससार | संसार |
| १२ | ५ | पूर्वीत्तरेपु | पूर्वोत्तरेषु | " | १० | योगिन्द्रमानसमधुक्त | योगींद्रमानसम धुव्रत |
| " | १३ | त्वन्नोदेंहि | त्वन्नोदेहि | " | १३ | नीलाम | नीलाम् |
| १३ | २ | यस्मरे | यःस्मरे | १६ | २२ | सौरव्यं | त्सौरव्यं |
| " | १२ | रुद्र मध्यें | रुद्रः मध्ये | १७ | २२ | रुटो | रूटो |
| " | १२ | पर्वतः | पर्वताः | " | २६ | कृच्छ्रसाध्य | कष्टसाध्य |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १८ | २० | नुत्नय | नुत्नये | २४ | १३ | भागीरथी | भागीरथि |
| १९ | ३ | मांत्र | मात्रं | २५ | ८ | स्नान | स्नानं |
| " | ५ | शान्नं | शन्न | " | १२ | भोरस्कं | भोरस्कं |
| " | २५ | धर्मैसह | धर्मैःसह | " | १६ | केयुर | केयूर |
| २० | ५ | ध्धृथा | ध्धृता | " | १८ | सच्छन्नं | संछन्नं |
| " | ६ | करोनराः | करानराः | " | २० | गंगानिपतंती | गंगांनिपतंतीं |
| " | ८ | निप्पापो | निष्पापो | " | २२/२४ | देह अंतंर्बहि | द्देह अंतर्बहि |
| " | १९ | दिणानृणां | दिंनानृणा | २६ | ६ | ज्ञानंह्रदे | ज्ञानन्ह्रदे |
| " | २१ | परंस्य | परस्य | २७ | २ | स्च्चवणे | स्त्रवणे |
| २२ | १७ | नधार्यं | न्नधार्यं | " | २० | तृण पर्णा | तृणपर्णो |
| " | १८ | सीतास्ता | शीतास्ता | २८ | १९ | मलिनं | मलिन |
| २३ | २२ | स्मरेण | स्मरण | २९ | १० | व्यार्घचर्मणि | व्याघ्रचर्मणि |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २९ | १५ | दरिद्रस्यात् | दरिद्रःस्यान् | ३८ | १२ | सूर्योदयः | सूर्यारयः |
| ,, | २२ | धृतः | धृत | ३९ + | १० | आरंभ्या | आराध्या |
| ३२ | ९ | चतुर्दशास्याः | चतुर्दशास्यः | ,, | १२ | ज्जपेतं | ज्जपेत्तं |
| ,, | २२ | यावनिंद्रा | यावन्निंद्रा | ४२ | २३ | पार्वति | पार्वती |
| ३५ | ३ | ग्रंथि | ग्रंथिं | ४३ | २५ | मुक्तमं | मुत्तमं |
| ,, | १२ | चत्वारं | चत्वरं | ४५ | १५/१६ | शनै पितृणां | शनैः पितृणां |
| ,, | १६ | रेतस्स्वल | रेतस्स्वलन | ,, | १७/१९ | पूथिका स्तवक | यूथिका स्तबका |
| ,, | २० | सहृतां | संहृतां | ४६ | १५ | नीर्चय | नीर्चये |
| ३७ | ७ | वापिकायाच | वापिकायांच | ,, | २१ | तदूर्व | नदूर्व |
| ,, | ८ | जलगृण्हन् | जलंगृण्हन् | ४८ | ९ | सोपऽराधि | सोऽपराधि |
| ,, | २२ | लोक्यातवामभागेक्षितो | लोक्येनवामभागेक्षितो | ,, | ११ | पत्र छेद्यंचनरकं | पत्रं छेद्यचेन्नरकं |
| ३८ | ८ | व्यात्यति | व्याहृति | ४९ | ८/२६ | श्मश्रुष्मान काषुसा | श्मश्रुष्मान् काषसा- |

+(११ ओळीनंतरराहिलेलीस्मृति) ॥ यज्ञोपवीत हस्तेन गायत्रीजप्यते यदि ॥ तज्जाप्यं निष्फलंतस्य सविप्रोब्रम्हघातकः॥

बांधावा. त्याचा मंत्रः- ॥ संसारसागरगुहासुसुखंविहर्तुं । वांछंतिये कुरुकुलोद्भवशुद्धसत्वाः ॥ संपूज्यचत्रिभुवनेशमनंतदेवं । बध्नंतिदक्षिणकरेवरदोरकंते ॥१॥ नंतर जीर्ण अनंताची पंचोपचार पूजा करून विसर्जन करावें त्याचा मंत्रः- ॥ नमःसर्वहितार्थाय जगदानंदकारक ॥ जीर्णदोरममुंदेवविसृजेहंत्वदाज्ञया ॥१॥ नंतर ब्राह्मणाची पूजा करून तो जीर्ण अनंत ब्राह्मणास दान करावा त्याचा मंत्रः- ॥ अनंतःप्रतिगृण्हाति अनंतोवैददातिच ॥ अनंतस्तारकोभाभ्यां अनंतायनमोनमः ॥१॥ इदंजीर्ण दोरक दानं सदक्षिणाकं सतांबूलं अमुकश॰ प्रति॰ ॥ नंतर ब्राम्हणास चौदा अपूप ( अनारसे धारगे व॰ वायन द्यावें त्याचा मंत्रः- ॥ पक्वान्नफलसंयुक्तं सधान्यं घृतसंयुतम् ॥ गृहाणेदंद्विजश्रेष्ठ वायनं दक्षिणायुतम् ॥ इदं चतुर्दश संख्याक अपूप वायन दानं सोपस्करं अमुक श॰ प्रति॰ ॥ प्रतिगृण्हामि (ब्राम्हणानें ह्मणावें) कृतस्य कर्मणःसांगता सिध्यर्थं यथाशक्ति ब्राह्मणान् दंपतीचभोजयिष्ये ॥ नंतर विसर्जन करावें तें असें ॥ यांतुदेवगणाःसर्वे पूजामादाय पार्थिव ॥ इष्टकामप्रसिध्यर्थं पुनरागमनायच ॥ असें ह्मणून त्या पीठ्देवतावर अक्षत टाकावी. यस्य॰ ॥

# ॥ देवीनवरात्रविधिः ॥

आश्विन शुक्ल प्रतिपदेपासून नवमी पर्यंत देवीपूजन, उपवास, नक्तभोजन, धरणेंपारणें, अखंड तेलाचा किंवा तुपाचा दीपलावणें, पुष्पमालाबंधन, कुमारी पूजन, सप्तशतिपाठ, घटस्थापना, सुवासिनी, कुमारिका व ब्राह्मण भोजन इ॰ जसा ज्याचे येथें कुळाचार असेल त्या प्रमाणें विधि होत असतो. सबब या बद्दल अवश्य असे संकल्प या खालीं दिले आहेत.

मम आत्मनः श्रुतिस्मृति पुराणोक्त फलप्राप्त्यर्थं ॥ ममसकुटुंबस्यसपरिवारस्य क्षेमस्थैर्य आयुरारोग्यदीर्घायुर्विपुल धनधान्य पुत्रपौत्राद्यनवच्छिन्नसंततिवृद्धि स्थिरलक्ष्मीकीर्तिलाभशत्रुपराजयसदभीष्टसिध्यर्थं ॥ महाकाली महालक्ष्मी महासरस्वती कुलदेवता प्रीत्यर्थं ॥ अद्यप्रतिपत् प्रभृति महानवमीपर्यंतं प्रत्यहं दुर्गापूजनं मालाबंधनं अखंडदीपप्रज्वालनं कुमारीपूजनं खड्गपूजनं सप्तशतिपाठः एवमादि शारद नवरात्रोत्सवाख्यं कर्म करिष्ये ॥ तत्रादौ शारदनवरात्रोत्सवांगभूतं श्री महाकाली महालक्ष्मी महासरस्वती कुलदेवता प्रीत्यर्थं यथाज्ञा॰ करिष्ये ॥ या प्रमाणें संकल्प करून ज्या त्या शाखे प्रमाणें न्यासादि, शरव

---

१ संकल्पांत जेवढा विधि करावयाचा असेल त्या प्रमाणें घेणें. ह्मणजे २ कुमारीपूजन करण्याची वहिवाट असेलतर (कुमारीपूजनं) असें सदरीं लिहिलेले ह्मणावें नाहींतर सोडून द्यावें. याच प्रमाणें सर्व विधि समजावा.

पूजनापासून पूजा संमार्जना पर्यंत विधि झाल्यावर घटस्थापना 'पूर्णपात्रनिधानान्त' करून त्या वरुणाची पूजा करावी. नंतर **श्री महाकाली महालक्ष्मी महासरस्वती रूप कुलदे० नमः** अग्नी देवता लावून दक्षिणे पावेतों पूजा क० आ० करावी॥ **आरती**॥

आश्विन शुद्धपक्षीं अंबा बैसलि सिंहासनीं हो ॥ प्रतीपदे पासून घटस्थापना करुनी हो ॥ मूलमंत्रें जप करुनी भोंवते रक्षक ठेवुनी हो ॥ ब्रम्हाविष्णुरुद्र आईचें पूजन करिती हो ॥१॥ उदो बोला उदो अंबाबाइ माउलीचा हो ॥ उदो कारें गर्जती काय महिमा वर्णूं तिचा हो ॥ध्रु०॥ द्वितीयेचे दिवशीं मिळती चौसष्ट योगिनी हो ॥ सकळांमध्यें श्रेष्ठ परशूरामाची जननी हो॥ कस्तूरी मळवट भांगीं शेंदूर भरूनी हो॥ उदोकारें गर्जति समस्त चामुंडा मीळुनी हो ॥ उदो बोला० ॥२॥ तृतीयेचे दिवशीं अंबे शृंगार मांडिला हो ॥ मळवट चोळी पातळ कंठीं हार मुक्ताफळांहो ॥ कंठींचीं पदकें कांसे पीतांबर कसिलाहो ॥ अष्टभूजा मिरविती अंबे सुंदर दिसलीलाहो ॥ उदो० ॥३॥ चतुर्थीच्या दिवशीं विश्वव्यापक जननी हो॥ उपासकां पाहसी अंबे प्रसन्न अंतःकरणें हो ॥ पूर्णकृपें पाहसी जगन्माते मनमोहिनी हो ॥ भक्तांच्या माउली सुरते येती लोटांगणी हो ॥ उदो० ॥४॥ पंचमीचे दिवशीं व्रत तें उ-

पांगळलिताहो ॥ अर्घ्यपाद्य पूजनें तुजला भवानी स्तविती हो ॥ रात्रीचे समयीं करि
ती जागरण हरिकथा हो ॥ आनंदें प्रेमतें आलें सद्भावें क्रीडता हो ॥ उदो० ॥५॥ षष्ठीचे
दिवशीं भक्तां आनंद वर्षला हो ॥ घेउनि दिवट्या हस्तीं हर्षें गोंधळ घातला हो ॥ कवडी ए-
क अर्पितां देशी हार मुक्ताफळांहो ॥ जोगवा मागतां अंबा प्रसन्न झाली भक्त कुळा हो ॥ उदो०
॥६॥ सप्तमीचे दिवशीं सप्तशृंगगडावरी हो ॥ तेथें तूं नांदसी भोंवति पुष्पें नानापरी हो ॥ जा
ईजुई सेवंती पूजा रेखियली बरवी हो ॥ भक्तसंकटीं पडतां झेलुनि घेसी वरचेवरी हो ॥ उदो०
॥७॥ अष्टमीचे दिवशीं अष्टभुजा नारायणी हो ॥ सह्याद्री पर्वतीं पाहिली उभी जगज्जननी हो ॥
मन माझें मोहिलें शरण आलों तुजलागुनी हो ॥ स्तनपान देउनी सुखी केलें अंतःकरणीं हो ॥
उदो० ॥८॥ नवमीचे दिवशीं नवां दिवसांचें पारणें हो ॥ सप्तशती जप होमहवनें सद्भक्ती क
रुनी हो ॥ षड्रस अन्नें नैवेद्यासी अर्पियलीं भोजनी हो ॥ आचार्य ब्राम्हणां तर्पिलें तुझि या
कृपें करुनी हो ॥ उदो० ॥९॥ दशमीच्या दिवशीं अंबा निघे सिमा उल्लंघनी हो ॥ सिंहारूढ
होउनी दारुण शस्त्रें करिं घेउनी हो ॥ मारिले दानव शुंभनिशुंभ ऐसे किती हो ॥ विप्र
रामदास अंबेनें धरिलासे करीं हो ॥ उदो० ॥१०॥

आरती झाल्यावर मंत्रपुष्पांजलि वगैरे करून अखंडदीपाची स्थापना करावी. आणि **अखंडदीपकं देव्याः प्रीतये नवरात्रकम् ॥ उज्वालयेह्यहोरात्रमेकचित्तो धृतव्रतः ॥** हा मंत्र म्हणून दीप प्रज्वलित करावा व त्याची गंधाक्षत पुष्पांनीं पूजा करावी. नंतर पुष्पमाळा ॥ **पुष्पमालां शुभां रम्यामर्पयामि सुरेश्वरि ॥ प्रीताभव गृहाणेमां प्रथमे दिवसें बिके ॥** या प्रमाणें मंत्र म्हणून बांधावी.

॥ **अथ शमीवृक्ष पूजनविधिः** ॥ आश्विन शुद्ध दशमीचे दिवशीं सीमोल्लंघन करावें व तेथें शमीवृक्षाचें पूजन करावें. त्याचा संकल्पः– **मम दुष्कृतामंगलदुःखादि निरासार्थं क्षेमार्थं विजयार्थं च शमीवृक्षपूजनं करिष्ये ॥** नंतर गणपती स्मरण करून **शमी देवतायनमः ॥** अशी देवता लावून पूजा करून प्रार्थना करावी. **शमी शमयते पापं शमी लोहितकंटका ॥ धारिण्यर्जुनबाणानां रामस्य प्रियवादिनी ॥ करिष्यमाणयात्रायां यथाकालं सुखं मया ॥ तत्र निर्विघ्नकर्त्री त्वं भव श्रीरामपूजिते ॥** शमी वृक्षाचा अभाव असल्यास अश्मंतक वृक्षा

---

दुसरे दिवशीं पुष्पमाळा बांधतेवेळीं "द्वितीये दिवसें बिके" असें म्हणावे. तिसरे दिवशीं "तृतीये दिवसें" या प्रमाणें दररोज तो दिवस लावून म्हणत जावें.

ची ( आपटा ) पूजा करावी, या वृक्षाची प्रार्थनाः– अश्मंतक महावृक्ष महादोषनिवारण ॥ इष्टानां दर्शनं देहि शत्रूणां च विनाशनम् ॥ नंतर वृक्षाच्या मुळाजवळील मृत्तिका व वृक्षाचीं पानें घेऊन गीतवाद्यादि घोषानें ग्रामदेवतेचें दर्शन घेऊन घरीं यावें. घरीं आल्यावर कुलदेवतेचें दर्शन घ्यावें आणि स्त्रियांनीं निराजन करावें. नंतर मातापितरांस वंदन व इष्टमित्रांच्या भेटी इ॰ कुलाचार व प्रेमाचार करावा.

## ॥ प्रबोधोत्सव तुलसी विवाहपूजा ॥

मम आत्मनः श्रुतिस्मृति पुराणोक्त फल प्राप्त्यर्थं ॥ अस्माकं सहकुटुंबानां सपरिवाराणां द्विपदचतुष्पद सहितानां क्षेमस्थैर्य आयुरारोग्य ऐश्वर्याभिवृध्यर्थं समस्त मंगलावाप्त्यर्थं समस्ताभ्युदयार्थं धर्मार्थकाममोक्ष फलावाप्त्यर्थंच श्री दामोदरप्रीत्यर्थं प्रबोधोत्सवं संक्षेपस्तुलसीविवाहविधिंच सहतंत्रेण करिष्ये ॥ तदंग पुरुषसूक्तेन पुराणोक्त मंत्रैः षोडशोपचारैस्तंत्रेण महाविष्णु पूजां तुलसी पूजांच करिष्ये ॥ तदंग कलशाराधनं शंखघंटार्चनंच करिष्ये ॥ शरीरशुध्यर्थं पुरुषसूक्त न्यासांश्च करिष्ये ॥ आदौ निर्विघ्नतासिध्यर्थं महागणपति पूजनंच करिष्ये ॥ याप्रमाणें गणपति

गणपती पूजन करून नंतर आसनविधि, न्यास, कलश, शंख घंटा इ० पूजन करून पूजा संमार्जन प्रो क्षणा पर्यंत विधि करावा. आणि श्रीमहाविष्णवे दामोदराय श्री तुलसी देव्यै च नमः ॥ अ शी देवता लावून ध्याना पासून दक्षिणे पावेतों सर्व पूजा करावी. ततः घंटादिवाद्य घोषेन देवं प्र बोधयेत् तत्रमंत्रः– ब्रम्हेंद्ररुद्राग्नि कुबेरसूर्य। सोमादिभिर्वंदित वंदनीय ॥ बुध्यस्व देवेशजगन्निवास। मंत्र प्रभावेन सुखेन देव ॥१॥ इयंच द्वादशी देव प्रबोधार्थं तु निर्मिता॥ त्वयैव सर्व लोकानां हितार्थं शेषशायिना ॥२॥ उत्तिष्ठोत्तिष्ठ गोविंद त्यज निद्रां जगत्पते॥ त्वयैसुप्ते जगत्सुप्तमुत्थिते चोत्थितं जगत् ॥३॥ एवं उत्थाप्य ॥ पुष्पांजलिं दद्यात्॥ तत्र मंत्रः– गतो मेघा वियच्चैव निर्मलं निर्मलादिशः ॥ शारदानि च पुष्पाणि गृहाण मम केशव ॥ नंतर आचारा प्रमाणें तुलसीच्या समोर तुलसी कडेस मुख करून विष्णूस ठेवून मध्यें अंतःपट धरावा आणि मंगलाष्टकें ह्मणावीं.

## ॥ मंगलाष्टक ॥

आद्यो ढुंढिविनायको गणपतिश्चिंतामणिः सिद्धिदः। सेनाविघ्नपतिश्च वक्रवदनः श्रीपाशपाणिः प्रभुः ॥ आशापाशविनायकः सुखकरो मोदादिकः सद्गुणो । लोलार्को

दिविनायकः प्रतिदिनं कुर्यात्सदा मंगलम् ॥ शुभलग्न सावधान ॥१॥ आला कार्तिक शुक्लपक्ष सजणी जाणें विवाहोत्सवा। शोभते तुळसी सुरम्य नवरी वृंदा वनीं माधवा ॥ पुष्पाची वरि वृष्टि सृष्टि करिते संतुष्ट देवादिका। आली लग्नघडी विलंब नकरी कुर्यात्सदा मंगलम् ॥२॥ वृंदेचें अति भाग्य काय महिमा तीनें हरी मोहिला। त्या योगें रुक्मिणी रमेसि हरिनें वैकुंठ ही टाकिला ॥ तेव्हां देवसमस्त दुश्चित मनीं गौरीस सांगितलें। गौरीनें निजदिव्य तेज तुळसी बिजास्वयें अर्पिलें ॥३॥ हर्षें निर्भर सर्व देव मगते वृंदावनीं सुस्थळीं। बीजारोप करी सवेचि दिसलें श्रीतेज भूमंडळीं ॥ श्रीकृष्णें मगते वनस्पति पुढें देखोनि आलिंगिली। तेव्हां किन्नर सावधा नगजरें वर्षोनि पुष्पांजली ॥४॥ आनंदें मधुसूदनें निजशिरीं ठेविपली तूळसी। ते वेळीं सुमुहुर्त कार्तिकतिथि होती बरी द्वादशी ॥ ब्रम्हाशंकर सर्व देव ह्मण तीहा योग भासे बरा। आतां मंगळ सावधान गजरें द्यावी वधु या वरा ॥५॥ नवऱ्याला मुळ चालित्या सुंगरणी सोडीत दारूपुढें। वाजंत्री बहु वाजतीं चहुंकडे घोडी रथान्या पुढें॥ अंबारी पिंवळी तसेच हवदे हत्तीवरी नोबदा। जावाई यदुराज या वधुवरा कूर्यात्स-

दामंगलम् ॥ ६॥ लग्नाची मगसर्वसिद्धि करुनी वृंदातये आर्पिली । गोरीनें स्वकरें सुगंध हळदी लावुनिया न्हानिली ॥ ब्रह्मोनें घटिका स्थिरावुनि वरी बोलियलांमं गळे । दोघांते अतिसावधान गजरें सूलग्न हें लाविलें ॥७॥ लग्नांति सकळासि देउनि विडे विप्रास ही दक्षिणा । चोळी कंकण देउनी सकळ ही बोळाविल्या आंगना ॥ सेले अर्पुनी मानपूर्वक बरे गेले वऱ्हाडी घरा । तेथें सूत अनंत पोट भरुनि मिष्टान्न जेवी बरा ॥ शुभलग्नसावधान ॥८॥ तदेवलग्नं० ॥ सावधान ॥ नंतर नो, अंतरपट उत्तरेकडेस ओढून घ्यावा. ॥ दामोदर हस्तें तुलसीदानं कुर्यात् ॥ तत्रमंत्रः ॥ देवीं कनकसंपन्नां कनकाभरणैर्युताम् ॥ दास्यामि विष्णवे तुभ्यं ब्रम्हलोकजिगीषया ॥ मयासंवर्धितां यथाशक्त्यलंकृतामिमां तुलसीं देवीं दामोदराय श्रीधराय वराय तुभ्यमहं संप्रददे ॥ इतिदेव पुरतः साक्षात् जलं क्षिपेत् ॥ श्री महाविष्णुः प्रीयतामित्युक्ते मां देवीं प्रतिगृण्हातु भवान् ॥ ततोदेव हस्तस्पर्शं तुलस्याः कृत्वा. ॥ यजमानः ॥ त्वं देवि मेऽग्रतो भूयास्तुलसी देवपार्श्वतः ॥ देवि त्वं पृष्ठतो भूयास्त्वद्दानान्मोक्षमाप्नुयाम् ॥ दानस्य[1] प्रतिष्ठासिध्यर्थं मिमां दक्षिणां तुभ्यमहं संप्रददे ॥ देवपुरतो दक्षणा मर्पयेत् ॥ याप्रमाणें झाल्यावर आरती करावी.

---

[1] तुलसीदान सांग होण्याकरितां देवापुढें दक्षिणा ठेवावी.

## ॥ आरतीविष्णूची ॥

जयजय जगनगकनकाचिन्मयविधिजनका ॥ सुखकर ब्रम्हपरात्परप्रियतरमुनिसनका ॥ भवदलभंजन सुरपति हरिमायाहरका ॥ कमलावरकमलप्रियचुकवीं भवगरका ॥१॥ जयदेवजयदेवजय माधवविष्णो श्रीमाधवविष्णो ॥ व्यापक सर्वचराचर ब्रह्मचिपूर्णपरात्पर प्रसीद प्रभविष्णो ॥ ध्रु॰॥ जलचरमच्छहि कच्छवराहहृषिकेशी ॥ नरसिंहाकृतिवामनद्विजरघुपति होसी ॥ यदुपति बौद्धहि कल्की दशविधतनुऐशी ॥ भक्तजनप्रिय धरुनिजगपालनकरिसी ॥ जय॰ ॥२॥ सच्चित्स्वरूप सुखनाविसरूनि हेजीव ॥ व्यर्थचिअविवेकानें पावति देहभाव ॥ स्मरतां तवपद हृदयीं दृढतर सद्भाव ॥ प्रकटुनि सद्गुरुरूपें उद्धरसी देव ॥ जय॰ ॥३॥ त्वपदतत्पद मायासकलहिजगसर्गा ॥ सच्चित्सुख तूं साक्षीविरहितजडवर्गा ॥ साक्षीशब्दहि गाळुनि वससीनिजअंगा ॥ अगणितनिःशब्दचितूं असससीनिःसंगा ॥ जय॰ ॥४॥ विवर्त जडजगसर्वहि हे माया नसतां ॥ सर्वहिसाक्षी म्हणणें नसेचि मगपाहतां ॥ अद्वय अनंततत्वपदनिर्भयनिजसत्ता ॥ पदरंजवंदित मौनी अभेद समचित्ता ॥ जय॰ ॥५॥

## ॥आरतीतुळसीची॥

वृंदावनवासी जयमाये तुळसी ॥ शिवहरिब्रम्हादिकां तूं वंद्य होसी॥ मृत्युलोकीं प्रगटुनी भक्ता उद्धरिसी ॥ तूझें दर्शन होतां जळती अघराशी ॥१॥ जयदेवी जयदेवी जय तुळसीमाते ॥ करिं वृद्धी आयुष्या नारायणवनिते ॥ध्रु०॥ कार्तिक शुक्ल द्वादशीं कृष्णाशीं लग्न ॥ तूझे वृंदावनीं निशिदिनिं श्रीकृष्ण ॥ स्वर्गींहूनी वृष्टी करिती सुरगण ॥ भक्तचिंतन करितां करिसी पावन ॥ जय० ॥२॥ त्रिभुवनिं तूझी सेवा करिती त्रीकाळ ॥ त्यांतें सुख देउनी तारी गोपाळ ॥ तूझें स्तवन ऐकुनि कांपति कळिकाळ ॥ पावन करिं मज ह्मणे मोरो बल्लाळ ॥ जय० ॥३॥ नंतर मंत्रपुष्पांजलि सह यस्य० पूजा करावी.

येणें प्रमाणें व्रतें आणि पूजा विशेष प्रचारांतील घेतल्या आहेत. आतां या खालीं सदरीं आलेल्या आरत्या खेरीज करून हमेश लागणाऱ्या आणि साध्या चालीच्या अशा आरत्यांचा संग्रह केला आहे.

## ॥आरत्या॥

### ॥ गणपतीची ॥

सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची ॥ नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची ॥ सर्वांगीं सुंदर

* आरतीच्यापूर्वी महानैवेद्य दाखवून आरती करावी. नंतर तुलसीस मंगलसूत्रादि सौभाग्य द्रव्य अर्पण करून मंत्रपु० करावी व नंतर बोरें आंवळें इ० अर्पण करून सह कुटुंब सह परिवार चार प्रदक्षिणा कराव्या व यस्य स्मृ० करावी.

उटिशेंदूराची ॥ कंठी झळके माळ मुक्ताफळांची ॥ १॥ जयदेव जयदेव जय मंगलमूर्ति ॥ दर्शनमात्रें मनकामना पुरती ॥ ध्रु०॥ रत्नींखचित फरा तुज गौरीकुमरा ॥ चंदनाची उटी कुंकुमकेशरा ॥ हिरे जडीत मुकुट शोभतो बरा॥ रुणझुणतीं नेपुरें चरणीं घागरिया ॥ जयदेव० ॥२॥ लंबोदर पीतांबर फणिवर बंधना ॥ सरळसोंड वक्रतुंड त्रिनयना ॥ दास रामाचा वाट पाहे सदना ॥ संकटीं रक्षावें सुरवरवंदना ॥ जय० ॥३॥

## ॥आरती दुर्गेची॥

दुर्गे दुर्घटभारी तुजविण संसारीं ॥ अनाथनाथे अंबे करुणाविस्तारी ॥ वारीं वारीं जन्ममरणातें वारीं ॥ हारीं पडलों आतां दुस्तर नीवारी ॥१॥ जयदेवी जयदेवी महिषासुरमथनी ॥ सुरवर ईश्वर वरदे तारक संजिवनीं ॥ ध्रु०॥ त्रिभुवन भुवनीं पाहातां तुज ऐशी नाहीं ॥ चारी श्रमले परंतु न बोलवे कांहीं ॥ साही विवाद करितां पडलीं प्रवाहीं ॥ ते तूं भक्तालागीं पावसि लवलांहीं ॥ जय० ॥२॥ प्रसन्नवदनें प्रसन्न होसी निजदासां ॥ क्लेशांपासुनि सोडीं तोडीं भवपाशा ॥ अंबे तुजवांचून कोण पुरविल आशा ॥ नरहरि तल्लिन झाला पदपंकज लेशा ॥ जय० ॥ ३॥

## ॥ आरतीखंडेरायाची ॥

पंचानन हयवाहन सुरभूषित नीळा ॥ खंडामंडित दंडित दानव अवळीळा ॥ मणि मल्लां मर्दुनियां जो धूसर पिंवळा ॥ हिरे कंकण बासिंगें सुमनाच्या माळा ॥१॥ जयदेव जयदेव जय शिवमल्हारी ॥ वारीं दुर्जन असुरां भवदुस्तर तारीं ॥ ध्रु०॥ सुरवर संवरवर देमजलागीं देवा ॥ नाना नामें गाइन ही तुमची सेवा ॥ अघटित गुण गावया वाटत सेहेवा ॥ फणिवर शिणला किती नरपामर केवा ॥ जय० ॥२॥ रघुवरस्मरणीं शंकर हृदयींनीवाला ॥ तो हा मल्लांतक अवतार झाला ॥ यालागीं आवडी भावें वर्णीला ॥ रामीं रामदासा जिवलग भेटला ॥ जय० ॥ ३॥

## ॥ आरतीव्यंकटेशाची ॥

शेषाचल अवतार तारक तूं देवा ॥ सुरवर मुनिवर भावें करिती जनसेवा ॥ कमळार मणीं असती अगणित गुण ठेवा ॥ कमळाक्षा मज रक्षुनि सत्वर वर द्यावा ॥ १॥ जय देवा जयदेवा जय वेंकटेशा ॥ केवळ करुणासिंधू पुरवीशी आशा ॥ ध्रु०॥ हें निजवैं कुंठ ह्मणुनि ध्यातों मी नूतें ॥ दारवविसी गुण कैसे सकळिक लोकांतें ॥ देखुनि नूझें

स्वरूप सुख अद्भुत होतें ॥ ध्यातो तुजला श्रीपति दृढमानस होतें ॥ जय॰ ॥ २ ॥

## ॥ आरती विठ्ठलाची ॥

यूगें अठ्ठावीस विटेवरी ऊभा ॥ वामांगें रखुमाई दिसे दिव्य शोभा ॥ पुंडलिकाचे भेटीं परब्रह्म आलें गा ॥ चरणीं वाहे भीमा उद्धरीं जगा ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय पांडुरंगा ॥ रखुमाई वल्लभा राईच्या वल्लभा पावें जिवलगा ॥ ध्रु॰ ॥ तुळसीमाळा गळां कर ठेवुनि कटीं ॥ कांसे पीतांबर कस्तुरि लल्लाटीं ॥ देवसुरवर नित्य येती भेटी ॥ गरुड हनूमंत पुढें उभे राहती ॥ जय॰ ॥ २ ॥ धन्य वेणूनाद अनुक्षेत्रपाळा ॥ सुवर्णाचीं कमळें पदमाळा गळां ॥ राई रखुमाबाई राणीया सकळा ॥ ओंवाळीती राजा विठोबा सांवळा ॥ जय॰ ॥ ३ ॥ ओंवाळूं आरत्या कुरवंडया येती ॥ चंद्रभागेमध्यें सोडुनियां देती ॥ दिंडीपताका वैष्णव नाचती ॥ पंढरीचा महिमा वर्णावा कीती ॥ जय॰ ॥ ४ ॥ आषाढीं कार्तीकीं भक्तजन येतीं ॥ चंद्रभागेमध्यें स्नानजे करिती ॥ दर्शनहेळा मात्रें तया होय मुक्ती ॥ केशवासी नामदेव भावें ओंवाळीती ॥ जयदेव जयदेव जय पांडुरंगा ॥ रखु॰ ॥ ५ ॥

## ॥ आरती रामाची ॥

प्रथमसीताशुद्धि हनुमंतगेला ॥ लंकादहन करुनी अखया मारीला ॥ वधिला जंबूमाळी भुवनीं त्राहटीला ॥ आनंदाची गुडी घेऊनी आला ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय निजबोधारामा ॥ परमार्थेआरती सद्भावेंआरती परिपूर्णकामा ॥ ध्रु० ॥ उत्कट साधुनि शिळासेतु बांधोनी ॥ लिंगदेह लंकापुर विध्वंसोनी ॥ कामक्रोधादिक हे राक्षस मर्दोनी ॥ देह अहंभावरावणनिवटोनी ॥ जयदेव० ॥ २ ॥ निजबळें निजशक्ती सोडविली सीता ॥ ह्मणुनी येणें झालेंअयोध्येंरघुनाथा ॥ आनंदें वोसंडे वैराग्य भरता ॥ आरति घेउनि आली कौसल्यामाता ॥ जयदेव० ॥ ३ ॥ अनुहात ध्वनी गर्जतिअपार ॥ अठरापद्में वानर करिती भुभुःकार ॥ अयोध्येसी आले दशरथ कुमर ॥ नगरीं होत आहे आनंद थोर ॥ जयदेव० ॥ ४ ॥ सहजसिंहासनीं राजा रघुवीर ॥ सोहं भावें तया पूजाउपचार ॥ सहजाची आरती वाद्यांचा गजर ॥ माधवदासास्वामी आठव ना विसर ॥ जयदेव जयदेव जय निजबोधारामा ॥ परमार्थें आरती सद्भावें आरती परिपूर्णकामा ॥ ५ ॥

## ॥ आरती दत्ताची ॥

त्रिगुणात्मक त्रैमूर्ती दत्त हा जाणा ॥ त्रिगुणी अवतार त्रैलोक्यराणा ॥ नेती नेती शब्द नये अनुमाना ॥ सुरवर मुनिजन योगी समाधि नये ध्याना ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय श्रीदत्ता ॥ आरति ओंवाळीतां हरली भवचिंता ॥ ध्रु० ॥ सबाह्य अभ्यंतरीं तूं एक दत्त ॥ अभाग्यासी कैंची कळेल ही मात ॥ पराही परतली तेथें कैंचा हेत ॥ जन्ममरणाचाही पुरलासे अंत ॥ जय० ॥ २ ॥ दत्त येऊनीयां उभा ठाकला ॥ भावें साष्टांगेंसीं प्रणिपात केला ॥ प्रसन्न होउनि आशीर्वाद दिधला ॥ जन्ममरणाचा फेरा चुकविला ॥ जय० ॥ ३ ॥ दत्त दत्त ऐसें लागलें ध्यान ॥ हारपलें मन झालें उन्मन ॥ मी तूं पणाची झाली बोळवण ॥ एका जनार्दनीं श्रीदत्त ध्यान ॥ जय० ॥ ४ ॥

## ॥ आरती पंचायतनाची ॥

अघसंकट भय नाशन सुखदा विघ्नेशा ॥ आद्या सुरवरवंद्या नरवाणवेषा ॥ पाशांकुशधर सुंदर पुरविशी आशा ॥ निजवर देउनि हरिसी भ्रांतीच्या पाशा ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय सुखकरमूर्ती ॥ गणपति शिव हरि भास्कर अंबा सुखमूर्ती ॥ ध्रु० ॥ नंदी वहना

गह्ना पर्वतजारमणा ॥ मन्मथदह्नाशंभो वातात्मज नयना ॥ सर्वोपायविवर्जित
तापत्रयशमना ॥ कैलासाचलवासा करिती सुरनमना ॥ जय० ॥ पयसागरजाकां-
ना धरणीधरशयना ॥ करूणालय वारिसि भय वारिजदलनयना ॥ गरुडध्वजभज
नप्रियप्रभुपीतवसना ॥ अनुदिनिं तवकीर्तन रसचाखो हे रसना ॥ जय० ॥ ३ ॥
पद्मप्रबोधकरणा नेत्रभ्रमहरणा ॥ गोधनबंधनहर्ता दैदिप्याभरणा ॥ किरण-
स्पर्शे वारिसि या तम आवरणा ॥ शरणागतभयनाशन सुखवर्धन करणा जय० ॥ ४ ॥
त्रिभुवनउत्पत्ति पाळुन करिसी तूं माया ॥ नाहीं तुझियारूपा दुसरी उपमाया ॥ तूझे गुण
गणमहिमा याना कळे निगमाया ॥ करुणा करिसी अंबे मनविश्रामाया ॥ जय० ॥ ५ ॥

## ॥ आरती सत्यनारायणाची ॥

विधियुक्त पूजुनी करिती पुराणश्रवण ॥ परिमळद्रव्यांसहित पुष्पमाळा अर्पून ॥
घृतयुक्त शर्करामिश्रित गोधूमचूर्ण ॥ प्रसादभक्षण करितां प्रसन्न तूं नारायण ॥ १ ॥
जयजय दीनदयाळा सत्यनारायण देवा ॥ पंचारति ओंवाळूं श्रीपति तुज भक्तिभावा ॥
ध्रु० ॥ शतानंदविप्रें पूर्वी व्रत हें आचरिलें ॥ दरिद्र दवडुनि अंतीं त्यातें मोक्षपदा नेलें ॥

तैं पासुनि हें व्रत या कलियुगीं सकळां श्रुत झालें ॥ भावार्थें पूजितां बहुतां इच्छित लाधलें ॥ जय॰ ॥ २॥ साधूवैश्यें संतति साठीं तुजला प्रार्थिलें ॥ इच्छित पुरतां मदांध होउनि व्रत न आचरिलें ॥ त्या पापानें पडुनि संकटीं दुःखहि भोगिलें ॥ स्मृति होउनि आचरितां व्रत त्या तुवांचि उद्धरिलें ॥ जय॰ ॥ ३॥ प्रसाद विसरुनि पति भेटीला कलावती गेली ॥ क्षोभ तुझा होतांचि तयाची नौका बूडाली ॥ अंगध्वजरायासी यापरि दुःखस्थिति आली ॥ मृतवार्ता शत पुत्रांची सत्वर कर्णीं परिसीली ॥ जय॰ ॥ ४॥ पुनरपि पूजुनि प्रसाद ग्रहण करितां तत्क्षणीं ॥ तिची नौका तरली देखे कलावती नयनीं ॥ अंगध्वजरायासीं पुत्रभेट तिये ऊनी ॥ ऐसा भक्तां पावसि संकटिं तूं चक्रपाणी ॥ जय॰ ॥ ५॥ अगाध महिमा जाणुनि तव व्रत जे जन आचरती ॥ इच्छित पुरविसि त्यांचें देउनि संतति संपत्ती ॥ संहरती भय दुरितें सर्वहि बंधनें तुटती ॥ राजा रंका समान मानुनि श्रीपती ॥ जय॰ ॥ ६॥ ऐसा तव व्रत महिमा अपार वर्णूं मी कैसा ॥ भक्तिपुरःसर आचरतील त्यां पावसि जगदीशा ॥ भक्तांचा कनवाळू कल्पद्रुम तूं सर्वेशा ॥ मोरेश्वरसुत वासुदेव तुज विनवी भवनाशा ॥ जय॰ ॥ ७॥ ॥ इति सर्वपूजा स॰॥ ❦ ❦ ❦

## ॥ अथ कल्युपयुक्त चतुर्विध पुरुषार्थप्रदस्तोत्रं ॥

॥ प्रारंभः ॥

# ॥ अनुक्रमणिका ॥



॥१॥

## ॥ श्रीगणेशायनमः॥ अथ कलौउपयुक्त चतुर्विध पुरुषार्थप्रदस्तोत्र प्रारंभः॥

याठिकाणीं भगवंताच्या दिव्य नामांचींच स्तोत्रें यत्नपुरस्सर अशा रीतीनें घेतलीं आहेत कीं, सवड असल्यास भगवंताच्या सहस्रनामस्तोत्रांचेंच पठण अथवा श्रवण करावें. सहस्रनामस्तोत्रांचेंच पठण किंवा श्रवण व्हावें ही पूर्ण इच्छा आहे परंतु जर सवड नाहीं, अगर भोजनापूर्वी सहस्रनामस्तोत्र पठण करण्याची इच्छा असतां तशी वेळ सांपडत नाहीं तर पठण करण्यास थोडावेळ लागून सहस्रनामांचींच स्तोत्रें पठणकेल्याप्रमाणें फल प्राप्त होईल अशा रीतीनें संक्षिप्त स्तोत्रें ही घेतलीं आहेत.

परमेश्वर सर्वत्र एक असून उपासनेप्रमाणें ज्यांची जी इष्ट देवता असेल त्यांनीं त्या देवतेच्या सहस्रनाम स्तोत्रांचें पठण करावें. आणि बहुतेक देवतेंचीं सहस्रनाम स्तोत्रें छापूनही पुष्कळ ठिकाणीं गेलीं असल्यानें येथें ग्रंथविस्तारास्तव घेतलीं नाहींत. फक्त **श्रीविष्णु** आणि **श्रीशंकर** यांचींच सहस्रनामस्तोत्रें अशाकरितां घेतलीं आहेत कीं, विशेष उपासक विष्णु अथवा शिवाचे फार असतात. रामकृष्णादि अवतार विशेष विष्णु आणि शिवाचेच झाले असल्यानें त्या देवतेची आराधना विष्णूचे अवतारांत विष्णु सहस्रनाम व शिवाचे अवतारांत शिवसहस्रनाम पठण केल्यानें त्याच देवतेचीआ-

राधना केल्यासारखें होतें. **तस्य लोकप्रधानस्य जगन्नाथस्य भूपते** धर्मराजास भिष्मां नीं सांगितलें आहे कीं, परमेश्वर चौदा विद्यांचा प्रतिपाद्य विषय असल्यामुळें कोणत्याही प्राण्यानें कोणत्याही देवतेची प्रार्थना केली तरी ती त्या परमेश्वराचीच होते. तसेंच **शिवस्य हृदयं विष्णु विष्णोश्च हृदयं शिवः॥** विष्णु आणि शिव हे अगदीं एक आहेत. महाभारतामध्यें धर्मराजानें भिष्मास अत्यंत विचाराचे सहा प्रश्न केले आहेत.

**॥ किमेकं दैवतं लोके किंवाऽप्येकं परायणम् ॥**
**॥ स्तुवंतः कंकमर्चंतः प्राप्नुयुर्मानवाः शुभम् ॥**
**॥ को धर्मः सर्वधर्माणां भवतः परमो मतः ॥**
**॥ किं जपन्मुच्यते जंतुर्जन्मसंसारबंधनात् ॥**

धर्मराज ह्मणालाः- आचार्य ! वेद, शास्त्रें आणि पुराणें ह्या सर्वांमध्यें मुख्य देव कोणता ठरविला आहे ? तसेच त्यांमध्यें प्राण्याची अत्युत्तम गति कोणती सांगितली आहे ? कोणाची स्तुति केली असतां व कोणाची पूजा केली असतां प्राण्यांचें उभयलोकीं कल्याण होतें ? सगळ्या धर्मामध्यें आपल्याला कोणता धर्म उत्तम वाटतो ? व कोणता जप केला असतां प्राणी जन्ममरणांपासून म्हणजे

संसार बंधनापासून मुक्त होतो ? याप्रमाणें सहा प्रश्न केल्यावर भिष्माचार्यांनीं अति उत्तम व श्रेयस्कर धर्माचें सार सांगून त्याकरितां **श्रीविष्णुसहस्त्रनाम** कथन केलें आहे. यासाठीं भगवंताच्या सहस्त्रनाम श्रवणपठणापासून काय फल आहे व धर्मास भिष्मांनीं धर्माचें सार काय सांगितलें आहे हें समजण्यासाठीं विष्णुसहस्त्रनामाचा हेतु व त्याचें फल हें सार्थ घेण्याचें केलें आहे. याचप्रमाणें सर्व देवतांच्या सहस्त्रनामांचें फल जाणावें.

दुसरें आम्ही या ठिकाणीं याचप्रमाणें उपयुक्त अशीं स्तुतिपर वगैरे ही कांहीं स्तोत्रें घेतलीं आहेत तीं साग्र ध्यानीं येण्यास्तव सार्थच घेण्याचें केलें आहे. आतां मुख्यत्वें नामांचींच स्तोत्रें घेण्याचा प्रकार याखालीं लिहिला आहे.

॥ कलौयुगेकल्मषमानसानां । नान्यत्र धर्मोखलुनिश्चयेन ॥
॥ रामेतिवर्णद्वयमादरेण । सदापठन्मुक्तिमुपैतिजंतुः ॥ भाग०

कलीमध्यें सर्व लोकांचीं मानसें कल्मषरूप होऊन धर्माधर्म विचार राहणार नाहीं. यामुळें चित्तशुध्यर्थ नित्याचीं स्नानसंध्यादि कर्में तींच सांग होणें कठीण आहे, मग ईश्वरप्राप्ती स्तव, जप, तप, ध्यान, यज्ञादि साधनें होणें तर अत्यंतच दुस्तर होय. यासाठीं ईश्वराच्या नामसंकीर्तनानेंच कलीम-

ध्यें प्राणी मुक्त होतील.

तसेंच स्कंदपुराण आणि धर्मसिंधुमध्यें ज्यास कलीची बाधा होत नाहीं व जे कलींत सेव्य आहेत असे विषयीं सांगितलें आहे तें असें:

॥ येचविष्णुकथारक्ता येस्मरंत्पनिशंहरिं ॥
॥ येसदाचारनिरता नतान्वैबाधतेकलिः ॥१॥
॥ शालिग्रामशिलायस्यगृहेतिष्ठतिमानद ॥
॥ अथवाभारतंगेहे नतंवैबाधते कलिः ॥२॥
॥ यश्चवैशाखनिरतोमाघस्नानपरश्चयः॥
॥ कार्तिकेदीपदातायो नतंवै बाधते कलिः॥ ३॥
॥ प्रत्यहं शृणुयाद्यस्तु कथांविष्णोर्महात्मनः॥
॥ पापघ्नीं मोक्षदांदिव्यांनतंवैबाधतेकलिः॥ ४॥
॥ यद्गृहे वैश्वदेवश्च यद्गृहे तुलसीशुभा ॥
॥ यदंगणेशुभागौश्चनतंवैबाधतेकलिः ॥ ५॥

॥ नयस्यतिष्ठतेशास्त्रंगृहेभागवतंकलौ ॥
॥ नतस्यपुनरावृत्तिर्यम पाशात्कदाचन॥ ६॥
॥ यत्रयत्रभवेत्पुण्यंशास्त्रंभागवतंकलौ॥
॥तत्रतत्रसदैवाहंभवामित्रिदशैःसह ॥ ७॥ स्क० पु०
॥ गीतागंगातथाविष्णुःकपिलाश्वत्थसेवनम् ॥
॥ एकादशीव्रतंचैवसप्तमंनकलौयुगे ॥ ८॥
॥ विष्णुंशिवंवाभजतांगुरोःपित्रोश्चसेविनां॥
॥ गोवैष्णवमहाशैवतुलसीसेविनामपि ॥ ९॥
॥ नस्यात्कलिकृतोदोषःकाश्यांनिवसतामपि॥
॥ कलौगुरूणांभजनमीशभक्त्यधिकंस्मृतं॥ १०॥
॥ जपादौयत्रयासंख्याकलौसास्याच्चतुर्गुणा॥
॥ कलौदानंमहच्छ्रेष्ठंशिवविष्णोश्चकीर्तनं ॥ ११॥
॥ कृतेयद्दशभिर्वर्षैस्त्रेतायांहायनेनतु ॥

## ॥ द्वापरेतत्तुमासेन अहोरात्रेणतत्कलौ ॥१२॥



१ जे सर्वदां विष्णुकथेचे ठिकाणीं आसक्त असतात, जे अहोरात्र श्री हरीचें स्मरण करितात व जे सदाचार तत्पर असतात, त्यांस कदापि कलीची बाधा होत नाही. २ हे मानप्रदा, ज्याच्या घरीं शालिग्राम शिला व भारत आहे त्यास कलीची बाधा होत नाहीं. ३ जो वैशाखधर्म तत्पर व माघस्नान तत्पर आणि कार्तिकमासीं दीपदान करतो त्यास कलीची बाधा होत नाहीं. ४ प्रतिदिवशीं महात्म्या विष्णूची पापनाशक आणि मोक्षप्रद अशी दिव्य कथा श्रवण करितो त्यास कलीची बाधा होत नाहीं. ५ ज्याच्या घरीं वैश्वदेव होतो, ज्याच्या घरीं तुलसी आहे आणि ज्याचे अंगणांत गाय आहे त्यास कलीची बाधा होत नाहीं. ६ कलियुगांत ज्याचे घरीं भागवत पुस्तकांचा संग्रह नाहीं, त्याची यमपाशापासून निवृत्ति कधींही होत नाहीं. ७ या कलींत जेथें जेथें पुण्यकारक भागवतशास्त्र आहे, तेथें सकल देवासहवर्तमान मीं निरंतर वास करितों. ८ गीता, गंगा, विष्णु, कपिला गाय, अश्वत्थसेवा आणि एकादशीव्रत हीं सहा कलियुगांत मुख्य सेव्य समजलीं गेलीं आहेत. ९ विष्णु, शिव, यांचें भजन करणारे, गुरू व मातापिता यांची सेवा करणारे, गाई, वैष्णव, महाशैव आणि तुलसी यांची सेवा करणारे. १० आणि त्याच प्रमाणें काशीक्षेत्रांत वास करणारे यांना कलीचा दोष प्राप्त होत नाहीं. कलि

युगामध्यें गुरुभजन देवाच्या भक्तीहून विशेष असें सांगितलें आहे. ११ जपादिकांविषयींजी संख्या सांगितली ती कलियुगीं चौपट जाणावी. शिव व विष्णु यांचें नाम संकीर्तन व दान हीं कलियुगांत महाश्रेष्ठ होत. १२ कृतयुगीं जी दहा वर्षांनीं सिद्धि होते, ती कृतयुगीं एक वर्षानें, द्वापार युगांत एक मासानें, आणि कलियुगांत एका अहोरात्रीनें सिद्धि होते.

आतां भगवन्नामाविषयीं ही भागवतांत सांगितलें आहे तें असें:-

॥ स्तेनःसुरापोमित्रध्रुक्ब्रह्महागुरुतल्पगः ॥
॥ स्त्रीराजपितृगोहंतायेचपातकिनोऽपरे ॥ १॥
॥ सर्वेषामप्यघवतामिदमेवसुनिष्कृतम् ॥
॥ नामव्याहरणंविष्णोर्यतस्तद्विषयामतिः ॥२॥
॥ ननिष्कृतैरुदितैब्रह्मवादिभिस्तथाविशुध्द्यत्यघवान्व्रतादिभिः॥
॥ यथाहरेर्नामपदैरुदाहृतैस्तदुत्तमश्लोकगुणोपलंभकम् ॥३॥
॥ अज्ञानादथवाज्ञानादुत्तमश्लोकनामयत् ॥
॥ संकीर्तितमघंपुंसोदहेदेधोयथाऽनलः ॥४॥

॥ तस्मात्संकीर्तनंविष्णोर्जगन्मंगलमंहसाम् ॥
॥ महतामपिकौरव्यविद्ध्यैकांतिकनिष्कृतम् ॥ ५ ॥

चोर, सुरापान करणारा, मित्रद्रोही, ब्रम्हहत्या करणारा, गुरूस्त्रीगामी, स्त्रिया, राजा, मातापितर, गाय यांची हत्या करणारा व इतरही जे पातकी आहेत त्या सर्व पातकी जनांस भगवान् विष्णूचें नामोच्चरणच उत्तम प्रायश्चित्त आहे. पातकीजन हरीच्या केवळ नामाच्या पदाचा उच्चार केल्यानें जसा अत्यंत शुद्ध होतो, तसा ब्रह्मवादी मन्वादिकांनीं कथन केलेल्या व्रतादिक प्रायश्चितांनीं तो शुद्ध होत नाहीं; कारण कृच्छ्र चांद्रायणादिक प्रायश्चित्त केवळ पाप नाशक मात्र आहे, पण नामोच्चारण तरपापनिवृत्ति करून जिवास हरिगुणबोधकारकही होतें. भगवंताचें नाम अज्ञानानें, किंवा जाणून बुजून कसेंही घेतलें तरी, मुलानें काष्ठाच्या राशीवर अजाणपणानें जरी अग्नि टाकिला तरी तो अग्नि त्या काष्ठांस जसा दग्ध करतो, त्याप्रमाणेंच भगवंताचें नामोच्चारण सर्व पापांचा नाश करितें. भगवान् विष्णूचें नामसंकीर्तनच सकल महापापांचें मुख्य प्रायश्चित्त असून जगास परम मंगलकारकही आहे असें श्रीशुकोनें परिक्षित राजास सांगितलें आहे.

॥ अक्षरंपरमंब्रह्मगोविंदेतिचत्र्यक्षरं ॥

॥ एवमुच्चारयंन्नित्यं ब्रम्हभूयाय कल्पते ॥
॥ निमिषंनिमिषार्द्धंवा येस्मरंतिजनार्दनं ॥
॥ ऋतुकोटिसहस्त्राणां ध्यानमेकविशेषित ॥
॥ कृष्णेतिमंगलंनाम्नयस्यवाचिप्रवर्तते ॥
॥ भस्मीभवंतिराजेंद्र महापातककोटयः ॥
॥ हरेर्नामैवनामैवनामैवममजीवनं ॥
॥ कलौनास्त्येवनास्त्येवनास्त्येवगतिरन्यथा ॥
॥ गोकोटिदानंग्रहणेषुकाशी । प्रयागगंगायुतकल्पवासः ॥
॥ यज्ञायुतंमेरुसुवर्णदानं । गोविंद नामस्मरणेन तुल्यः ॥ पां.गीता.

परमब्रह्म अशी " गोविंद " हींतीन अक्षरें जे नित्यशः पठण करतील ते ब्रह्मपदाप्रत प्राप्त होतील, असें ब्रम्हदेवाचें म्हणणें असून कश्यप म्हणतात कीं, निमिषांनीं किंवा निमिषार्धानेंजो भगवान् जनार्दन याचें नामस्मरण करील त्यास सहस्त्रकोटि यज्ञाचें फल प्राप्त होऊन ध्यानानेंतर याहीपेक्षां विशेष फल प्राप्त होईल. वसिष्ठाचें म्हणणें 'भगवान श्रीकृष्णा हें मंगल नाम जो वाणीनें उ-

च्चारील त्याचीं कोट्यावधि महापातकें भस्म होतील. आणि या कलीमध्यें हरिनामाशिवाय अन्य गति मुळींच नसून जीवास तारक हरिनामच मुख्य आहे. गौतम सांगतात ग्रहण समयीं काशी क्षेत्राचे ठिकाणीं कोटि गायी दान केल्या असतां, प्रयागीं गंगेच्या ठिकाणीं दहा हजार वर्षे वासकेला असतां, दहा हजार यज्ञ केले असतां आणि मेरुपर्वतासमान सुवर्णदान केलें असतां जें पुण्य प्राप्त होतें तें गोविंदनाम स्मरणाची बरोबरी करीत नाहीं; म्हणजे या सर्वांपेक्षां गोविंदनाम स्मरण हें श्रेष्ठ आहे. चंपुकार ह्मणतातः-

वेपंते दुरितानि मोहमहिमासंमोहमालंबते।
साशंकं नरवरं जनी कलयते श्रीचित्रगुप्ताकृतिः॥
सानंदं मधुपर्कसंभ्रमविधौ वेधा करोत्युद्यमं।
स्मर्तुं नाम तवेश्वराभिलषते ब्रूमः किमन्यत्परं ॥१॥

एका पुरुषानें भगन्नाम घेण्याचा मनांत निश्चय मात्र केला, घेतलें मुळींच नाहीं. इतक्यानेंच त्या पुरुषाच्या शरीरांतील पातकें हडबडून पळूं लागलीं. चित्रगुप्त विचारांत पडून या पुरुषाचें पुण्य जमा करावें तर यानें उधार ठेविलें आहे, म्हणजे नामाचा उच्चार केला नाहीं. न जमा करावें त

र निश्चय केला आहे. अशा विचारामुळें कांहीं सुचेनासें होऊन लेखणी घेऊन हाताच्या नरवाडर रेघाटीत बसला. ब्रम्हदेवास आनंद होऊन या पुरुषाचें पूजन करण्यास संभ्रमितअसा मधुपर्कादिक पूजनाचें साहित्य सिद्ध करण्याच्या तयारीस लागला. कवि ह्मणतात फक्त नाम घेण्याचें मनांत आणिल्यानें इतकें झालें मग हे जगदीश प्रभो! तुझें नाम घेतलें तर त्याचें पुण्य काय सांगावें?

अथर्वणोपनिषदांतही सर्व वेदांचें सार कलीमध्यें भगवन्नामच आहे असें सांगितलें असल्यानें तें अथर्वणोपनिषत् स्तोत्रारंभीं प्रथमच घेण्याचें केलें आहे. स्कंदपुराणांत प्रत्यक्ष भगवान श्री विष्णुयांनीं ब्रम्हदेवास सांगितलें आहे तें असें.

कथयिष्येतवप्रीत्याअपिगुह्यतरंमम ॥
प्रतिज्ञैषाचमेपुत्रनजानंतिसुरासुराः ॥
विनोदेनापिदंभेनमौढ्याल्लोभाच्छलादपि ॥
योमांभजतिसोऽवश्यं मद्भक्तोनावसीदति ॥
तत्रपुत्रगयाकाशीपुष्करं कुरुजांगलं ॥
प्रत्यहं मंदिरे यस्य कृष्णकृष्णेतिकीर्तनम् ॥

जीवितं जन्मसाफल्यं मुखं तस्यैव सार्थकं ॥
सततं रसनायस्य कृष्ण कृष्णेति जल्पति ॥

भगवान् ब्रम्हदेवास सांगतात- तुला आतां गुह्य आहे तें सांगतों, तें तूं प्रीतिपूर्वक ग्रहण कर. हे पुत्रा, माझी जी प्रतिज्ञा आहे ती देव व दैत्यही जाणत नाहींत ती तुला सांगतों. जो विनोदानें, दांभिकपणानें, मुर्खत्वानें, लोभानें किंवा छलानें माझें नाम ग्रहण करील तो माझा भक्त कधींही दुःख पावणार नाहीं. ज्याच्या गृहांत नित्य 'कृष्ण' या नामाचें कीर्तन होतें तें गृह काशी, पुष्कर, कुरुक्षेत्र, जांगल देशाप्रमाणें पवित्र जाणावें. ज्याच्या जिव्हेनें निरंतर कृष्ण स्मरण होत आहे, त्याचे जीवित सफल जाणावें. आणि सुखप्राप्तिही त्यासच होतें.

याप्रमाणें कली मध्यें मुख्य भगवन्नामच सार असल्यानें भगवंताच्या दिव्य नामाचींच स्तोत्रें आणि तदनुरूपच इतर स्तुतिस्तोत्रें ही घेण्याचें केलें आहे.

॥ स्तोत्रें ॥

॥श्रीगणेशायनमः॥ हरिः ॐ ॥ द्वापरांते नारदो ब्रम्हाणं प्रतिजगाम ॥ द्वापाराचे शेवटीं नारदऋषी ब्रम्हदेवाप्रत गेले. कथं नु भगवन् गां पर्यटन् कलिं संतरेयमिति ॥ हे भग

वन् पृथ्वी पर्यटण करून कलीप्रत कसा तरेन? सहोवाच (ब्रम्हदेव म्हणतात) साधुपृष्टोस्मि सर्व श्रुतिरहस्यं गोप्यंत शृणु ॥ येन कलिं संतरिष्यसि भगवत आदि विष्णोर्नारायणस्य नाम्नेति नारदा, चांगलें विचारलेंस. भगवान् आदिविष्णु नारायण यांच्या ज्या नामानें कलीप्रत तरशील तें सर्व वेदांचें सार व गुप्त ठेवण्यास योग्य असें तुला सांगतों तें ऐक. पुनर्नारदः पप्रच्छ ॥ पुनः नारद विचारतात. भगवन् किंतन्नामेति महाराज, तें नाम कोणतें? सहोवाच ब्रह्मदेव म्हणतात. हेरे राम हरे राम राम राम हरे हरे ॥ हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥ इति षोडशकं नाम्नां कलिकल्मषनाशनम् ॥ हीं सोळा नामें कलिदोष नाशक आहेत. नातः परतरोपायः सर्ववेदेषु दृश्यते ॥ सर्व वेदामध्यें यापेक्षां दुसरा उपाय नाहीं. इति षोडशकं षोडशकला वृतस्य ब्रम्हणो अवर्ण विनाशकं ॥ तत्ते प्रकाशते परब्रह्म मेघा पायें शुमानि वेति ॥ याप्रमाणें षोडशकलायुक्त जें ब्रम्ह त्याचीं सोळा नांमें आहेत. सूर्य जसा अंधःकाराचा नाश करितो त्या प्रमाणें तमनाशक तुला सांगितलें. पुनर्नारदः पप्रच्छ ॥ भगवन् कोस्य विधिरिति ॥ पुनः नारद ब्रह्मदेवास पुसतात कीं याचा विधि काय? सहोवाच ब्रम्हदेव म्हणतात. नास्य विधिरिति याला विधि मुळींच नाहीं. सर्वदा शुचिरशुचिर्वा पठन् ॥ ब्रम्हणः सलोकतां समीपतां सरूपतां सायुज्य

तामेति ॥ नेहमीं पठण करणारा पवित्र असो अथवा अपवित्र असो, त्याला त्या ब्रम्हाची सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता प्राप्त होईल. यदास्य षोडशकस्य सार्धकोटित्रयं जपति ॥ तदा ब्रम्हहत्यां तरति वीरहत्यां तरति ॥ निःशेषं हरत्यन्यानि स्वर्णस्तेय वृषली गमन मैथुनानि ॥ या सोळा नामांचा साडेतीन कोटि जो जप करतो तो ब्रम्हहत्या, वीरहत्या, सुवर्ण चोरी इत्यादि पातकें व चांडाळी गमन आणि मैथुन या पासून झालेल्या पातका पासून मुक्त होतो. पित्रोर्देवानां मनुष्याणामृणानपाकरणात् स्वस्वधर्म कर्मपरित्याग पापात्सद्यः शुचितामाप्नुयात्सद्यो मुच्यते सद्यो मुच्यत इति ॥ पितरांच्या, देवांच्या व मनुष्यांच्या ऋणांचें दूरीकरण न केल्यामुळें जें पातक त्या पासून आणि स्वधर्म व कर्मपरित्याग जन्य पातकां पासून तात्काळ आणि निश्चयानें मुक्त होतो. ॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥ ॐ तत्सद्ब्रम्हा०

## ॥ अथविष्णुसहस्त्रनामप्रा०॥

॥ श्रीगणेशायनमः ॥ वैशंपायनउवाच ॥

॥ श्रुत्वाधर्मानशेषेणपावनानिचसर्वशः ॥
॥ युधिष्ठिरः शांतनवंपुनरेवाभ्यभाषत ॥१॥

वैशंपायन म्हणाले :- 'जन्मेजया' भीष्माचार्यांनीं धर्म राजाला पुष्कळ वेदोक्तधर्म व आत्मशुध्यर्थ अनेकप्रकारचीं व्रतें व प्रायश्चित्तें सांगितलीं; तीं ऐकून धर्मराजानें भीष्माचार्यांना पुनः विचारलें.

युधिष्ठिरउवाच-॥ किमेकं दैवतं लोकेकिंवाऽप्येकंपरायणम् ॥
॥स्तुवंतः कं कमर्चंतः प्राप्नुयुर्मानवाः शुभम् ॥ २॥

धर्मराज म्हणाले :- आचार्य, वेद, शास्त्रें आणि पुराणें ह्या सर्वांमध्यें मुख्य देव कोणता ठरविला आहे? तसेंच त्यामध्यें प्राण्याची अत्युत्तम गति कोणती सांगितली आहे? कोणाची स्तुति केली असतां व कोणाची पूजा केली असतां प्राण्यानें उभयलोकीं कल्याण होतें?

॥को धर्मःसर्वधर्माणांभवतःपरमोमतः ॥
॥ किंजपन्मुच्यतेजंतुर्जन्मसंसारबंधनात् ॥ ३॥

सगळया धर्मांमध्यें आपल्याला कोणता धर्म उत्तम वाटतो? व कोणता जप केला असतां प्राणी जन्ममरणापासून आणि ह्या संसार बंधनापासून मुक्त होतो?

भीष्मउवाच-॥जगत्प्रभुं देवदेवमनंतं पुरुषोत्तमम् ॥

॥ स्तुवन्नामसहस्रेणपुरुषःसततोत्थितः ॥४॥

भीष्माचार्य म्हणालेः- राजा, प्राण्यानें निरंतर दक्षतापूर्वक विष्णूच्या सहस्रनामांचा जप करावा. तो भगवान् सगळ्या जगाचा चालक व इंद्रादि देवांनाही पूज्य आहे; त्याच्या स्वरूपाचा अथवा गुणांचा अंत नाहीं; तोच सर्वोत्तम पुरुष होय.

॥ तमेवचार्चयन्नित्यंभक्त्यापुरुषमव्ययम् ॥
॥ ध्यायन्स्तुवन्नमस्यंश्चयजमानस्तमेवच ॥५॥

प्राण्यानें भक्तिपुरःसर दररोज त्याचीच षोडशोपचारांनीं पूजा करावी. तो परमेश्वर निर्विकार आहे. ध्यान, पूजांगस्तुति, व नमस्कार त्यालाच करावें. अशा रीतीनें त्याची पूजा करणारा प्राणी सर्वदुःखांतून पार पडतो.

॥ अनादिनिधनंविष्णुंसर्वलोकमहेश्वरम् ॥
॥ लोकाध्यक्षंस्तुवन्नित्यंसर्वदुःखातिगोभवेत् ॥ ६ ॥

परमेश्वराला आदि आणि अंत नाहींत, तो सगळ्या जगाला व्यापून राहिला आहे. आपल्याला जगांत जे कांहीं लोक अथवा प्राणी दिसून येतात त्यांच्यापेक्षां, ब्रम्हदेव वगैरे देवांची योग्यता अ-

धिक आहे खरी: पण भगवान् विष्णूचें महात्म्य ब्रम्हदेवापेक्षांही फार अधिकआहे. कोणताही प्राणी कोठेंही पाहिजे तें करीत असो, त्याच्यावर परमेश्वराची दृष्टि आहेच; अशा त्या देवाची प्राण्यानें दर रोज स्तुति केली असतां तो सर्व दुःखापासून पार पडतो.

॥ ब्रम्हण्यं सर्व धर्मज्ञं लोकानां कीर्तिवर्धनम् ॥
॥ लोकनाथं महद्भूतं सर्वभूतभवोद्भवम् ॥ ७॥

परमेश्वर वेदांचें, ब्रम्हदेवाचें व ब्राम्हणांचें नेहमीं कल्याण करीत असतो, त्याला सर्व धर्मांचें पूर्ण ज्ञान आहे. प्रल्हाद नारदांसारख्या भक्तांची कीर्ति त्यानेंच वाढविली, व असें करण्याचा त्याचा स्वभावच आहे, म्हणून सर्व लोक त्याची प्रार्थना करीत असतात. त्या व्यापक ईश्वराची सर्वत्र सत्ता आहे, सगळया जगाच्या उत्पत्तीला कारण तोच होय.

॥ एष मे सर्व धर्माणां धर्मोऽधिकतमो मतः ॥
॥ यद्भक्त्या पुंडरीकाक्षं स्तवैरर्चेन्नरः सदा ॥ ८॥

मनुष्यानें त्या कमलनयन ईश्वराची नित्य भक्तिपुरःसर स्तुति करून आराधना करावी. हाच धर्म मला सर्व धर्मामध्यें अतिशय उत्तम वाटतो.

नाम० ॥९॥

॥ परमंयोमहत्तेजः परमंयोमहत्तपः ॥
॥ परमंयोमहद्ब्रह्म परमंयःपरायणम् ॥ ९ ॥

तो चंद्रसूर्यादि सर्वांना प्रकाश देणारा व्यापक तेजोरूपी परमेश्वर प्राणीमात्राला निरनिराळ्या कामीं प्रवृत्त करून वागवून घेतो; त्याची आज्ञा कोणालाही मोडतां येत नाहीं. तोच परमपूज्य व वेदामध्यें वर्णिलेलें सत्यज्ञानानंदात्मक ब्रम्ह होय. प्राण्यांची उत्तमगति परमेश्वरच आहे. ह्याच्या स्वरूपीं प्राप्त झालेल्या प्राण्यांच्या सुखामध्यें अथवा आनंदामध्यें कधींही अंतर पडत नाहीं.

॥ पवित्राणांपवित्रंयोमंगलानांचमंगलम् ॥
॥ दैवतंदेवतानांच भूतानांयोऽव्ययःपिता ॥ १० ॥

जगामध्यें गंगायमुना, वगैरे नद्या आणि काशी प्रयाग आदि करून क्षेत्रें पवित्र आहेत खरीं; पण परमेश्वर त्यांच्यापेक्षांही अतिशय पवित्र आहे. तसेंच सृष्टीमध्यें स्त्री, पुत्र, संपत्ति, स्वर्गलोक वगैरे, आनंदाचीं साधनें बहुत आहेत; परंतु त्या सर्वांपेक्षां परमेश्वर अतिशय श्रेष्ठ आनंदाचें स्थान होय. ब्रम्हदेव, इंद्र वगैरे देवांनाही तो पूज्य आहे. शिवाय तो सर्व प्राण्यांचा उत्पादक असून पुनः निर्विकार आहे.

वि०स० ॥९॥

॥ यतः सर्वाणि भूतानि भवन्त्यादि युगागमे ॥
॥ यस्मिंश्च प्रलयं यांति पुनरेव युगक्षये ॥ ११॥

पहिल्या युगाच्या प्रारंभीं त्याच्या पासूनच सर्व भूतें उत्पन्न होतात, स्थितिकालीं त्याच्याच स्वरूपीं राहतात, व पुनः युगाच्या समाप्तिकालीं त्याच्यामध्येंच सर्व लय पावतात.

॥ तस्य लोकप्रधानस्य जगन्नाथस्य भूपते ॥
॥ विष्णोर्नामसहस्रं मे शृणु पापभयापहम् ॥ १२॥

धर्मराजा, तो परमेश्वर चौराही विद्यांचा प्रतिपाद्य विषय असल्यामुळें, कोणत्याही प्राण्यानें कोणत्याही देवतेची प्रार्थना केली तरी ती याचीच होते; एतावता, सर्व लोक ह्याचीच प्रार्थना करितात. अशा विष्णूचें सहस्रनाम मी तुला सांगतों ऐक. हें सहस्रनाम म्हणणारांचीं व ऐकणारांचीं सर्व पापें आणि संसारांतील भयें नाहींशीं होतात.

॥ यानि नामानि गौणानि विख्यातानि महात्मनः ॥
॥ ऋषिभिः परिगीतानि तानि वक्ष्यामि भूतये ॥ १३॥

त्या सर्वान्तर्यामी परमेश्वरानें अनेक लीला केल्या आहेत, त्यांवरून जीं त्याचीं नांवें प्रसिद्ध झालीं आहेत व ऋषींनीं चतुर्विधपुरुषार्थांच्या प्राप्तीसाठीं जागोजाग ज्यांचें वर्णन केलें आहे तीं नांवें मी तुला सांगतों.

॥अथध्यानम्॥ शांताकारंभुजगशयनंपद्मनाभंसुरेशं विश्वाधारंगगनसदृशं मेघवर्णं शुभांगम्॥ लक्ष्मीकांतं कमलनयनं योगिभिर्ध्यानगम्यंवंदेविष्णुंभवभयहरं सर्वलोकैकनाथम्॥

॥ ॐ विश्वंविष्णुर्वषट्कारोभूतभव्यभवत्प्रभुः॥ भूतकृद्भूतभृद्भावोभूतात्माभूतभावनः ॥१॥ पूतात्मा परमात्माच मुक्तानांपरमागतिः॥ अव्ययःपुरुषःसाक्षी क्षेत्रज्ञोऽक्षरएवच ॥२॥ योगोयोगविदांनेताप्रधानपुरुषेश्वरः ॥ नारसिंहवपुःश्रीमान् केशवः पुरुषोत्तमः ॥३॥ सर्वःशर्वःशिवःस्थाणुर्भूतादिर्निधिरव्ययः॥ संभवोभावनोभर्ताप्रभवःप्रभुरीश्वरः ॥४॥ स्वयंभूःशंभुरादित्यःपुष्कराक्षोमहास्वनः ॥ अनादिनिधनोधाताविधाताधातुरुत्तमः ॥५॥ अप्रमेयोहृषीकेशःपद्मनाभोऽमरप्रभुः ॥ विश्वकर्मामनुस्त्वष्टास्थविष्ठःस्थविरोध्रुवः ॥६॥ अग्राह्यःशाश्वतःकृष्णोलोहिताक्षःप्रतर्दनः॥ प्रभूतस्त्रिककुब्धामपवित्रंमंगलंपरम्॥७॥ ईशानःप्राणदःप्राणोज्येष्ठःश्रेष्ठःप्रजापतिः॥ हिरण्यगर्भोभूगर्भोमाधवोमधुसूदनः॥८॥ ईश्वरोविक्रमीधन्वीमेधावीविक्रमःक्रमः ॥ अनुत्तमोदुराधर्षःकृतज्ञःकृतिरात्मवान् ॥९॥ सुरेशःशरणंशर्मविश्वरेताःप्रजाभवः ॥ अहःसंवत्सरोव्यालःप्रत्ययः

सर्वदर्शनः ॥१०॥ अजःसर्वेश्वरःसिद्धःसिद्धिःसर्वादिरच्युतः ॥ वृषाकपिरमेयात्मा स-
र्वयोगविनिःसृतः ॥११॥ वसुर्वसुमनाःसत्यःसमात्मासंमितःसमः ॥ अमोघःपुंडरीका
क्षोवृषकर्मावृषाकृतिः ॥१२॥ रुद्रोबहुशिराबभ्रुर्विश्वयोनिःशुचिश्रवाः ॥ अमृतः
शाश्वतःस्थाणुर्वरारोहोमहत्तपाः ॥१३॥ सर्वगःसर्वविद्भानुर्विष्वक्सेनोजनार्दनः ॥
वेदोवेदविदव्यंगोवेदांगोवेदवित्कविः ॥१४॥ लोकाध्यक्षःसुराध्यक्षोधर्माध्यक्षः
कृताकृतः ॥ चतुरात्माचतुर्व्यूहश्चतुर्दंष्ट्रश्चतुर्भुजः ॥१५॥ भ्राजिष्णुर्भोजनंभोक्ता
सहिष्णुर्जगदादिजः ॥ अनघोविजयोजेताविश्वयोनिःपुनर्वसुः ॥१६॥ उपेंद्रोवामनः
प्रांशुरमोघः शुचिरूर्जितः ॥ अतींद्रःसंग्रहःसर्गोधृतात्मानियमोयमः ॥१७॥ वेद्योवै-
द्यःसदायोगीवीरहामाधवोमधुः ॥ अतींद्रियोमहामायोमहोत्साहोमहाबलः ॥१८॥
महाबुद्धिर्महावीर्योमहाशक्तिर्महाद्युतिः ॥ अनिर्देश्यवपुःश्रीमानमेयात्मामहाद्रिधृ
क् ॥१९॥ महेष्वासोमहीभर्ताश्रीनिवासःसतांगतिः ॥ अनिरुद्धःसुरानंदोगोविंदोगो
विदांपतिः ॥२०॥ मरीचिर्दमनोहंसःसुपर्णोभुजगोत्तमः ॥ हिरण्यनाभःसुतपाःपद्म
नाभःप्रजापतिः ॥२१॥ अमृत्युःसर्वदृक्सिंहःसंधातासंधिमान्स्थिरः ॥ अजोदुर्मर्ष-

णःशास्ताविश्रुतात्मासुरारिहा ॥२२॥ गुरुर्गुरुतमोधामसत्यःसत्यपराक्रमः ॥ निमि-
षोऽनिमिषःस्रग्वीवाचस्पतिरुदारधीः ॥२३॥ अग्रणीर्ग्रामणीःश्रीमान्न्यायोनेतास-
मीरणः ॥ सहस्रमूर्धाविश्वात्मासहस्राक्षःसहस्रपात् ॥२४॥ आवर्तनोनिवृत्तात्मा
संवृतःसंप्रमर्दनः ॥ अहःसंवर्तकोवन्हिरनिलोधरणीधरः ॥२५॥ सुप्रसादःप्रसन्नात्मा
विश्वधृग्विश्वभुग्विभुः ॥ सत्कर्तासत्कृतिःसाधुर्जन्हुर्नारायणोनरः ॥२६॥ असंख्ये
योऽप्रमेयात्माविशिष्टःशिष्टकृच्छुचिः ॥ सिद्धार्थःसिद्धसंकल्पःसिद्धिदःसिद्धिसा-
धनः ॥२७॥ वृषाहीवृषभोविष्णुर्वृषपर्वावृषोदरः ॥ वर्धनोवर्धमानश्चविविक्तःश्रु-
तिसागरः ॥२८॥ सुभुजोदुर्धरोवाग्मीमहेंद्रोवसुदोवसुः ॥ नैकरूपोबृहद्रूपःशिपि
विष्टःप्रकाशनः ॥२९॥ ओजस्तेजोद्युतिधरःप्रकाशात्माप्रतापनः ॥ ऋद्धःस्पष्टाक्ष
रोमंत्रश्चंद्रांशुर्भास्करद्युतिः ॥३०॥ अमृतांशूद्भवोभानुःशशबिंदुःसुरेश्वरः ॥ औ
षधंजगतःसेतुःसत्यधर्मपराक्रमः ॥३१॥ भूतभव्यभवन्नाथःपवनःपावनोऽनलः ॥
कामहाकामकृत्कांतःकामःकामप्रदःप्रभुः ॥३२॥ युगादिकृद्युगावर्तोनैकमायो
महाशनः ॥ अदृश्योऽव्यक्तरूपश्चसहस्रजिदनंतजित् ॥३३॥ इष्टोविशिष्टःशिष्टे-

ष्टः शिखंडीनहुषोवृषः ॥ क्रोधहाक्रोधकृत्कर्ताविश्वबाहुर्महीधरः॥ ३४॥ अच्युतः
प्रथितः प्राणः प्राणदोवासवानुजः ॥ अपांनिधिरधिष्ठानमप्रमत्तः प्रतिष्ठितः॥ ३५॥
स्कंदः स्कंदधरो धुर्योवरदोवायुवाहनः॥ वासुदेवोबृहद्भानुरादिदेवः पुरंदरः ॥ ३६ ॥ अ-
शोकस्तारणस्तारः शूरः शौरिर्जनेश्वरः॥ अनुकूलः शतावर्तः पद्मीपद्मनिभेक्षणः॥ ३७॥
पद्मनाभोऽरविंदाक्षः पद्मगर्भः शरीरभृत्॥ महर्धिर्ऋद्धोवृद्धात्मा महाक्षोगरुडध्वजः॥
३८॥ अतुलः शरभोभीमः समयज्ञोहविर्हरिः ॥ सर्वलक्षणलक्षण्योलक्ष्मीवान्समितिं-
जयः ॥ ३९॥ विक्षरोरोहितोमार्गोहेतुर्दामोदरः सहः ॥ महीधरोमहाभागोवेगवानमि-
ताशनः ॥ ४०॥ उद्भवः क्षोभणोदेवः श्रीगर्भः परमेश्वरः॥ करणंकारणंकर्ताविकर्तागह-
नोगुहः ॥ ४१॥ व्यवसायोव्यवस्थानः संस्थानः स्थानदोध्रुवः॥ परर्धिः परमः स्पष्टः स्तु-
ष्टः पुष्टः शुभेक्षणः॥ ४२॥ रामोविरामोविरजोमार्गोनेयोनयोऽनयः॥ वीरः शक्तिमतां
श्रेष्ठोधर्मोधर्मविदुत्तमः ॥ ४३॥ वैकुंठः पुरुषः प्राणः प्राणदः प्रणवः पृथुः ॥ हिरण्यग-
र्भः शत्रुघ्नोव्याप्तोवायुरधोक्षजः॥ ४४॥ ऋतुः सुदर्शनः कालः परमेष्ठी परिग्रहः॥ उग्रः
संवत्सरोदक्षोविश्रामोविश्वदक्षिणः ॥ ४५॥ विस्तारः स्थावरः स्थाणुः प्रमाणंबीजमव्य

यम्॥ अर्थोऽनर्थोमहाकोशोमहाभोगोमहाधनः ॥४६॥ अनिर्विण्णःस्थविष्ठोऽभूर्धर्म
यूपोमहामखः॥ नक्षत्रनेमिर्नक्षत्रीक्षमः क्षामः समीहनः ॥४७॥ यज्ञइज्योमहेज्य
श्चक्रतुःसत्रंसतांगतिः॥ सर्वदर्शीविमुक्तात्मासर्वज्ञोज्ञानमुत्तमम्॥४८॥ सुव्रतःसु-
मुखःसूक्ष्मःसुघोषःसुखदःसुहृत्॥ मनोहरोजितक्रोधोवीरबाहुर्विदारणः॥४९॥
स्वापनःस्ववशोव्यापीनैकात्मानैककर्मकृत्॥ वत्सरोवत्सलोवत्सीरत्नगर्भोधनेश्वरः
॥५०॥ धर्मगुब्धर्मकृद्धर्मीसदसत्क्षरमक्षरम्॥ अविज्ञातासहस्रांशुर्विधाताकृतल-
क्षणः॥५१॥ गभस्तिनेमिःसत्वस्थःसिंहोभूतमहेश्वरः॥ आदिदेवोमहादेवोदेवेशो
देवभृद्गुरुः॥५२॥उत्तरोगोपतिर्गोप्ताज्ञानगम्यःपुरातनः॥ शरीरभूतभृद्भोक्ताकपिं
द्रोभूरिदक्षिणः॥५३॥ सोमपोऽमृतपःसोमःपुरुजित्पुरुसत्तमः॥ विनयोजयःसत्य
संधोदाशार्हःसात्वतांपतिः॥५४॥ जीवोविनयितासाक्षीमुकुंदोऽमितविक्रमः॥
अंभोनिधिरनंतात्मामहोदधिशयोंऽतकः॥५५॥ अजोमहार्हःस्वाभाव्योजितामित्रः
प्रमोदनः॥ आनंदोनंदनोनंदःसत्यधर्मात्रिविक्रमः॥५६॥ महर्षिःकपिलाचार्यःकृ
तज्ञोमेदिनीपतिः॥ त्रिपदस्त्रिदशाध्यक्षोमहाशृंगःकृतांतकृत्॥५७॥ महावराहो

गोविंदः सुषेणः कनकांगदी ॥ गुह्योगभीरोगहनोगुप्तश्चक्रगदाधरः ॥५८॥ वेधाः
स्वांगोऽजितः कृष्णोदृढः संकर्षणोऽच्युतः ॥ वरुणोवारुणोवृक्षः पुष्कराक्षोमहाम-
नाः ॥५९॥ भगवान्भगहानंदी वनमालीहलायुधः ॥ आदित्योज्योतिरादित्यः
सहिष्णुर्गतिसत्तमः ॥ ६०॥ सुधन्वाखंडपरशुर्दारुणोद्रविणप्रदः ॥ दिवस्पृक्सर्वदृ
ग्व्यासोवाचस्पतिरयोनिजः ॥ ६१॥ त्रिसामासामगः सामनिर्वाणंभेषजंभिषक् ॥
संन्यासकृच्छमःशांतोनिष्ठाशांतिःपरायणः ॥ ६२॥ शुभांगःशांतिदः स्रष्टा कुमुदः
कुवलेशयः ॥ गोहितोगोपतिर्गोप्तावृषभाक्षोवृषप्रियः ॥ ६३॥ अनिवर्तीनिवृत्ता-
त्मासंक्षेप्ताक्षेमकृच्छिवः ॥ श्रीवत्सवक्षाः श्रीवासः श्रीपतिः श्रीमतांवरः ॥ ६४॥ श्री
दः श्रीशः श्रीनिवासः श्रीनिधिः श्रीविभावनः ॥ श्रीधरः श्रीकरः श्रेयः श्रीमाँल्लोकत्रया
श्रयः ॥ ६५॥ स्वक्षः स्वंगः शतानंदोनंदिर्ज्योतिर्गणेश्वरः ॥ विजितात्माविधेयात्मा
सत्कीर्तिश्छिन्नसंशयः ॥ ६६॥ उदीर्णसर्वतश्चक्षुरनीशः शाश्वतःस्थिरः ॥ भूश-
योभूषणोभूतिर्विशोकः शोकनाशनः ॥६७॥ अर्चिष्मानर्चितःकुंभोविशुद्धात्मावि
शोधनः ॥ अनिरुद्धोऽप्रतिरथः प्रद्युम्नोऽमितविक्रमः ॥ ६८॥ कालनेमिनिहावी

रः शौरिःशूरजनेश्वरः ॥ त्रिलोकात्मात्रिलोकेशः केशवः केशिहा हरिः ॥ ६९ ॥ कामदेवःकामपालःकामी कांतः कृतागमः ॥ अनिर्देश्यवपुर्विष्णुर्वीरोऽनंतो धनंजयः ॥७०॥ ब्रह्मण्योब्रह्मकृत् ब्रह्मा ब्रह्म ब्रह्मविवर्धनः ॥ ब्रह्मविद्ब्राह्मणो ब्रह्मी ब्रह्मज्ञो ब्राह्मणप्रियः ॥७१॥ महाक्रमोमहाकर्मामहातेजामहोरगः ॥ महाक्रतुर्महायज्वामहायज्ञोमहाहविः ॥७२॥ स्तव्यःस्तवप्रियःस्तोत्रंस्तुतिःस्तोतारणप्रियः ॥ पूर्णःपूरयितापुण्यःपुण्यकीर्तिरनामयः ॥७३॥ मनोजवस्तीर्थकरो वसुरेता वसुप्रदः ॥ वसुप्रदो वासुदेवो वसुर्वसुमना हविः॥ ७४॥ सद्गतिः सत्कृतिः सत्तासद्भूतिःसत्परायणः ॥ शूरसेनो यदुश्रेष्ठःसन्निवासःसुयामुनः॥७५॥ भूतावासोवासुदेवःसर्वासुनिलयोनलः ॥ दर्पहादर्पदोदृप्तोदुर्धरोऽथापराजितः ॥७६॥ विश्वमूर्तिर्महामूर्तिर्दीप्तमूर्तिरमूर्तिमान् ॥ अनेकमूर्तिरव्यक्तःशतमूर्तिःशताननः॥७७॥ एकोनैकःसवःकःकिंयत्तत्पदमनुत्तमम् ॥ लोकबंधुर्लोकनाथोमाधवो भक्तवत्सलः॥७८॥ सुवर्णवर्णो हेमांगो वरांगश्चंदनांगदी ॥ वीरहाविषमःशून्यो धृताशीरचलश्चलः ॥७९॥ अमानीमानदोमान्यो लोकस्वामी त्रिलोकधृक् ॥ सुमेधामेधजो धन्यः सत्यमेधाध

राधरः ॥ ८० ॥ तेजोवृषो द्युतिधरः सर्वशस्त्रभृतांवरः ॥ प्रग्रहो निग्रहो व्यग्रो नैकशृं-
गो गदाग्रजः ॥ ८१ ॥ चतुर्मूर्तिश्चतुर्बाहुश्चतुर्व्यूहश्चतुर्गतिः ॥ चतुरात्मा चतुर्भावश्च-
तुर्वेदविदेकपात् ॥ ८२ ॥ समावर्तोनिवृत्तात्मा दुर्जयो दुरतिक्रमः ॥ दुर्लभो दुर्गमो दुर्गो
दुरावासो दुरारिहा ॥ ८३ ॥ शुभांगो लोकसारंगः सुतंतुस्तंतुवर्धनः ॥ इंद्रकर्मा महाकर्मा
कृतकर्मा कृतागमः ॥ ८४ ॥ उद्भवः सुंदरः सुंदो रत्ननाभः सुलोचनः ॥ अर्को वाजसनः शृं-
गी जयंतः सर्वविज्जयी ॥ ८५ ॥ सुवर्णबिंदुरक्षोभ्यः सर्ववागीश्वरेश्वरः ॥ महाह्रदो महा
गर्तो महाभूतो महानिधिः ॥ ८६ ॥ कुमदः कुंदरः कुंदः पर्जन्यः पावनोऽनिलः ॥ अमृतांशो
ऽमृतवपुः सर्वज्ञः सर्वतोमुखः ॥ ८७ ॥ सुलभः सुव्रतः सिद्धः शत्रुजिच्छत्रुतापनः ॥ न्यग्रो
धोदुंबरोऽश्वत्थश्चाणूरांध्रनिषूदनः ॥ ८८ ॥ सहस्रार्चिः सप्तजिव्हः सप्तैधाः सप्तवाहनः
॥ अमूर्तिरनघोऽचिंत्यो भयकृद्भयनाशनः ॥ ८९ ॥ अणुर्बृहत्कृशः स्थूलो गुणभृन्निर्गु-
णो महान् ॥ अधृतः स्वधृतः स्वास्यः प्राग्वंशो वंशवर्धनः ॥ ९० ॥ भारभृत् कथितो योगी
योगीशः सर्वकामदः ॥ आश्रमः श्रमणः क्षामः सुपर्णो वायुवाहनः ॥ ९१ ॥ धनुर्धरो धनुर्वे
दो दंडो दमयिता दमः ॥ अपराजितः सर्वसहो नियंता नियमो यमः ॥ ९२ ॥ सत्ववान् सा-

त्विकः सत्यः सत्यधर्मपरायणः ॥ अभिप्रायः प्रियार्होऽर्हः प्रियकृत् प्रीतिवर्धनः ॥९३॥
विहायसगतिर्ज्योतिः सुरुचिर्हुतभुग्विभुः ॥ रविर्विरोचनः सूर्यः सविता रविलोचनः ॥९४॥
अनंतो हुतभुग्भोक्ता सुखदो नैकदोऽग्रजः ॥ अनिर्विण्णः सदामर्षी लोकाधिष्ठानमद्भुतः
॥९५॥ सनात्सनातनतमः कपिलः कपिरव्ययः ॥ स्वस्तिदः स्वस्तिकृत्स्वस्तिः स्वस्तिभुक्
स्वस्तिदक्षिणः ॥ ९६॥ अरौद्रः कुंडली चक्री विक्रम्यूर्जितशासनः ॥ शब्दातिगः शब्द
सहः शिशिरः शर्वरीकरः ॥९७॥ अक्रूरः पेशलो दक्षो दक्षिणः क्षमिणां वरः ॥ विद्वत्तमो
वीतभयः पुण्यश्रवणकीर्तनः ॥९८॥ उत्तारणो दुष्कृतिहा पुण्यो दुःस्वप्ननाशनः ॥ वीर
हा रक्षणः संतो जीवनः पर्यवस्थितः ॥९९॥ अनंतरूपोऽनंतश्रीर्जितमन्युर्भयापहः ॥ चतु
रस्रो गभीरात्मा विदिशो व्यादिशो दिशः ॥१००॥ अनादिर्भूर्भुवो लक्ष्मीः सुवीरो रुचिरां
गदः ॥ जननो जनजन्मादिर्भीमो भीमपराक्रमः ॥ १॥ आधारनिलयो धाता पुष्पहासः प्र
जागरः ॥ उर्ध्वगः सत्पथाचारः प्राणदः प्रणवः पणः ॥२॥ प्रमाणं प्राणनिलयः प्राणभृ
त् प्राणजीवनः ॥ तत्त्वं तत्त्वविदेकात्मा जन्ममृत्युजरातिगः ॥ ३॥ भूर्भुवः स्वस्तरुस्तारः
सविता प्रपितामहः ॥ यज्ञो यज्ञपतिर्यज्वा यज्ञांगो यज्ञवाहनः ॥ ४॥ यज्ञभृद्यज्ञकृद्य

ज्ञीयज्ञभुग्यज्ञसाधनः॥ यज्ञांतकृद्यज्ञगुह्यमन्नमन्नादएवच ॥९॥आत्मयोनिःस्वयंजातोवैखानःसामगायनः ॥ देवकीनंदनःस्त्रष्टाक्षितीशःपापनाशनः ॥६॥ शंखभृन्नंदकीचक्रीशार्ङ्गधन्वागदाधरः॥ रथांगपाणिरक्षोभ्यः सर्वप्रहरणायुधः॥१०७॥ सर्वप्रहरणायुधोन्नमइति ॥

॥ इतीदंकीर्तनीयस्य केशवस्यमहात्मनः ॥

॥ नाम्नांसहस्त्रंदिव्यानामशेषेणप्रकीर्तितम् ॥१०८॥

भीष्माचार्य म्हणाले - धर्मराजा, भगवान् विष्णु ब्रम्हदेवाला आणि शंकराला देखील निरनिराळीं कामें लावून देऊन वागवून घेतो. त्याचें चरित्र फारच प्रशंसनीय आहे. अशारीतीनें हीं त्या ईश्वराचीं अलौकिक सहस्त्रनामें तुला मीं निवेदन केलीं.

॥ यइदंशृणुयान्नित्यंयश्चापिपरिकीर्तयेत् ॥

॥ नाशुभंप्राप्नुयात्किंचित्सोऽमुत्रेहचमानवः ॥१०९॥

जो मनुष्य हें सहस्त्रनाम नित्य श्रवण करितो किंवा जो ह्याचें कीर्तन करितो, त्याला ह्या लोकामध्यें आणि परलोकांमध्यें किंचित् देखील दुःख भोगावें लागणार नाहीं.

॥ वेदांतगोब्राह्मणः स्यात् क्षत्रियोविजयी भवेत् ॥
॥ वैश्यो धनसमृद्धः स्याच्छूद्रः सुखमवाप्नुयात् ॥११०॥

वर्ण परत्वानें ह्याच्या श्रवणकीर्तनाचीं निरनिराळीं फळें मिळतातः- ब्राम्हणाला वेदांताचें ज्ञान होतें, व त्या द्वारानें मोक्ष प्राप्त होतो; क्षत्रियाला सर्व ठिकाणीं जय मिळतो; वैश्य धनसंपन्न होतो; व शूद्रानें ह्याचें श्रवण केलें तर त्याला सुखप्राप्ति होते.

॥ धर्मार्थी प्राप्नुयाद्धर्ममर्थार्थी चार्थमाप्नुयात् ॥
॥ कामानवाप्नुयात्कामी प्रजार्थी चाप्नुयात्प्रजां ॥१११॥

आपल्या हातून धर्माचरण घडावें अशा इच्छेनें मनुष्यानें ह्यावें (सहस्रनामाचें) कीर्तन किंवा श्रवण केलें तर त्याला धर्मप्राप्ति होते, अर्थप्राप्तीची इच्छा असल्यास अर्थ मिळतो, उपभोग पाहिजे असतील तर उपभोग मिळतात, किंवा संतति पाहिजे असेल तर संतति मिळते.

॥ भक्तिमान्यः सदोत्थाय शुचिस्तद्गतमानसः ॥
॥ सहस्रं वासुदेवस्य नाम्नामेतत्प्रकीर्तयेत् ॥११२॥

जो मनुष्य आळस टाकून देऊन, शुद्ध होत्साता परमेश्वराकडे चित्त लावून भक्तिपुरःसर नित्य

ह्या विष्णुसहस्रनामाचा जपकरील,

॥ यशःप्राप्नोतिविपुलंज्ञातिप्राधान्यमेवच ॥
॥ अचलांश्रियमाप्नोतिश्रेयःप्राप्नोत्यनुत्तमम् ॥ ११३ ॥

त्याला पुष्कळ कीर्ति मिळेल, आपल्या ज्ञातींत श्रेष्ठपणा प्राप्त होईल, अचळ संपत्ति मिळेल व त्याचें अतिशय कल्याण होईल.

॥ नभयं क्वचिदाप्नोति वीर्यं तेजश्चविंदति ॥
॥ भवत्यरोगोद्युतिमान् बलरूपगुणान्वितः ॥ ११४ ॥

त्याला कोणाची भीति राहणार नाहीं; कोणतेंही काम करण्याची उत्सुकता व तेज ही त्याला प्राप्त होईल; त्याचे रोग नाहींसे होऊन शरीर तेजःपुंज होईल; शक्ति वृद्धिंगत होईल, रूप आणि उत्तम गुण प्राप्त होतील.

॥ रोगार्तोमुच्यतेरोगाद्बद्धोमुच्येतबंधनात् ॥
॥ भयान्मुच्येतभीतस्तुमुच्येतापन्नआपदः ॥ ११५ ॥

रोग्यानें ह्यांचें श्रवण किंवा कीर्तन केलें तर त्याला आरोग्य मिळेल, बद्ध ( तुरुंगांत किंवा संसारपा-

ग्रांत पडलेल्या ) मनुष्यानें ह्यांचें श्रवण, कीर्तन केलें तर तो बंधमुक्त होईल. भ्यालेल्यानें केलें तर त्याची भीति नाहींशी होईल; व संकटांत पडलेल्यानें केलें तर त्याचें संकट दूर होईल.

॥ दुर्गाण्यतितरत्याशु पुरुषः पुरुषोत्तमम् ॥
॥ स्तुवन्नामसहस्त्रेण नित्यं भक्तिसमन्वितः ॥ ११६॥

दररोज भक्तिपुरःसर ह्या सहस्त्रनामाच्या योगानें परमेश्वराची स्तुति केली तर तो मनुष्य मोठल्या संकटांतून लवकर पार पडेल.

॥ वासुदेवाश्रयो मर्त्यो वासुदेवपरायणः ॥
॥ सर्वपापविशुद्धात्मा याति ब्रम्ह सनातनम् ॥ ११७॥

जो मनुष्य वासुदेवाचा आश्रय करील व त्याच्याकडे आपली वृत्ति सर्वथा लावील त्याचीं सर्व पापें नाहींशीं होतील; व तो पवित्र होत्साता नित्य ब्रम्हपदास प्राप्त होईल.

॥ न वासुदेवभक्तानामशुभं विद्यते क्वचित् ॥
॥ जन्ममृत्युजराव्याधिभयं नैवोपजायते ॥ ११८॥

परमेश्वराच्या भक्तांचें अकल्याण कधींही व्हावयाचें नाहीं व त्यांना जन्म मृत्यु वार्धक्य आ-

णि रोग ह्याचें भयही बाळगण्याचें नाहीं.

॥ इमंस्तवमधीयानःश्रद्धाभक्तिसमन्वितः॥

॥ युज्येतात्मा सुखक्षांतिश्रीधृतिस्मृतिकीर्तिभिः॥११९॥

जो मनुष्य विश्वासपूर्वक, भक्तीनें ह्या स्तुतीचा (सहस्त्रनामाचा) पाठ करील त्याला आत्मज्ञान-सुख, सहनशीलता, संपत्ति, धैर्य, स्मरणशक्ति आणि कीर्ति प्राप्त होईल.

॥ नक्रोधोनचमात्सर्यंनलोभोनाशुभामतिः॥

॥ भवंतिकृतपुण्यानांभक्तानांपुरुषोत्तमे॥ १२०॥

ईश्वराची भक्ति करणाऱ्या पुण्यवान् मनुष्यांना क्रोध, मत्सर, लोभ हे विकार कधींही बाधायाचे नाहींत किंवा त्यांच्या बुद्धीला मोह प्राप्त व्हावयाचा नाहीं.

॥ द्यौःसचंद्रार्कनक्षत्राखंदिशोभूर्महोदधिः॥

॥ वासुदेवस्यवीर्येणविधृतानिमहात्मनः॥१२१॥

चंद्रसूर्य आणि नक्षत्रें यांसह स्वर्गलोक, आकाश, दिशा, पृथ्वी, महासागर हीं सर्व त्या जगन्निवास परमेश्वराच्या सामर्थ्यामुळें जागच्याजागीं स्थिर राहिलीं आहेत.

॥ ससुरासुरगंधर्वं सयक्षोरगराक्षसम् ॥
॥ जगद्वशे वर्ततेदं कृष्णस्य सचराचरम् ॥१२२॥

देव, दैत्य, गंधर्व, यक्ष, सर्प, राक्षस- ह्यांसह हें सर्व स्थावरजंगमात्मक जग कृष्णाच्या स्वाधीन आहे.

॥ इंद्रियाणि मनोबुद्धिः सत्त्वं तेजोबलं धृतिः ॥
॥ वासुदेवात्मकान्याहुः क्षेत्रं क्षेत्रज्ञ एव च ॥१२३॥

इंद्रियें, मन, बुद्धि, उत्सुकता, इंद्रियांचें पटुत्व, शारीरिकशक्ति, धैर्य, शरीर, आणि शरीराभिमानी आत्मा, हीं सर्व परमेश्वराचीं रूपें आहेत.

॥ सर्वागमानामाचारः प्रथमं परिकल्पते ॥
॥ आचारप्रभवो धर्मो धर्मस्य प्रभुरच्युतः ॥१२४॥

श्रुतिस्मृतींनीं निरनिराळे धर्म जे सांगितले आहेत त्यांचें आचरण करण्यापूर्वीं शौच, स्नान, संध्या, वंदन वगैरे नित्यकर्में करणें अगत्याचें आहे; हीं कर्में केलीं तरच त्या धर्माचरणाचें फळ मिळतें. एतावता, आचार ही धर्माची पहिली पायरी होय. अशा रीतीनें धर्माचरण केलें ह्मणजे त्याचें फळ ईश्वर देतो.

॥ ऋषयः पितरो देवा महाभूतानि धातवः ॥
॥ जंगमाजंगमं चेदं जगन्नारायणोद्भवम् ॥ १२५ ॥

ऋषि, पितर, देव, पृथ्वी, वगैरे महाभूतें, सुवर्णादि धातु, हें स्थावरजंगमात्मक सर्व जग ईश्वरापासून उत्पन्न झालें.

॥ योगो ज्ञानं तथा सांख्यं विद्याः शिल्पादि कर्म च ॥
॥ वेदाः शास्त्राणि विज्ञानमेतत्सर्वं जनार्दनात् ॥ १२६ ॥

योग, वेदांतशास्त्र, सांख्यशास्त्र, विद्या, शिल्पादि कला, वेद, इतर शास्त्रें आणि ज्ञान हीं सर्व ईश्वरापासून उत्पन्न झालीं.

॥ एको विष्णुर्महद्भूतं पृथग्भूतान्यनेकशः ॥
॥ त्रीन् लोकान् व्याप्य भूतात्मा भुंक्ते विश्वभुगव्ययः ॥ १२७ ॥

विचार केला असतां असें दिसून येतें कीं, परमार्थतः सत्य काय तो एक ईश्वरच होय. तोच अनेक प्रकारचीं देव, मनुष्य, पशु, पक्षी, वगैरे शरीरें धारण करून, स्थूल, सूक्ष्म, आणि अतिशय बारीक अशा तीन्ही प्रकारच्या विषयांचा उपभोग घेतो.

॥ इमंस्तवं भगवतोविष्णोर्व्यासेनकीर्तितम् ॥
॥ पठेद्यइच्छेत्पुरुषः श्रेयः प्राप्तुंसुखानिच ॥ १२८ ॥

हें भगवान् विष्णूचें सहस्रनाम व्यासांनीं रचिलें. ज्या मनुष्याला आपलें उभयलोकीं कल्याण करून घेण्याची इच्छा असेल त्यानें ह्याचा पाठ करावा.

॥ विश्वेश्वरमजंदेवंजगतः प्रभवाप्ययम् ॥
॥ भजंतिये पुष्कराक्षं नते यांतिपराभवम् ॥ १२९ ॥

परमेश्वराला जन्म नाहीं, ज्ञान हेंच केवळ त्याचें रूप होय. जगाचीउत्पत्ती आणि नाश त्यापासून होतात. त्याच्या सगुण रूपाचे नेत्र कमलासारखे आहेत. त्याचें भजन करणाऱ्या पुरुषांचा कोठेंही पराभव होत नाहीं.

अर्जुन उवाच- ॥ पद्मपत्रविशालाक्षपद्मनाभसुरोत्तम ॥
॥ भक्तानामनुरक्तानांत्राताभवजनार्दन ॥ १३० ॥

अर्जुन म्हणाला- कमलपत्राप्रमाणें विशालनेत्र, हे पद्मनाभ, हे देवश्रेष्ठ, हे लोकपीडा नाशक, तुझ्या ठायीं प्रेमकरणारे जे भक्तजन आहेत, त्यांचें तूं संरक्षण करणारा हो.

वास, व्रत, दान हीं विष्णूच्या निरोपें, गुरु अथवा विद्वान ब्राह्मण यांना विचारून करावें. आपण सुवासिनी असतांना ज्या ज्या वस्तुवर मनापासून प्रीति होती, ती ती वस्तु विद्वज्जन ब्राम्हणाला पतीच्या नांवानें अर्पण करावी. नेहमीं नेमधर्मानें राहून वाहनावर बसूं नये. व चोळी आणि कंकण न घालतां शुभ्रवस्त्र नेसावें. "आत्मा वै पुत्रनामा" असें वेदश्रुतिनीं ह्मटलें असून पती पासून त्याचा जन्म आहे, सबब त्याचे आज्ञेंत असावें. या प्रमाणें ज्या विधवास्त्रिया वर्तन ठेवतील त्यांना सहगमनाप्रमाणें पुण्यप्राप्त होऊन अंतीं पतीसह स्वर्गाप्रत पावतील.

## ॥ स्त्रियांसवर्ज्यगोष्टी ॥

॥ स्वयंनृतिर्गायनंच नृत्यगीतावलोकनं ॥ शृंगारःकामशास्त्रस्य श्रुतिःपरगृहेगतिः ॥१॥ अन्यगेहेनिवसतिर्जारिणी जारसंगतिः ॥ एकाकित्वेनशयनं तथैवगतिरध्वनि ॥२॥ प्रतिक्षणंचंचलतानीव्याअपसृतिस्तथा ॥ कच्छस्यमोचनंपश्चात्पुनर्नियमनंतथा ॥३॥ प्रकाश्यहृदयंबुध्या अंचलाच्छादनंतथा ॥ दृष्ट्वानरंहारवृद्धिःरहस्यमितरेणच ॥४॥ बहुहास्यंबहुवचो गोष्ठीहसनपूर्विका ॥ तथैवपुरुषंदृष्ट्वापोनःपुन्येनदर्शनं ॥५॥ नचदुर्भगयानार्यासखित्वंकुरुतेतुसा ॥ भर्तृविद्वेषिणीनारीं नसंभा

षेतकर्हिचित् ॥६॥ नैकाकिनीक्वचिद्भूयान्ननग्नास्नातिवैक्वचित् ॥ नोलूखलेन
मुसले वर्द्धिन्यांचदृषद्यपि ॥७॥ नयंत्रकेनदेहल्यां मंथिनोपविशेत्क्वचित् ॥ गुरू
णांसन्निधौचापिनोच्चैर्ब्रूयान्नवाहसेत् ॥८॥ यान्यंकामदृशापश्येत् भवेत्सोपरिलो-
चना ॥ वंचयित्वा पूरुषंयाऽतिभोक्त्रीग्रामसूकरी ॥९॥ जननंतदपित्यक्त्वाविष्टा
शिपक्षियोनिगा ॥ स्वंपुरीषंभक्षयंती वृक्षाग्रमवलंबते ॥१०॥ उत्तीरयंती कोपेन क्रू-
रोक्तिः पतिसंमुखे ॥ मुकीभूत्वा भवेत्साहि सप्तजन्मदरिद्रिणी ॥११॥ नारीकृत दुरा
चारा घोरंदास्यंत्यसत्फलं ॥ जनाः शृणुततत्सर्वं एकाग्रमनसाचिरं ॥१२॥ द्विविंशति
पूरुषांश्चस्वर्गस्थान् कुलयोर्द्वयोः ॥ गृहीत्वानरकंयाति दुराचाररताह्रिया ॥१३॥ यावं
तिरोमाण्यंगेषु तिष्ठंतिसकलानिच ॥ तावतीर्वर्षकोटीश्चनिपचेन्नरकालये ॥१४॥

॥अर्थ॥

स्त्रियांनीं स्वतः नाचणें आणि गाणें करूंनये, आणि पाहूंहीनये. तसेंच शृंगार आणि कामशास्त्राच्या गो
ष्टी ऐकूंनयेत. दुसऱ्याचे घरीं उगीच जाऊंनये आणि वस्ती करूंनये. जार म्हणजे वाईट मार्गाचे पुरुष
आणि स्त्रिया यांची संगती धरूंनये. एकटेपणीं प्रवास आणि एकटेपणीं शय्या करूंनये. क्षणोक्षणीं

लुगड्याच्या मिऱ्या सावरणें आणि काष्टा घालणें व फेडणें, तसेंच दुसऱ्यास हृदय दाखवून पदरसावरणें आणि आपला हार वगैरे उगीच हालविणें इ. कृत्यें करूं नये. परक्याशीं एकांतविचार करूं नये. फार हसूं नये; फार बोलूं नये. दुरभगा म्हणजे वाईट भाग्याच्या स्त्रीशीं मैत्री करूं नये. तसेंच नवऱ्याचा द्वेष करणाऱ्या स्त्रीशींतर भाषण करूं नये; एकटें राहूं नये. नग्न होऊन स्नान करूं नये. उखळ, मुसळ विळी, दगड, यंत्र, उंबरा व रवी यांजवर कधीं बसूं नये. तसेच सासू सासऱ्या सन्नि ध मोठ्यानें भाषण व हास्य करूं नये. ज्या स्त्रिया परपुरुषाला कामेच्छेनें पाहतात त्या मरणानंतर वर डोळी होतात. आणि ज्या आपल्या पतीशीं अंतर करून खातात त्यांना पुढें डुकरीचा जन्म प्राप्त होतो व त्यानंतर वटवाघुळीचा जन्म प्राप्त होऊन आपली आपण विष्ठा भक्षून वृक्षावर लोंबत राहतात. ज्या पतीशीं निष्ठूरतेनें बोलतात आणि क्रुद्धपणानें उत्तर देतात त्या पुढें मुक्या उपजतात, आणि जन्म दरिद्री राहतात. ज्या स्त्रिया व्यभिचारादि दुराचरण करितात त्यांचीं उभय कुळें — माहेर आणि सासरकडील — बेचाळीस कुळें स्वर्गी असलीं तरी च्यूत होऊन नरकांत पडतात. आणि अंगावर जितके केश आहेत तितकीं कोटी वर्षें नरकांत राहतात. यासाठीं स्त्रियांनीं हें अत्यंत घोर पातक स्वप्नीं सुद्धां आणूं नये.

॥ स्त्रियांची संतोषावश्यकता आणि त्यांच्याशीं पुरुषाचें वर्तन ॥

रूया
॥५॥

चार

॥ यत्र नार्यस्तु पूज्यंते रमंते तत्र देवताः ॥
॥ यत्रैतास्तु न पूज्यंते सर्वास्तत्राफलाः क्रियाः ॥ १॥ (मनु)

जेथें स्त्रियांचा सन्मान राखिला जातो तेथें देवता सर्वकाल प्रसन्न असतात. जेथें स्त्रियांचा मान राखिला जात नाहीं तेथें यज्ञयाग देवांची पूजा इत्यादि सर्व सत्कृत्यें निष्फल होतात.

॥ शोचंति जामयो यत्र विनश्यत्याशु तत्कुलम् ॥
॥ न शोचंति तु यत्रैता वर्द्धते तद्धि सर्वदा ॥ २॥

आपल्या कुळांतल्या किंवा सपींडींतल्या पत्नी, भावजया, कन्या, सुना इत्यादि स्त्रिया ज्या कुळांत दुःखादिकांनें शोकयुक्त होतात तें कूळ सत्वर दरिद्री व पीडित होतें आणि जेथें स्त्रिया दुःखित होत नाहींत तें कुळ द्रव्यादि संपत्तीनें निरंतर संपन्न होतें.

॥ जामयो यानि गेहानि शपंत्य प्रतिपूजिताः ॥
॥ तानि कृत्याहतानीव विनश्यंति समंततः ॥ ३॥
॥ तस्मादेताः सदा पूज्या भूषणाच्छादनाशनैः ॥
॥ भूतिकामैर्नरैर्नित्यं सत्कारेषूत्सवेषु च ॥ ४॥

॥५॥

पत्नी, भार्तृजाया, सून, कन्या इत्यादि स्त्रियांना सन्मान न मिळाल्याकारणानें त्यात्या गृहासशाप देतात. तेणें करून त्या गृहांतील धन, पशु, संतती यांचा नाश होतो. या करितां आपलें कल्याणइच्छिणाऱ्या पुरुषांनीं स्त्रियांस निरंतर, आलंकार, वस्त्र, मिष्टान्न देऊन संतुष्ट राखावें.

॥ धनेन वासना प्रेम्णा श्रद्धयामृत भाषणै : ॥

॥ सततं तोषयेद्दारा नाप्रियंक्वचिदाचरेत् ॥

स्त्रीला पतीनें धन आणि वस्त्रें द्यावीं. तिजवर प्रेम आणि विश्वास ठेवावा. तिच्याशीं सर्वदां मधुरच भाषण करावें. तिला नेहमीं संतुष्ट ठेवावें, आणि तिला अप्रिय वाटण्या सारखें आचरण कदापि करूंनये.

॥ यत्रानुकूल्यंदंपत्योस्त्रिवर्गस्तत्रवर्धते ॥

॥ रक्षेत्कन्यांपिताविन्नांपतिः पुत्रास्तु वार्धके ॥१॥ (याज्ञवल्य)

जेथें स्त्री पुरुषांचे परस्पर अनुकूलत्व असेल तेथें धर्म अर्थ काम हे तीन पुरुषार्थ वाढतात. स्त्रियांचे विवाहापूर्वी पित्यानें, तारुण्यांत पतीनें, आणि वृद्धपणीं पुत्रानें रक्षण करावें.

॥ स्त्रीषु प्रीति विशेषेण स्त्रीष्वपत्यं प्रतिष्ठितं ॥

स्त्र्या ॥६॥

॥ धर्मार्थौस्त्रीषु लक्ष्मीश्चस्त्रीषु लोकाः प्रतिष्ठिताः ॥
॥ मूलं हि रत्यपत्याना स्मृतं नार्येपरं नृणां ॥
॥ तासां दुखोपशमनं कर्तव्यं सर्व दानरैः ॥

पतीनें आपल्या स्त्रीवर विशेष प्रीति ठेवावी. कारण त्यास आपत्य आणि धर्मार्थाची प्राप्ती स्त्रीपासूनच होते. यासाठीं सर्व काळ स्त्रियाचे दुःखानें निवारण करीत असावें.

॥ परस्त्र्यालिंगितायेन श्वाभवेच्छतजन्मसु ॥
॥ ततःसर्पोभवेत्पापं भुक्ते दुष्टः सुनिश्चितं ॥१॥
॥ योनिंपद्यपन्नन्यनाऱ्या आंध्यंगछेद्भवांतरे ॥
॥ बंधुभार्यायोभिगच्छेत् गर्दभः संभवेन्नरः ॥२॥
॥ त्यक्त्वाजनुश्चतदपिसर्पत्वं प्रतिपद्यते ॥
॥ पुनर्नरकमागछेन्नानाकष्टसमन्वितः ॥३॥
॥ मित्रभार्यारतोयश्च मातुलानीरतस्तथा ॥
॥ श्वयोनिं प्रतिपद्येतपराधीनश्चसर्वदा ॥४॥

चार ॥६॥

॥ अन्यस्त्रीणामाननानि नपश्येच्च कदाचन ॥

॥ कुबुध्यायोनिरीक्षेत्तच्चक्षूरोगी भवेदिह ॥ ५ ॥

जो पुरुष परस्त्रीशीं रत होतो त्यास शंभर जन्म कुत्र्याचे प्राप्त होऊन पश्चात् सर्पयोनी निःसंशय प्राप्त होते. प्रतनिश्चयानें पावतो. तसेंच जो परयोनी दृष्टीनें पाहतो तो अंध जन्मतो आणि बंधुभार्येशीं रत होतो तो गर्धभाचा जन्म पावून नंतर सर्प योनी प्रत पावतो. आणि पुनः नरकांत जाऊन नानाकष्ट भोगतो. मित्राची स्त्री आणि मातुलस्त्री यांच्याशीं जो रत होतो तोही कुत्र्याच्या जन्माला जातो. परस्त्रीचें वदन सुद्धा जो कुबुद्धीनें पाहील तो पुढें चक्षुरोगी होईल. यासाठीं पुरुषानें अवश्यकरून अशा गोष्टी वर्ज ठेवाव्या.

## ॥ श्वशुरादिकांचें स्नुषेशीं वर्तन ॥

॥ नवस्नुषाया भाग्येन लक्ष्मीरायाति मंदिरं ॥

॥ संकल्पेनाप्यलभ्यास्यादुद्धारः कुलयोर्द्वयोः ॥ १ ॥

॥ श्वशुरौ तां स्नुषां साध्वीं मन्ये याता सुतं यथा ॥

॥ श्वश्रूगृहनिवासं यानमन्येदटवीपदं ॥ २ ॥

॥ बालबुद्धिरितिक्षंत्वा प्रीणीयात्पुत्रयोषितं ॥
॥ प्रमादउपदेष्टव्या नशपेत्तांकदाचन ॥ ३॥
॥ श्वश्र्वादयोयदिजना निंदेयुस्तांसतींक्वचित् ॥
॥ तदश्रुबिंदवस्तर्हिस्वकुलक्षय कारिणः ॥४॥

नवीन स्नुषा ( सून ) घरीं येण्यानें लक्ष्मीची प्राप्ती होऊन अनेक लाभ होतात. आणि तिच्या योगें दोन्ही कुळांचा उद्धार होतो. सासू आणि सासरा यांनीं आपल्या सुनेस केवळ आपल्या पोटच्या मुलाप्रमाणें वागवावें; आणि तिला श्वशुरगृह ( सासरीं राहणें ) हें वनवास आहे असें वाटूं देऊं नये, म्हणजे सोख्यांत ठेवावें. तसेंच तिच्याकडून कांहीं अपराध झाल्यास ती बालबुद्धि ( अज्ञान ) समजून तिचेवर क्षमा करावी. आणि तिला शिव्यादेणें, रागें भरणें वगैरे नकरितां उपदेश म्हणजे सोयीनें समजून सागावें. ज्या कुळांत सासु, सासरा, नणदा वगैरे माणसें सुनेला निंदितील व गांजतील आणि त्या योगानें तिच्या नेत्रांतून आश्रु पडतील तर ते आश्रु त्या कुळाचा क्षय होण्यास कारण होतील.

## ॥ अथ तुलसीमहात्म्यं ॥

॥ वृंदावनंतुलस्याश्चगृहेयस्यसपुण्यवान् ॥ नंतापूजयितातस्याविष्णुलो-
केमहीयते ॥१॥ श्रीकृष्णंपूजयेत्तस्यामंजर्यादलकर्णकः ॥ वृंदावनस्थितांमृ-
त्स्नांकपालेधारयेन्नरः ॥२॥ विधूतपापास्तेसर्वेप्राप्नुयुर्ममसेवनं ॥ तुलसी
भूरुहंसिंचेत्पयसायस्तुमानवः ॥३॥ धूपैर्दीपैःफलैःपुष्पैःनैवेद्यैःपूजये-
न्नरः ॥ तत्काष्ठस्मरणींकृत्वारामनामजपंतिये ॥४॥ गोमयेनोपलिप्येत तु-
लसीसन्निधस्थलं ॥ नीराजनामाज्यदीपैः कुर्युस्तेधनभोगिनः ॥५॥ अधो-
गतिंसदागच्छेत्तुलसीनिंदकःपुमान् ॥ वृंदावनंचतांछिद्यात्कुंभीपाकंसगच्छ
ति ॥६॥ एवंश्रुत्वागतिंपुंसांहरिमूचेअथोद्धवः ॥ स्त्रीणांगतिंसमाचक्ष्वतु-
लसीपूजनादिना ॥७॥ एवंप्रोक्तःसभगवानादिदेवोजनार्दनः ॥ आख्यानंतु-
लसीदेव्या उक्तवान्पापनाशनं ॥८॥ तुलसीपूजनंनार्यःकुर्वतेसततंचयाः॥
सौभाग्यंपुत्रपौत्रांश्चलभंतेताअखंडितं ॥९॥ त्यजंतितुलसीपूजामालस्या
द्बलायदि ॥ भाविजन्मनिसौभाग्यंनप्राप्स्यंतिसुनिश्चितं ॥१०॥ उद्धर्तुंपात
किनरानानीतातुलसीमया ॥ मृत्युलोकेततःस्त्रीभिःसदापूज्याप्रयत्नतः॥११॥

तुलसीमटवीवृक्षंकथयंतिनराधमाः ॥ ममैवसामूर्त्तिरितिसदाध्येयंमनीषि-
भिः ॥१२॥ तस्या अहंबालकः साममभातापतिव्रता ॥ अर्चयेत्तुलसींदेवीं प्र-
भाते गंधमाल्यतः ॥१३॥ प्रदक्षिणां तुलस्यायाः कुर्वंतिचदिनेदिने ॥ सो भा-
ग्यमपरिछेद्यंपतिलोकंव्रजंतिहि ॥१४॥ विवाहं तुलसीदेव्या ममकुर्वंति भक्ति-
तः ॥ इहलोके सुखं भुक्त्वा अंतेमां प्राप्नुयु र्ध्रुवं ॥१५॥ गंधर्वाप्सरसो यक्षा
देवादेवर्षयो मलाः ॥ ब्रम्हाशिवस्तथाहंवै तुलसीसन्निधौस्थिता॥१६॥ इत्युद्धवा
यकथितमाख्यानं येपठंतिच॥ शृणुयुर्वापि भक्त्यायेमुच्यंतेतेनसंशयः॥१७॥
॥इतितुलसी महात्म्यंसमाप्तं ॥

## ॥ अर्थ ॥

भगवान श्री कृष्ण उद्धवास सांगतात :– ज्याचे घरीं तुलसीवृंदावन आहे, तो भाग्यवान पुरुष होय. तुलसीला नमस्कार आणि पूजन करणारास अंतीं विष्णु लोकांची प्राप्ती होते. तुलसीच्या मंजरी-नें जे विष्णूची पूजा करितात, अथवा आपल्या कर्णावर तुलसीपत्र ठेवितात तसेंच वृंदावनांतील मृत्तिका कपाळीं लावितात ते सर्व पुरुष सर्वपातकापासून मुक्त होऊन माझे भक्त होतात.

तुळशीच्या झाडास जे पाणी घालतात, आणि धूप, दीप, फल, पुष्प, नैवेद्य येणें करून तुळशीची पूजा करितात, तसेंच तुळसीच्या काष्ठाची माला करून रामनाम जपतात व शेणानें तुळसीजवळची जागा सारवितात, आणि नित्य तुपाचा दिवा लावून तुळसीजवळ ठेवितात ते द्रव्यवान होतात. आतां जे पुरुष तुळसीची निंदा करितात ते अधोगतीला जातात. तसेंच वृंदावन अगर तुळसीच्या झाडाचा जे छेद करितात त्यांस अंतीं कुंभीपाकाची प्राप्ती होते. या प्रमाणें पुरुषाविषयीं भगवान श्रीकृष्णाचें वाक्य उद्धवानें श्रवण करून - उद्धव म्हणाले - स्त्रियांनीं तुळसीची पूजा वगैरे केली असतां कोणती गती प्राप्त होते तें सांगा. तेव्हां श्रीकृष्णभगवान म्हणाले - ज्या स्त्रिया तुळसीची निरंतरपूजा करितात त्या अक्षय्य सौभाग्य आणि पुत्रपौत्रांते पावतात. ज्या स्त्रिया आळसानें वगैरे तुळशीची पूजा करीत नाहींत त्या पुढील जन्मीं विधवा होतात. भगवान म्हणतात - लोकांचा उद्धार होण्याकरितां मी वैकुंठाहून तुळशी इहलोकीं आणली आहे. या साठीं स्त्रियांनीं निरंतर तुळशीची पूजा करावी. तुळस अरण्यांतील एक झाड आहे असें जे म्हणतील ते अधम होत. तुळस ही प्रत्यक्ष मीच (विष्णु) आहें असें निश्चयानें समजावें. जी स्त्री नित्यशः प्रातःकाळीं गंधपुष्पादिकांनीं तुळसीची पूजा करिते ती - भगवान म्हणतात माझी आई व मी तिचा मुलगा होय. ज्या स्त्रि

या प्रतिदिवशीं तुलसीस प्रदक्षिणा घालितात त्या इहलोकीं अखंड सौभाग्य पावून अंतीं पति-
लोकास जातात. जे माझा ( विष्णू ) तुलसीसह वर्तमान विवाह लावितात ते इहलोकीं यथेच्छ
सौख्य भोगून अंतीं मजप्रत - सायुज्यमुक्ति - पावतात. गंधर्व, अप्सरा, यक्ष, देव आणि ऋषी, ब्र-
म्हदेव, शंकर, व मी या सर्वांचा तुळशीजवळ वास आहे. याप्रमाणें श्रीकृष्ण भगवान यांनीं उद्धवा-
स सांगितलेलें तुलसी महात्म्य जे कोणी भक्तियुक्त श्रवण व पठण करतील ते निःसंशय मोक्षाप्र-
त पावतील.

## ॥ अथ श्रीतुलसीपूजाप्रारभ्यते ॥

**"नित्यं तूष्णीं स्नानमाचरेत्। स्नानानंतरं धौतं वासः कञ्चुकींच परिधाय॥ गतभर्तृकाभिः स्त्रीभिः केवलं शुभ्राम्बरं परिधाय गृहकृत्याऽविरोधेन पुराणोक्त-विधिना तुलसीपूजा कर्तव्या"** ( स्त्रियांनीं मौनपणें स्नान करावें. आणि त्यानंतर धुतलेलें वस्त्र ( सौभाग्यस्त्रियांनी - लुगडें चोळी ) नेसावें. विधवा स्त्रियांनीं केवळ शुभ्रवस्त्र नेसावें. घरांती-ल नित्यकाम संभाळून पुराणोक्त मंत्रानें तुलसीचें पूजन करावें. **आचमनम्** ( सुवासिनी स्त्रियां-नीं आचमनाचे अभावीं नेत्रांस पाणी लावावें. ) **केशवायनमः। नारायणायनमः। माधवा**

यनमः। गोविंदायनमः (इति करं प्रक्षाल्य) हातांला पाणी लावावें. विष्णवेनमः(इ-
ति नेत्रयोरुदकस्पर्शनम्॥) डोळयांला पाणी लावावें. श्रीमन्महागणाधिपतयेनमः॥
श्री लक्ष्मी नारायणाभ्यांनमः॥ श्रीउमामहेश्वराभ्यांनमः॥ वाणीहिरण्यगर्भाभ्यां
नमः॥ शचीपुरन्दराभ्यांनमः॥ कुलदेवताभ्योनमः॥ ग्रामदेवताभ्योनमः॥ स्था
नदेवताभ्योनमः॥ वास्तुदेवताभ्योनमः॥ मातापितृचरणकमलेभ्यो नमः॥पति
चरणारविन्दाभ्यांनमः॥ सर्वेभ्योदेवेभ्यो नमः॥ सर्वेभ्यो ब्राम्हणेभ्यो नमोनमः॥
निर्विघ्नमस्तु। पुण्यंपुण्याहंदीर्घमायुरस्तु॥ सुमुखश्चैकदन्तश्च कपिलोगजक-
र्णकः। लम्बोदरश्चविकटोविघ्ननाशो गणाधिपः। धूम्रकेतुर्गणाध्यक्षो भालच-
न्द्रोगजाननः। द्वादशैतानि नामानि यः पठेच्छृणुयादपि। विद्यारम्भेविवाहेच प्र-
वेशे निर्गमे तथा॥ संग्रामे संकटेचैव विघ्नस्तस्य नजायते। शुक्लाम्बरधरं देवं
शशिवर्णं चतुर्भुजम्। प्रसन्नवदनं ध्यायेत्सर्वविघ्नोपशान्तये। अभीप्सितार्थसि
द्ध्यर्थं पूजितोयः सुरासुरैः। सर्वविघ्नंहरेत्तस्मै श्रीगणाधिपतये नमः॥ सर्वमङ्गल
माङ्गल्ये शिवेसर्वार्थसाधिके। शरण्ये त्र्यंबकेगौरि नारायणि नमोस्तुते॥ सर्वदा

सर्वकार्येषुनास्तितेषाममङ्गलम्। येषां हृदिस्थो भगवान् मङ्गलायतनं हरिः।
तदेवलग्नं सुदिनं तदेव ताराबलं चन्द्रबलंतदेव। विद्याबलं दैवबलं तदेव लक्ष्मी
पते तेऽङ्घ्रियुगंस्मरामि । लाभस्तेषांजयस्तेषां कुतस्तेषां पराजयः। येषामिन्दी
वरश्यामो हृदयस्थोजनार्दनः ॥ विनायकं गुरुं भानुं ब्रह्माविष्णुमहेश्वरान् । सर-
स्वतीं प्रणौम्यादौ सर्वकार्यार्थसिद्धये । यत्रयोगेश्वरःकृष्णो यत्रपार्थो धनुर्धरः।
तत्रश्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ सर्वेष्वारम्भकार्येषु त्रयस्त्रिभुवनेश्वराः
। देवादिशन्तुनःसिद्धिं ब्रम्हेशानजनार्दनाः ॥ संकल्पः – विष्णवेनमः विष्णुर्विष्णु
र्विष्णुः श्रीमद्भगवतो महापुरुषस्य विष्णोराज्ञया प्रवर्त्तमानस्य अद्य ब्रम्हणः द्विती
यपरार्धे श्रीश्वेतवाराहकल्पे वैवस्वतमन्वन्तरे अष्टाविंशतितमे कलियुगे कलिप्रथम
चरणे भरतवर्षे भरतखंडे जम्बूद्वीपे दंडकारण्ये देशे बौद्धावतरे रामक्षेत्रे रामाश्रमे
अस्मिन् वर्तमाने विष्णुनाम संवत्सरे विष्णवयने विष्णवृतौ विष्णुमासे विष्णुपक्षे विष्णु
तिथौ विष्णुवासरे विष्णुनक्षत्रे विष्णुस्थिते वर्तमाने चंद्रे विष्णुस्थिते श्री सूर्ये विष्णु
स्थिते देवगुरौ शेषेषु ग्रहेषु यथायथं राशिस्थानस्थितेषु सत्सु एवं गुणविशेषण

विशिष्ठायां शुभपुण्यतिथौ ममात्मनः पुराणोक्त फलप्राप्त्यर्थं तथाच मम भर्त्रा स-
ह अखण्डितसुखसौभाग्यसन्तत्यायुरारोग्यैश्वर्याभिवृद्ध्यर्थं श्री तुलसी देवता प्री-
त्यर्थं वृन्दावने तुलसी पूजनमहं करिष्ये ॥ कलशपूजनम्॥ गङ्गेचैयमुनेचैव गोदा-
वरि सरस्वति । नर्मदेसिन्धुकावेरीजलेऽस्मिन्सन्निधिं कुरु ॥ कलशस्थवरुणदेव
तायैनमः सकल पूजापरिपूर्णार्थे गन्धाक्षत पुष्पाणि समर्पयामि नमस्करोमि अस्मि-
न्कलशेसर्वाणितीर्थानि अवाहयामि स्थापयामि कल्पयामि नमस्करोमि॥ पूजाद्रव्य
प्रोक्षणम्- अपवित्रःपवित्रोवा सर्वावस्थां गतोऽपिवा । यःस्मरेत्पुंडरीकाक्षं सबा
ह्याऽभ्यन्तरः शुचिः ॥ (असा मंत्र म्हणत फुलानें कलशांतील पाणी घेऊन सर्व पूजाद्रव्यावर
व त्याच प्रमाणें आपल्या शरीरावर प्रोक्षण करावें ) घण्टापूजनम्- आगमार्थंतु देवानां गमना
र्थंतु रक्षसाम् । कुरुघंटे महानादं देवतार्चनसन्निधौ ॥ घंटास्थगरुड देवतायैनमः
सकलपूजार्थे गंधाक्षत पुष्पाणि समर्पयामि ॥ नमस्करोमि॥ दीपपूजनम्-दीपस्त्वं
ब्रह्मरूपोऽसि ज्योतिषां प्रभुरव्ययः । सौभाग्यंदेहि पुत्रांश्च सर्वान्कामांश्चदेहिमे।
दीपदेवताभ्योनमः स० पूजा० गन्धा० सम० नम०॥ श्रीतुलसी ध्यानम्॥ ध्यायेच्च

तुलसीं देवीं श्यामां कमललोचनाम् । प्रसन्नां पद्मवदनां वराभयचतुर्भुजाम् । किरीटहारकेयूरकुण्डलादिविभूषणाम् । धवलाङ्कुशसंयुक्तां पद्मासननिषेविताम् । प्रियांच सर्वदा विष्णोः सर्वदेव नमस्कृताम् ॥ श्रीतुलस्यैनमः ध्यायामि ॥ आवाहनम् ॥ देवि त्रैलोक्यजननि सर्व लोकैकपावनि । आगच्छ वरदे मातः प्रसीद तुलसि प्रिये । श्रीतुलस्यैनमः आवाहयामि ॥ आसनम्- सर्वदेवमयेदेवि सर्वदाविष्णुवल्लभे । देविस्वर्णमयं दिव्यं गृहाणासनमव्यये ॥ श्री तुलस्यै नमः असनार्थे अक्षतान्स० ॥ पाद्यम्- सर्वदेवा यथा स्वर्गे तथात्वं भुवि सर्वदा । दत्तं पाद्यं गृहाणेदं तुलसित्वं प्रसीदमे ॥ श्रीतुलस्यैनमः पाद्यं स० ॥ अर्घ्यम्- गन्धपुष्पसमायुक्तं सर्वेषां प्रीतिदायकं अर्घ्यं गृहाण त्वं देवि दैत्यान्तकरणप्रिये ॥ श्रीतुलस्यैनमः अर्घ्यं स०॥ मलापकर्षणस्नानम्- गङ्गागोदावरी कृष्णा पयोष्णया चापगास्तथा । आयान्तुताः सदा देव्यस्तुलसीस्नान कर्मणि ॥ श्रीतुलस्यैनमः मलापकर्षणस्नानं स०॥पञ्चामृतस्नानम्- पञ्चामृतं मयानीतं पयोदधि घृतं मधु । सह शर्करया देविस्नानार्थं प्रतिगृह्यताम् ॥ श्रीतुलस्यैनमः पञ्चामृतस्नानं स०॥ पञ्चामृतस्नानान्ते शु-

द्धोदकस्नानं स० ।शुद्धोदकस्नानान्ते आचमनं स० । सकलपूजापरिपूर्णार्थे गन्धा
क्षत पुष्पाणि स० ॥ ( निर्माल्य काढून पुनः गंधाक्षतपुष्प वाहून नंतर अभिषेक करावा )
अभिषेकः - कृष्णासरस्वतीकाली तुङ्गभद्रा शचीतथा । भागीरथी पार्वती च रमा
नारायणी कृपी । सुभद्रा द्रौपदीसाध्वी मातांचैवाप्यरुन्धती । सावित्री कालिका
ऽहिल्या स्नापयिष्यन्तु सर्वदा । आभिः कृताभिषेका त्वं ददासि गुरु सौभगम् । अतः
स्त्वां स्नापयिष्यामि तुलसि विष्णुवल्लभे ॥ शान्तिः शान्तिः सुशान्तिर्भवतु ॥ अमृ
ताभिषेकोऽस्तु ॥ श्री तुलस्यैनमः अभिषेकं स० । अभिषेकान्ते आचमनं स० ॥ व-
स्त्रम् - क्षीरोदमथनोद्भुते चंद्रलक्ष्मीसहोदरे । गृह्यतां परिधानार्थमिदं क्षौमाम्बरं
शुभे ॥ श्रीतुलस्यैनमः वस्त्रं स० ॥ कञ्चुकीमुपवस्त्रंच - कञ्चुकीमुपवस्त्रंच नाना
रत्नैः समन्वितम् । गृहाणत्वं मयादत्तं तुलसीभयहारिणि ॥ श्रीतुलस्यैनमः कञ्चुकी
वस्त्रंच स० ( वस्त्राभावे अक्षतान्समर्प्य ) चन्दनम् - श्रीखंडचंदनंदिव्यं गंधाढ्यंसु
मनोहरम् ॥ विलेपनंसुरश्रेष्ठे चंदनं प्रतिगृह्यतां ॥ श्रीतुलस्यैनमः चन्दनं सम० ॥ कुङ्कुम-
म् - केशराऽगुरुसंयुक्तं चन्दनादि समन्वितम् । कस्तूरीकासमायुक्तं कुङ्कुमं प्रतिगृह्य

ताम् ॥ श्री तुलस्यैनमः कुङ्कुमं स० ॥ अक्षतान्– अक्षतांश्च महादेवि तुलसि सौ-
ख्यदायिके। अर्पयामि सदा भक्त्या सुखसन्ततिलब्धये । श्रीतुलस्यै नमः अक्षतान्
सम० ॥ सौभाग्यद्रव्यम् –हरिद्रां कुङ्कुमं चैव सिन्दूरं कज्जलान्वितम् । मयानिवेदि-
तं भक्त्या गृहाण परमेश्वरि । श्री तुलस्यैनमः सौभाग्यद्रव्यं स० ॥ पुष्पाणि – माल्यादी-
नि सुगन्धीनि मालत्यादीनि सत्तमे । मयाहृतानि पूजार्थं पुष्पाणि प्रतिगृह्यताम् ॥ श्री
तुलस्यैनमः पुष्पाणि स० ॥ धूपम् – वनस्पतिरसोद्भूतो गन्धाढ्यो गन्धउत्तमः । आ-
घ्रेयः सर्व देवानां धूपोयं प्रतिगृह्यताम् ॥ श्री तुलस्यैनमः धूपं स० ॥ नीराजनम् – वै-
श्वानरप्रज्वलितं घृतकार्पासनिर्मितम् । दीपं भक्त्या गृहाणेमं त्रैलोक्य ध्वान्तनाशिके
। श्री तुलस्यै नमः नीराजनं दर्शयामि ॥ नैवेद्यम् – अन्नंचतुर्विधंस्वादु रसैःषड्भिः स-
मन्वितम् । नैवेद्यार्थेऽर्पयामि त्वां तुलसी माधवप्रिये । प्राणायनमः । अपानायनमः
। व्यानायनमः । समानायनमः । उदानायनमः । (या मंत्रानें नैवेद्य दाखवावा) श्रीतुलस्यै
नमः नैवेद्यं स० नैवेद्यांते आचमनं स० ॥ मध्येपानीयं उत्तरापोशनं हस्तप्रक्षालनं मु-
खप्रक्षालनं करोद्वर्तनार्थे चन्दनम् स० ॥ (स्त्रियांनीही आपल्या भोजनापूर्वी तुलसीला आप-

ल्या वाढलेल्या पात्राचा नैवेद्य दाखववावा. व पूजासमयीं दूध, साखर इ. पदार्थांचा नैवेद्य दाखववावा.)

फलम्- इदं फलं मया देवि स्थापितं पुरतस्तव । तेनमे सकलावाप्तिर्भवेज्जन्मनि जन्मनि । श्रीतुलस्यैनमः फलं स.॥ ताम्बूलम्- पूगीफलं महद्दिव्यं नागवल्लीदलैर्युतम् । कर्पूरैलासमायुक्तं ताम्बूलं प्रतिगृह्यताम् । श्रीतुलस्यैनमः ताम्बूलंसमर्पयामि ॥ दक्षिणा- हिरण्यगर्भगर्भस्थं हेमबीजं विभावसोः । अनंतपुण्यफलदमतः शान्तिं प्रयच्छमे । श्रीतुलस्यैनमः दक्षिणां स. ॥ आर्तिक्यम्- जयदेवीजयदेवी जय माये तुळसी ॥ निजपत्राहुनि लघुतर त्रिभुवन हें तुळसी ज. ॥ध्रु.॥ ब्रम्हा केवळ मूळामध्यें तो शौरी ॥ अग्रीं शंकर तीर्थें शाखापरिवारीं ॥ सेवा करिती भावें सकळहि नरनारी ॥ दर्शनमात्रें पापें हरती निर्धारीं ॥ जय. ॥१॥ शीतळछाया भूतळ व्यापक तूं कैसी ॥ मंजरिची आवड बहु कमळारमणासी ॥ तव दलविरहित विष्णू राहे उपवासी ॥ विशेष महिमा तूझा शुभकार्तिकमासीं ॥ जय. ॥२॥ अच्युत माधव केशव पीतांबरधारी ॥ तूझे पूजन कालीं जो हें उच्चारी ॥ त्यासि संतति संपति देसी सुखकारी ॥ गोसावी सुत विनवी मजला तूं तारी ॥जय.॥३॥ श्रीतुलस्यैनमः मंगलार्ति-

क्यं स० ॥ कर्पूरारार्तिक्यम्- नीराजयामि सततं हरिवल्लभे वै कर्पूरवर्तिभिरलं सुखदायिके त्वाम् । पादौ भजाम्यविरतं तव देवि माये वंशाय सौख्यमपि देहि बलं च पूर्णम् । श्री तुलस्यैनमः कर्पूरारार्तिक्यं स० ॥ मंत्रपुष्पाञ्जलिम्- विष्णुप्रिय करे देवि तुलसि सुखदायिके। पुष्पाञ्जलिं प्रयच्छामि पतेरायुष्यवर्द्धिके । श्रीतुलस्यैनमः मंत्रपुष्पाञ्जलिं स० ॥ प्रदक्षिणा- यानि कानि च पापानि जन्मान्तरकृतानि च । तानि सर्वाणि नश्यन्ति प्रदक्षिणपदे पदे ॥ ( प्रदक्षिणेचा मंत्रः- नमस्ते गार्हपत्याय नमस्ते दक्षिणाग्नये । नम आहवनीयाय तुलस्यै ते नमोनमः॥ असा मंत्र म्हणत तुळसीस यथाशक्ति प्रदक्षिणा घालाव्या. प्रदक्षिणेच्या वेळीं सौभाग्यवती स्त्रियांनीं स्फटिकाची माळ व विधवा स्त्रियांनीं तुळशीकाष्ठाची माळ घ्यावी.) श्री तुलस्यैनमः प्रदक्षिणां स० ॥ विशेषार्घ्यः- गन्धप्रसूनसंयुक्तं फलमुद्राविशोभितम् । अर्घ्यं ददामि तुलसि तव प्रीत्यै नमोनमः। श्री तुलस्यैनमः विशेषार्घ्यं स० ॥ प्रार्थना- सौभाग्यं सन्ततिं देवि धनं धान्यं च मे सदा । आरोग्यं शोकशमनं कुरु मे माधवप्रिये । अभीष्टफलसिद्धिं च सदा देहि हरिप्रिये । देवैस्त्वं निर्मिता पूर्वमर्चितासि मुनीश्वरैः । अतो मां सर्वदा भक्त्या कृपादृष्ट्या

विलोकय । पतेरायुष्य भाग्यं च सदा देहि हरिप्रिये । पूतना भयसन्त्रासा द्रक्षितश्च यथाहरिः । तथा संसार सन्त्रासाद्रक्षमे वंशसुत्तमम् ॥ श्री तुलस्यै नमः प्रार्थनां स० ॥ अर्पणम् - अनेन मया यथाशक्त्या यथामीलितोपचारद्रव्यैः कृतेन पूजनेन श्रीतुलसी देवता प्रीयतां नमम ॥ इति तुलसीनित्यपूजा प्रयोगः ॥ येणें प्रमाणें पूजन झाल्यानंतर पुढील स्तोत्र पठण करावें. तुलसी श्री महालक्ष्मीर्विद्याविद्या यशस्विनी ॥ धर्म्या धर्मानादेवी देवदेवमनःप्रिया ॥ लक्ष्मीःप्रियसखीदेवी द्यौर्भूमिरचलाचला ॥ षोडशैतानि नामानि तुलस्याः कीर्तयेन्नरः ॥ लभते सुतरां भक्तिमंते विष्णुपदं भवेत् ॥ येणें प्रमाणें स्तोत्र पठण केल्यानंतर ब्रह्मवैवर्त महापुराणांत सांगितलें आहे कीं, सावित्र्याच कृतं पूर्वं ब्रह्मणे चापि नित्यशः ॥ पार्वत्याच कृतं भक्त्या कैलासे शंकरायच ॥१॥ मुनीनांच सुराणांच पत्नीभिस्तु कृतं पुरा ॥ पतिव्रतांना सर्वासां स्तोत्रमेतच्छुभावहं ॥२॥ पूर्वी सावित्रीनें आपला पति ब्रह्मदेव, आणि पार्वतीनें शंकर तसेंच ऋषी व देव यांच्या स्त्रियांनीं आपल्या पतीस नित्यशः केलेलें फलदायक तुलसीचे स्तोत्रानंतर स्त्रियांनीं आपल्या पती प्रत अंतःकरणाचे ठिकाणीं सप्रेमभक्तियुक्त पठण करावें. तें असेः-

## ॥ पतिस्तोत्र ॥

॥ नमः कांताय भर्त्रेच शिरश्चंद्र स्वरूपिणे ॥ नमः शांताय दांताय सर्वदेवाश्र-यायच ॥१॥ नमो ब्रह्मस्वरूपाय सतीप्राणपराय च ॥ नमस्याय च पूज्याय हृदाधाराय तेनमः ॥२॥ पंचप्राणाधिदेवाय चक्षुषस्तारकाय च ॥ ज्ञानाधाराय पत्नीनां परमानंदरूपिणे ॥३॥ पतिर्ब्रम्हा पतिर्विष्णुः पतिरेव महेश्वरः ॥ पतिश्च निर्गुणाधार ब्रम्हरूप नमोस्तुते ॥४॥ क्षमस्व भगवन् दोषं ज्ञानाज्ञानकृतं च यत् ॥ पत्नीबंधो दयासिंधो दासीदोषं क्षमस्व मे ॥५॥ पतिव्रताच स्तुत्वा च तीर्थस्नान फलंलभेत् ॥ फलंच सर्व तपसां व्रतानां च व्रजेश्वर ॥६॥ इदं स्तुत्वा नमस्कृत्वा भुंक्ते सा तदनुज्ञया ॥ एष पतिव्रताधर्म एष धर्मः सनातनः ॥७॥ असें हें स्तोत्र पठण करून पतीस मानसाचे गई नमस्कार करावा. आणि पश्चात पति आज्ञेनें भोजन करावें असा हा स्त्रियांचा सनातन म्हणजे अनादी उत्तम सद्धर्म होय. ॥७॥ ॥७॥

## ॥ स्त्रियासाठीं चातुर्मास्य आणि नित्य नैमित्तिक व्रतां विषयीं ॥

धर्मशास्त्र आणि व्रतादि ग्रंथाधारें व्रताविषयीं विवेचन अगदीं स्पष्ट समजण्यासाठीं सरळभाषे-

नें केलें आहे. या साठीं व्रतादि नियमाकरितां वारंवार याविषयाचें अवलोकन करून त्या प्रमाणें यत्नपूर्वक करण्याचें करावें. स्त्रियांस बहुधा व्रतांची खरी माहिती थोडी असते, परंतु एकीचें पाहून दुसरी करूं लागते. मग त्यांतील तथ्य हेतु कांहीं असो. अशानें त्या व्रतांपासून स्त्रियांचा ऐहिककिंवा पारलौकिक फायदा नसून उलट नुकसानीस तीं कारणीभूत होतात, तसें न व्हावें हाच मुख्य उद्देश धरून या ठिकाणीं व्रतांविषयीं विवेचन केलें आहे.

स्त्रियांस व्रताचें स्वरूपज्ञान नसल्या कारणानें पाहिजे तसें शास्त्रविरुद्ध आचरण करितात. त्या योगानें त्याव्रताचें फल बरोबर होत नाहीं. यास्तव स्त्रियांस व्रतनियमादिकांचें स्वरूपज्ञान म्हणजे मुख्य प्रधान धर्म समजलें पाहिजेत. ते समजून आचरण केले असतां फल बरोबर होईल. व्रताचे प्रयोग वगैरे विद्वान ब्राम्हणांपासून अन्य ग्रंथावरून समजून घ्यावें आणि आचरण करावें. ब्राह्मण द्वाराच स्त्रियांनीं श्रवण करून आचरण केलें पाहिजे. पुराणोक्त मंत्र स्वतः वाचून करण्याचा अधिकार स्त्रियांस नाहीं. केलें तर पुण्य न लागतां पाप लागतें; असें भारतांत व विष्णुसहस्त्रनाम भाष्यांत सांगितलें आहे. यास्तव गीता, विष्णुसहस्त्रनाम इत्यादि पठण न करितां श्रवणेंकरूनच पुण्य आहे. व ज्याव्रतांगपूजेस जे पुराणोक्त मंत्र उक्त असतील ते मात्र म्हणून पूजा करावी.

एकभुक्त, नक्त, अयाचित् उपवास, व्रत आणि दान हीं सहा प्रकारचीं दैवकर्में सांगितलीं आहेत. दोनप्रहरीं दिवसास एकवार एकच अन्न म्हणजे तांदूळ किंवा गहूं इत्यादि धान्यांतून एकच धान्याचें अन्न करून भोजन करणें, यास एक भुक्त म्हणतात. रात्रीं प्रदोषकालीं भोजन करणें, त्यास नक्त असें म्हणतात. मागितल्या वांचून त्या दिवशीं जें मिळेल त्याचें भोजन करणें त्यास अयाचित् म्हणतात. अहोरात्र भोजन न करणें त्यास उपवास म्हणतात. देवतेचें पूजन, जागरण इत्यादिक कर्मविशेष त्यास व्रत असें म्हणतात. आपलें कांहीं एक द्रव्य दुसऱ्यास देणें म्हणजे त्यावरची आपली मालकी सोडून दुसऱ्याची सत्ता उत्पन्न होणें त्यास दान असें म्हणतात. आतां ही एकभुक्तादि सहाही कोठें कोठें व्रतादिकांच्या अंगत्वें करून सांगितलीं आहेत. व कोठें एकादश्यादि उपवास न होईल तर त्या ठिकाणीं कांहीं सांगितलीं आहेत. कोठें स्वतंत्रही हीं व्रतें सांगितलीं आहेत.

**याव्रतास कालाचा सामान्यनिर्णयः-** दिनमान जाणून दिवसाचे पांच भाग सारखे करून तिशी दिनमानीनें सहा घटकेचा एक काल अशा क्रमानें प्रातःकाल, संगव, मध्यान्, अपराण्ह, व सायान्ह असे पांच काल सांगितले आहेत. त्यामध्यें एकभुक्त व्रतास मध्यान्काल व्यापिनी तिथी घ्यावी, त्यांतही सोळा घटके पासून अठरा घटके पर्यंत मुख्य भोजनाचा काल समजावा. त्याच्या पुढें सायंकाल प-

र्यंत गौणकाल जाणावा. आतां या व्रतास तिथीचा ऱ्हास किंवा वृद्धी यांच्या योगानें होणारा सूक्ष्म नि-
र्णय विद्वान लोकांपासून जाणून घेऊन भोजन करावें.

**नक्तभोजन—** सूर्यास्तानंतर सहा घटका रात्रपर्यंत प्रदोषव्यापिनी तिथी घ्यावी, त्यांत तीन घट-
का रात्रींचा त्यागकरून पुढें तीन घटकेंत भोजनकरावें. पहिल्या तीन घटकेंत देवता पूजन व तिच्या
नाममंत्राचा जप करावा, त्या काळास संध्याकाळ असें शास्त्रांत सांगितलें आहे. त्या संध्याकाळीं, भो-
जन, निद्रा, मैथुन अध्ययन इत्यादि गोष्टी वर्ज कराव्या. असें सांगितलें आहे, म्हणून भोजन करूं न-
ये. असें असून सूर्यास्तानंतर तीन घटकेंत सर्व दिवस उपोषण करून ज्या स्त्रिया भोजन करितात तो
अधर्म होय. पुत्ररहित ज्या विधवा स्त्रिया त्यांनीं सायंकाळीं तीन घटका दिवसास नक्तव्रताचें
भोजन करावें, त्यांस रात्रीं भोजन निषेध आहे. असेंच सूर्य देवतेचें नक्त सायंकाळीं तीन घटका दि-
वसासच सर्व सुवासिनी, विधवा इत्यादिक स्त्रियांमध्यें जी सूर्यनक्त करणारी स्त्री असेल तिनें भोजन
करावें. या व्रततिथीचा निर्णय विद्वानापासून समजून घ्यावा. एकादश्यादि उपवासाचे ठायीं त्या स्थानीं
जें एकभुक्त किंवा नक्त करावयाचें तें उपवासास निर्णय केलेला जो दिवस तोच घ्यावा. अयाचित्
उपवासा सारिखा त्या तिथीचा निर्णय जाणावा. एकभुक्त, अयाचित् उपवास यांचें ज्या तिथीस मु-

रव्य व्रत केलें असेल त्याचे दुसरे दिवशीं ती तीथ संपल्यानंतर पारणें करावें. जर ती तीन प्रह
रावर दिवसास असेल तर प्रातःकाळीं पारणें करावें. या प्रमाणेंच सर्वत्र जाणावें, असें धर्मसिंधूंत
सांगितलें आहे.

**व्रताचेसामान्यनियम-** स्त्रियांना दोन दिवसांपेक्षां ज्यास्ती उपोषण करण्याचा अधिकार नाहीं.
स्त्रियांस पतीच्या आज्ञेवांचून व्रत उपवासादिक करण्यास अधिकार नाहीं. उपवासाचे दिवशीं दंतधा-
वन करूंनये. करणें झालें तर आंबा, पिंपरी, जांबूळ, या वृक्षाच्या पानानीं करावें. तीं न मिळतील तर
बारा चुळी भरून टाकाव्या, म्हणजे दंतधावन होतें. व्रताचे दिवशीं प्रातःस्नान करून तांब्याचें पात्र
जळानें पूर्ण भरून हातांत घेऊन उत्तरेकडे मुख करून संकल्पपूर्वक उपवासादि व्रतनियम करण्या
चें उदक सोडावें. पहिल्यानें आरंभ करण्याचें व्रत व पूर्वी करीत असलेले व्रतांचें उद्यापन, अधिक मास,
गुरू शुक्राचे अस्त, वैधृति, व्यतिपातादि, दुष्ट योग, विष्टि करण, शुक्रवार, अमावास्यादि तिथी
उदयकाळीं असून अस्तकाळीं नसते, त्या तिथीस व्रतारंभ किंवा उद्यापन करूंनये असें सत्यव्रत ऋषी
चें मत आहे.

पुढें सांगितलेल्या सर्व व्रतांचे ठायीं धर्म आचरण करावा:- क्षमा म्हणजे दुसऱ्यानें अपराध केला

असतां सहन करणें, सत्यभाषण बोलणें; दया म्हणजे प्राणीमात्रांवर उपकार करणें; दान म्हणजे-प्राप्त असेल त्यांतून अन्नादिक पदार्थ दुसऱ्यास देणें; शौच्य म्हणजे मृत्तिका जलें करून बाह्य शुद्धि; रागद्वेषादि रहित अंतःकरणशुद्धि, इंद्रियनिग्रह, म्हणजे विषयांकडे इंद्रियें जाऊं न देणें, देवपूजा, म्हणजे व्रत देवतेचें पूजन करणें; हवन म्हणजे ज्या व्रतास उक्त जो होम असेल, तो ब्राह्मण द्वारा करणें; संतोष म्हणजे प्राप्त होईल त्यांत संतोष मानणें; अस्तेय म्हणजे दुसऱ्याचें द्रव्य हरण करण्याची इच्छाही न करणें, ज्या देवतेचें व्रत उपोषण त्या देवतेचा मंत्रजप, तिचें ध्यान, तिची कथा श्रवण करणें, तिचें पूजन, तिचें नामकीर्तन, नामश्रवणादि हे प्रकार अगत्य करावे. उपवासाच्या दिवशीं अन्नाचें प्रेमपूर्वक अवलोकन, त्याचे गंधादिक अवघ्राण, अभ्यंगस्नान, तांबूल, भक्षण, चंदनाची उटी हे सर्व वर्ज करावें.

सुवासिनी स्त्रियांस सौभाग्यव्रताचेठायीं अभ्यंग तांबुलादि वर्ज नाहींत. उदक, कंद, मूल, फळ, दूध, हविर्भाग, ब्राह्मण इच्छा, गुरूचें वचन, आणि औषध हीं आठ सेवन केलीं असतां व्रत नाश करीत नाहींत. सावध रीतीनें असून व्रतभंग झाला असतां सुवासिनी, स्त्रियांनीं तीन दिवस उपोषण करून विधवा स्त्रियांनीं क्षौरकर्म करून पुनः व्रत करावें. उपवास करण्यास कोणतीही स्त्री

अशक्त असेल तर उपवासाचे गर्यी एक ब्राम्हणभोजन किंवा एक ब्राम्हण भोजनापुरतें अन्न दान याप्रमाणें तीन दिवस करावें. व्रत स्वीकार केल्यानंतर तें व्रत करण्यास अशक्तता प्राप्त झाली तर पुत्र, पति किंवा उपाध्याय यांचे हातून तें व्रत करवावें. तें पुत्रादिकांनीं केलें असतां पुत्रादिकांस पुण्य प्राप्त होतें. उपोषणाचे दिवशीं वारंवार उदक प्राशन, एकवारही ताम्बूलभक्षण, दिवसास निद्रा आणि मैथुन हीं केलीं असतां उपवास नष्ट होतो. प्राण व्याकुळ होईल तर बहुतवेळ उदकपान केलें असतां दोष नाहीं. गाईवाचून दूध, मसुरा, धान्य, इडलिंबु, कांतडयांतलें पाणी शिंपीचा चुना, हे पदार्थ आमीषगण व्रताचे गर्यी टाकावें; आश्रुपात, क्रोध, इत्यादिकांनीं व्रतनाश होतो, यास्तव त्याचा त्याग करावा. परान्न भोजन, उडीद, चणें, चवळया, इत्यादिक धान्य, मुळा, लवण, मद्यमांसादिपदार्थ शूद्रस्त्रीनेंही वर्ज करावें. सावे, देवभात, गहूं, तीळ, मूग हे पदार्थ व्रताचे दिवशीं उपयोगांत आणले असतां चालतात.

तांदूळ, यव, मूग, तीळ, कांग, वाटाणें, देवभात, सावे, गहूं हीं धान्यें हाविष्याचीं जाणावीं. पांढरे मुळे, सुरण, केळी, चंदन बटवा, चाकवत, आलें, काकडी, आंबा फणस, नारळ, सुपारी, चिंच, जिरे, सुंठ, रान आवळी, आवळे, हिरडा, पिंपळी, सैंधव, समुद्राचें मीठ, साखर, गाईचें दूध,

दही, ताक, तूप, आणि म्हशीचें तूप मात्र हविष्यांत घ्यावें. तेल व त्यांत तळलेले पदार्थ घेऊं नये. इतके पदार्थ हविष्याविषयीं धर्मसिंधु व पुरुषोत्तममहात्म्य यांत सांगितले आहेत. हविष्यान्न भोजन केलें असतां मनुष्यास उपोषणासारखें पुण्य लागतें. उपोषण केलें असतां त्याच्या सांगतेस ब्राम्हणभोजन घालावें. ज्या व्रतास उद्यापन सांगितलें नसेल त्या व्रतास गोप्रदान किंवा सुवर्णदान यथाशक्ति द्यावें. ब्राम्हणवाक्यें करून व्रतसांगता होते असें समजावें.

कधींही व्रत घेऊन टाकूं नये, टाकिलें असतां चांडाळासारखी अपवित्रता येते. विधवा स्त्रियांनीं व्रतपूजा इत्यादिकांचे वर्षीं चित्रविचित्र व लाल असें वस्त्र नेसूं नये, पांढरेंच नेसावें. स्त्रियांनीं व्रत घेतल्यानंतर सूतक, सुवेर, रजस्वला इत्यादिक अपत्ति आली असतांही शरीराचे नियम स्वतः करावें. पूजादिक नियम ब्राह्मणद्वारा करावें. सूतकादिकामध्यें नवीन व्रतास आरंभ होत नाहीं. कामनिक व्रताचे वर्षीं आरंभ केल्यावर सूतकादिक आलें असतां पुत्र किंवा ब्राह्मणद्वारें पूजा इत्यादि करावी. दोन व्रतें एक काळामध्यें प्राप्त झालीं असतां दान, होम इत्यादि अविरुद्ध कर्में क्रमानें करावी नक्त भोजन, उपवास, इत्यादि जीं विरुद्ध कर्में आहेत, त्यां पैकीं आपण स्वतः एक करून बाकीचीं पुत्रादिकां कडून करवावीं. आठ वर्षांपासून ऐंशी वर्षांपर्यंत एकादशी व्रत करण्याचा अधिकार आहे.-

सामर्थ्य असेल तर पुढें ही करावें. सभर्तृक स्त्रियांनीं पतीच्या आज्ञेवांचून किंवा पति सन्निध नसेल तर पितापुत्रादिकांचे आज्ञेवांचून एकादशी करून व्रत आचरण करूंनये, केलें असतां व्रत व्यर्थ होऊन पतीच्या आयुष्याचा नाश होतो. व त्या स्त्रीला नर्कपात होतो, यास्तव पति इत्यादिकांस विचारून व्रत करावें. व्रत, उपोषण करण्यास अशक्त स्त्री असेल तर त्या उपोषणस्थानीं नक्तभोजन, हविष्यान्न, धान्यफराळ, फलाहार, केवळ तिळभक्षण, दुग्धपान, उदकपान, घृतपान, पंचगव्यप्राशन हीं नक्तभोजनापासून एकापेक्षां एक अधिक पुण्यकारक आहेत, परंतु आपली शक्ति पाहून या प्रकारांतून एक प्रकारचा स्वीकार करून एकादशी करावी. परंतु कोणीही त्या एकादशीव्रताचा त्याग करूं नये. केलाअसतां चांद्रायण प्रायश्चित्तआहे. आणि विधवा स्त्रियांनीं स्मार्त, भागवत, दोन्हीही एकादशांचें उपोषण करावें. बालविधवा स्त्रियांनीं तर अवश्य दोन्ही उपोषणें करावींत. याप्रमाणें अन्य व्रतांचे उपोषणाविषयीं खरी अशक्तता असेल तर ह्या नक्तभोजन हविष्यान्न इत्यादिक वरलिहिलेल्या पक्षांतून एक पक्ष स्वीकारावा, आणि व्रत करावें व्रत टाकूंनये.

चैत्रशुद्ध तृतीयेच्या दिवशीं शिवयुक्त गौरीची पूजा करून आंदोलन व्रत एक महिनापर्यंत स्त्रियांनीं करावें. ही तृतिया दोन घटकांही चतुर्थीयुक्त वैधृत्यादि कुयोग असतांही करावी.

द्वितीयायुक्त तृतियेचा निषेध आहे. यास्तव तीच तृतिया घ्यावी. तृतीयेस श्रीरामचंद्राचा दोलोत्सव आरंभ करून मासपर्यंत पूजापूर्वक आंदोलन करावें. अन्य देवतेचाही दोलोत्सव करावा. श्रीरामनवमी, गोकुळ अष्टमी, नृसिंहजयंति ह्यांचे ठायीं सर्वांनीं उपोषण करावें. उपोषण न केलें तर पाप आहे. चैत्र शुद्ध ११ किंवा पौर्णिमा, मेषसंक्रांति, या तीन काळांतून एका काळीं वैशाख स्नानास आरंभ करावा. तें स्नान मासपर्यंत करावें. अशक्त मनुष्य असेल तर शुद्ध त्रयोदशी पासून वैशाखाची पौर्णिमेपर्यंत तीन दिवस तरी स्नान करावें. या व्रतास हविष्य भोजन ब्रम्हचर्यादि नियम करावें. वैशाखमासीं प्रातःस्नान करून पुष्कळ पाणी घेऊन अश्वत्थाला घालावें, आणि पूजा करून प्रदक्षिणा घालाव्या. असें केलें असतां अनेक कुळांचा उद्धार होतो, तसेंच या महिन्यांत गाईला खाजविलें असतांही मोठें पुण्य आहे. या महिन्यांत एकभुक्त, नक्तभोजन, आयाचित यांतून एकव्रत केलें असतां सर्व इच्छित हेतु तृप्त होतात. तसेंच या महिन्यांत उदकदान, देवावर गळती बांधणें, पंखा, छत्री, जोडा, चंदनादि सुगंध पदार्थ यांचें दान केलें असतां महा पुण्य प्राप्त होतें. ज्याकाळीं अधिकमास वैशाख येतो, त्या काळीं दोन महिने वैशाखस्नानादि नियम करावें. अक्षत तृतियेच्या दिवशीं गंगास्नान करून यवाचा होम, ब्राम्हणद्वारें यवाचें दान, यव भक्षण इत्यादि केलें असतां सर्व पापनाश होतो. त्या दिवशीं विष्णुमूर्तिप्रत

चंदनाची उटी दिली असतां विष्णुलोकाची प्राप्ती होतें.

कार्तिक शुद्ध नवमी, अक्षत् तृतिया, माघवद्य अमावास्या, भाद्रपद वद्य त्रयोदशी, या चार तिथी कृतयुगादिकांच्या क्रमानें आरंभीच्या तिथी आहेत, सबब ह्यांस युगादि तिथि म्हणतात. त्यांतून एक युगादि तिथीस जरी समुद्रस्नान केलें तरी पृथ्वी, किंवा ग्राम इत्यादिकांच्या दानाचें अनंत पुण्य प्राप्त होतें. वैशाखी पौर्णिमेच्या दिवशीं बारा उदकुंभ सुवर्ण तिलयुक्त दाने करून ब्रम्हहत्यादि पापापासून प्राणी मुक्त होतात. यथाशास्त्र त्याच दिवशीं हरणाचें कांतडें दान केलें असतां पृथ्वीदानाचें पुण्य प्राप्त होतें.

ज्येष्ठ शुद्ध ११ चे ठायीं कर्तव्य जें देवतेचे पूजनादिक त्याचें अंगत्वें करून आचमन होईल तेवढेंच करून त्यावांचून जलपानही न करतां उपोषण करावें. त्या निर्जळी एकादशीच्या उपवासानें बारा एकादशीचें पुण्य प्राप्त होतें. त्या एकादशी व्रताच्या अंगत्वें करून सुवर्ण शर्करासहित उदकुंभ दान करावें. ज्येष्ठी पौर्णिमेच्या दिवशीं तिलदानें करून अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होतें. त्याच दिवशीं जेष्ठा नक्षत्र असतां छत्री, जोडा, ह्यांच्या दानानें राज्य प्राप्त होतें.

याच पौर्णिमेच्या दिवशीं वटसावित्री व्रत आहे, तें असें कीं, त्रयोदशीस आरंभ करून पौर्णि

मेपर्यंत तीन दिवस उपोषण करावें, सामर्थ्य नसेल तर त्रयोदशीस नक्त, चतुरदशीस अयाचित् पौर्णिमेस उपोषण करावें. परंतु हे तीन दिवस पौर्णिमेच्या निर्णय शास्त्रावरून जसा ठरेल, त्याप्रमाणें त्रयोदश्यादि तीन दिवस व्रताचे धरावे. वृद्धि, सूतक, ज्वरादिपीडा, रजस्वला इत्यादिक आपत्ति स्त्रियांस आली असतां ब्राम्हणद्वारा पूजादि तीन दिवस करावी; स्वतः उपवास मात्र करावा. त्रयोदशीच्या दिवशीं दंतधावनपूर्वक नदी, तलाव इत्यादिकांचे ठायीं तिसरे प्रसरीं जाऊन तीळ, आवळकठी, एकत्र वाटून अंगास लावून केशादि शोधन करून स्नान करावें. शुचि वस्त्र धारण करून वटवृक्षाप्रत जाऊन आचमन करून संकल्पपूर्वक पुराणोक्त मंत्रांनें वटमुळाला पुष्कळ पाणी घालावें, विधिपूर्वक उपाध्याय सांगतील तशी पूजा करावी, आणि सुतानें वटवृक्षाला वेष्टण करावें; याप्रकारानें बाहेर वटवृक्षाची पूजा करून घरांत येऊन हरिद्रा, चंदन याच्या मिश्रणानें घरामध्यें वटवृक्षाचें चित्र काढून संकल्प पूर्वक ब्रम्हदेवासहवर्तमान सावित्री, सत्यवान, यांचें आवाहन पूजादि करून पुराणोक्त मंत्र म्हणून शास्त्रयुक्त नियम त्रयोदशीस घ्यावें. प्रतिपदेस चवथे दिवशीं चंद्रोदयीं चंद्राला अर्घ्य देऊन, सावित्रीची पूजा करून, हळदीनें रंगवून कंठसूत्र इत्यादिक सावित्रीस अर्पण करावें. सुवासिनी स्त्रियांस कंठसूत्रें, तीन दिवस अनुकूळ असेल तर देऊन हरिद्राकुंकुमादिकें करून त्यांची पूजा करावी. सावित्रीची

कथा व अन्य पतिव्रता स्त्रिया, अरुंधती प्रभृतीच्या कथा तीन दिवस श्रवण कराव्या. हें व्रत, सुवासिनी, अपुत्रवति, किंवा पुत्रवति विधवा या सर्व स्त्रियांनीं पतीची व पुत्र नातु इत्यादिकांचे आयुष्यवृद्धि जन्मोजन्मीं होण्याकरितां व स्वर्गसुख प्राप्ती करितां करावें. प्रतिपदेच्या चंद्रोदयीं ब्राह्मणभोजनानंतर आपण भोजन करावें. रजस्वलेचा तिसरा दिवस जरी पारण्याला पडला तरी रात्रीं भोजन करून पारणा करावी; अशा प्रसंगीं तिसरे दिवशीं रात्रीं भोजनाचा निषेध प्राप्त होत नाहीं. उद्यापन इत्यादि सर्व विस्तार व्रतराज ग्रंथांत पाहून करावें. हा प्रकार तरी स्त्रियांस व्रतधर्माचें कांहीं ज्ञान होण्याकरितां ह्याच ग्रंथांतील आधारानें संक्षिप्त रीतीनें दिला आहे.

ज्येष्ठमासीं ब्राह्मणा कारणें चंदनाची उटी, पंखे, उदकुंभ इत्यादिकांचें दान विष्णूच्या संतोषार्थ द्यावें. म्हणजे त्याच्या संतोषानें सर्व जगिक व पारमार्थिक सुख मिळेल. आषाढमासीं एकभुक्त व्रत केलें असतां, पुष्कळ धनधान्य व पुत्र ह्यांची प्राप्ति होते. जोडा, छत्री, मीठ, आवळकठी, हे पदार्थ या मासीं भगवान वामनाच्या प्रीतीकरितां दान द्यावें. स्त्रिया, शुद्र आणि मुंज झाल्या वांचून मुलें यांनीं शाळिग्राम किंवा बाण यास कधींही स्पर्श करूं नये. शिवल्यावांचून ढुरूनपूजा करावी. व सर्व देवतांच्या चर प्रतिमा आणि महादेवाचीं चार लिंगे यांची पूजा स्त्रीशुद्रादिकांनीं

शिवून पुराणोक्त मंत्रानें अथवा ज्या देवतेचें पूजन त्याच्या नाममंत्रानें केली असतां दोष नाहीं.

**संक्रांतीचे पर्वकाल**—मेषसंक्रांत लागण्यापूर्वी १५ घटका आणि मागून १५ घटका पर्वकाळ जाणावा. या संक्रांतीस दान मेषाचें द्यावें. वृषभ संक्रांतीचा पूर्ण पुण्यकाळ १६ घटिका; त्यास गोप्रदान द्यावें. मिथुन संक्रांती लागल्यावर १६ घटका पुण्यकाळ; त्यास वस्त्रदान सांगितलें आहे. कर्कसंक्रांती लागण्याच्या पूर्वी ३० घटका पुण्यकाल, त्यास दान घृत व धेनु. सिंह, लागल्यावर १६ घटका पुण्यकाल, त्याचें दान छत्र व सुवर्ण; कन्या संक्रांति लागल्यावर १६ घटिका पुण्यकाळ; दान घर व वस्त्र द्यावें. तुळ लागल्यावर १५ व पूर्वी १५ घ. पुण्यकाल; त्यास दान- तीळ, तूप, दूध, दही हें द्यावें. वृश्चिक संक्रांति लागण्याचे पूर्वी १६ घटिका पुण्यकाल; त्यास दीपदान द्यावें. धन संक्रांति लागल्यावर १६ घटका पुण्यकाल; त्यास दान वस्त्र, वाहन हें द्यावें. मकर संक्रांत लागल्यावर ४० घटका पुण्य काल, त्यास दान काष्ठ, अग्नि हें अग्नि प्रदिप्त करून देणें. कुंभ संक्रांत लागण्याचे पूर्वी १६ घटका पुण्यकाल; त्यास दान गाई, उदक, तृण हें द्यावें. मीन संक्रांत लागल्यावर १६ घटका पुण्यकाल; त्यास दान भूमि, पुष्पांच्या माळा. याशिवाय संक्रांतीस दुसरींही दानें द्यावींत. कर्क, मकर, मेष तुळ या चोहोंचे पूर्वी तीन दिवस उपोषण करून स्नानदानादि करावें. याचें पुण्य बहुत आहे.

पुत्रवतीनें मात्र करूं नये.

**चातुरमास्यामध्यें जीं व्रतें आरंभावयाची** त्या सर्व व्रतांस आरंभ करण्याचा काल **आषाढ शुद्ध ११, १२, १५** आणि **कर्कसंक्रांती** या चार कालांतून आपल्याला अनुकूल असेल त्या कालीं चातुरमास्य व्रतास आरंभ करावा. प्रातःकालीं स्नान करून नित्यनेम असेल तो करावा आणि विष्णूची पूजा करून त्याची प्रार्थना करावी व व्रत ग्रहण करावें. तो ग्रहण करण्याचा प्रकार **धर्मसिंधूं**त सांगितला आहे. मनुष्यानें **चातुरमास्यांत निदान एक व्रततरी करावें.** याच्या योगानें १२ वर्षांत घडलेल्या पापाचा नाश होतो, आणि दरवर्षी चातुरमास्यांत व्रत करून आयुष्य घालविलें असतां वैंकुठाची प्राप्ती होते.

पहिल्यानें आरंभ करणें असेल तर गुरुशुक्राचें अस्त, वृद्धि, सूतक इत्यादि प्रकार असतील तर होणार नाहीं, पूर्व वर्षी आरंभ झाला असून दुसऱ्या वर्षी अस्त अशौचादि असतां व्रतास आरंभ होतो. चातुरमास्य व्रतें शिवभक्तांनेंही करावीं. **आषाढ शुद्ध १० स व्रतास आरंभ करावा असा कोठें आधार सांपडत नाहीं.** या व्रताची समाप्ती कार्तिक शुद्ध ११ स, १२ स किंवा १५ स अगर तूळ संक्रांतीस म्हणजे आरंभ केला त्या प्रमाणें वरील दिवशीं करावी. चातुरमास्यांत जीं व्रतें व

जीं उद्यापनें करावयाचीं त्यांचा तपशील खालीं दिला आहे. हीं व्रतें सकाम केलीं असतां त्यांचीं फलें संसार संबंधांत प्राप्त होतील व असलीं व्रतें व्रतराजादि ग्रंथांत पाहून करावीं. निष्काम बुद्धीनें म्हणजे ईश्वरानें आपल्याला मनुष्यजन्म दिला आहे तर त्याची आज्ञा पालन करून त्याचा संतोष संपादन करावयाचा या बुद्धीनें हीं व्रतें केलीं असतां त्याच्या योगानें ईश्वरी प्रसाद होऊन चित्त शुद्धीनें ज्ञानद्वारें मोक्ष होतो. हीं व्रतें स्त्रियांनीं पति इत्यादिकांची आज्ञा घेऊन करावीं.

| चातुरमास्यव्रतें | उद्यापनें |
|---|---|
| नक्त भोजन | दोनवस्त्रें ब्राम्हणास द्यावीं. |
| धरणेंपारणें ( एक दिवस उपोषणव दुसरे दिवशीं पारणें या प्रमाणें ) चातुरमास्य करावें. हें व्रत तरुण विधवांनीं अवश्य करावें. | प्रत्यक्षगोप्रदान सामर्थ्य असेल तर द्यावें; नाहीं तर त्याचें निषक्रय मोल्य यथाशक्ति द्रव्य द्यावें. |
| भूमीवर वस्त्र टाकून निजणें | शय्यादान म्हणजे बिछाना द्यावा. |
| दिवसा तिसरे प्रहरीं भोजन करणें | सामर्थ्यानुरूप गोप्रदान |
| तांदुळ किंवा गहूं इ० धान्य सोडणें | सोडलेलें धान्य सुवर्णाचें करून द्यावें. |

| | |
|---|---|
| बारा दिवसांचीं कृच्छ्रव्रतें हीं चारमहिनें करावी. | दोन गाई द्याव्या. |
| भाजी खाऊन राहणें | गोप्रदान |
| दूध पिऊन राहणें | गोप्रदान |
| दूधखाण्याचें सोडणें | गोप्रदान |
| मध दही किंवा तूप खाण्याचें सोडणें | वस्त्र व गोप्रदान हीं द्यावींत. |
| ब्रम्हचर्य | यथाशक्ति सुवर्णदान |
| तांबूल वर्ज | दोनवस्त्रें द्यावीं. व तांबूलपात्र द्यावें. |
| चातुरमास्य मौन | घंटा, तुपाचा घट, दोनवस्त्रें हीं द्यावीं. |
| देव घरांत रांगोळी घालणें | गोप्रदान व सुवर्णाचें कमल दानदेणें. |
| दीपदान (नित्य दीपदेणें) | समई व दोनवस्त्रें द्यावीं |
| भूईवर भोजनकरणें | काशाचें पात्र व गोप्रदान |
| गाईला गोग्रास देणें | गाय बैल दानकरावीं. |
| नामस्मरण करीत देवब्राम्हणांस नमस्कार | वस्त्रदान |

| करून प्रतिदिवशीं १०८ प्रदक्षिणा घालणें सामर्थ्य नसल्यास २८ घालाव्या. | |
|---|---|
| अभ्यंगस्नान वर्ज करणें | तेलानें भरलेला घट द्यावा. |
| गूळ सोडणें | ताम्रपात्रांत गूळ घालून सुवर्ण सहित द्यावें |
| मीठ सोडणें | मिठानें भरलेलें ताम्रपात्र द्यावें |
| देवघर झाडून सारवून रांगोळी घालणें | यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालावें. |
| दूध दही तूप मध साखर या पंचामृतानें देवास स्नान घालणें | सुवर्णदान करावें |
| सुवर्णाचें कमल देवास वाहणें | सुवर्णदान, गोप्रदान करणें |
| गंधपुष्पादिकांनीं देवब्राम्हणाची पूजा करणें | गोप्रदान |
| देवास तुळस वाहणें | सोन्याची तुळस करून द्यावी. |
| गुग्गुळाचा धूप दाखविणें | धुपाटणें दान द्यावें |

| | |
|---|---|
| देवापुढें तुपाचा दिवा लावणें | निरांजन दान द्यावें |
| तांबुल दान देणें | दोन रक्त वस्त्रें व तांबूलपात्र दान द्यावीं |
| फलदान करणें | फलदान द्यावें |
| पुष्पदान करणें | सुवर्णाचें पुष्प करून देणें |
| एकादशी वांचून ब्राम्हणाला दहीभात भोजन अथवा दान करावें | सुवर्णदान |
| नित्य दान करणें ( सामर्थ्य नसल्यास ८।१५।१४।३० या तिथींस, दर रविवारीं व द्वादशीस द्यावें) | भूमिदान, गोप्रदान अनुकूल नसल्यास वस्त्र सुवर्ण सहित पादुका द्याव्या. |
| नित्य अलंकारयुक्त गोप्रदान | सुवर्णदान द्यावें |
| केळीच्या किंवा पळसाच्या पानावर जेवणें | दोन वस्त्रें व कास्यपात्र द्यावें |
| एकभुक्त असणें | यथाशक्ति ब्राम्हणभोजन करणें |
| पादाभ्यंग वर्ज करणें | यथाशक्ति ब्राम्हणभोजन करणें |
| पायस वर्ज | पायसदान करणें |

| एखादें फलवर्ज करणें | फलदान द्यावें. |
|---|---|
| उपवासव्रत | गोप्रदान व ब्राम्हणभोजन |
| अयाचित व्रत | सुवर्णदान |
| अपूप (अनारसा) सोडणें | सोन्याचे गहूं करून देणें |
| वांगें किंवा प्रियफळ सोडणें | रुप्याचीं फळें करून द्यावीं. |
| पाय गुढघे हात व मस्तक हीं चार अंगें जमिनीला लावून बायकांनीं रोज देवब्राम्हणास १०८ नमस्कार घालावे. | ब्राम्हणभोजन व सुवर्णदान |
| ब्राम्हणाचे घरीं दिवा लावणें | समई वस्त्र व यथाशक्ति सुवर्णदान द्यावें |
| विष्णूचें तीर्थ प्राशन करणें | सुवर्णदान |
| पुराण श्रवण करणें | सुवर्ण व वस्त्र सहित पुस्तकदान करणें |
| विष्णूच्या किंवा शंकराच्या नाममंत्राचा जप करणें | ज्या देवाचा जप केला असेल त्या देवाची सुवर्णाची मूर्ति करून द्यावी. |

| | |
|---|---|
| अश्वत्थ (पिंपळ) सेवा प्रदक्षिणादि करणें | सुवर्ण सहित वस्त्रदान करणें |
| देवापुढें गायन करणें | घंटा देवळांत बांधावी किंवा ब्राम्हणास द्यावी. |
| ब्राम्हणाचें तीर्थ घेणें | गोप्रदान सामर्थ्य नसल्यास दोन वस्त्रें द्यावीं. |
| आषाढ शुद्ध ११ पासून श्रावण शुद्ध ११ पर्यंत भाजी खाऊं नये ही भाजी दहा प्रकारची आहे. मूल, पत्र, करीर – म्हणजे वेळूचे अंकुर, अग्र (पल्लव फळ) कांड (कमलनालादि) अधिरूढ (वल्ली) त्वक (साली पुष्प) कवच (छत्राक) | श्रावण शु॥ १२ स भाजी दान द्यावें |
| श्रावण शु॥ ११ पासून भाद्रपद शुद्ध ११ पर्यंत दहीं खाऊं नये. | भाद्रपद शु॥ १२ स दहीं दान करावें |
| भाद्रपद शु॥ ११ पासून अश्वीन शु॥ ११ पर्यंत दूध व खीर खाऊं नये. | अश्वीन शु॥ १२ स दूध दान करावें |
| अश्वीन शु॥ ११ पासून कार्तिक शु॥ ११ | कार्तिक शु॥ १२ स डाळी दान कराव्या |

पर्यंत डाळी खाऊं नयेत. हें शाखाव्रत नित्य आहे. न केलें असतां पाप लागतें. (कित्येक या व्रतास मीठ सोडतात पण त्याला कोठें आधार सांपडत नाहीं)

| | |
|---|---|
| दूध, दही, मध, तूप, ह्यांतून एक सोडणें. | दोन वस्त्रें व गोप्रदान द्यावें. |
| चार मार्ग मिळतात तेथें दिवा लावणें | गो प्रदान |
| ब्राम्हण देवस्वरूप आहेत असें मनांत आणून नमस्कार करणें | ब्राम्हण भोजन |
| गायीची पूजा करणें | आलंकारयुक्त गाय द्यावी. |
| सूर्य किंवा गणपती यांस नमस्कार करणें | सूवर्णाची मूर्ति दान करावी. |
| यथाशक्ति रौप्य दान करणें | मधानें भरलेलें रुप्याचें पात्र द्यावें. |
| नित्य ताम्र दान करणें | गुळानें भरलेलें ताम्रपात्र द्यावें. |
| यथाशक्ति सुवर्णदान करणें | दोन वस्त्रें तिळासहित द्यावीं. |

| | |
|---|---|
| ब्राम्हणाची पूजा करून वस्त्रदान करणें | शय्या व जरीनें वस्त्र द्यावें. |
| धान्य दक्षिणासहित देणें | यथाशक्ति सुवर्णदान करावें. |
| गोपीचंदन देणें | वस्त्र व गोपीचंदन देणें |
| गूळ किंवा साखर | तांब्याच्या भांडयांत तो पदार्थ घालून वस्त्रानें ल-पेटून धान्यासह ८-७ निदान एकतरी द्यावें |
| भाजी दान करणें | दोनवस्त्रें द्यावीं. |
| पिंपळी, सुंठ मिरें दानकरणें | तो पदार्थसुवर्णाचा करून देणें |
| सुवासिनीस हरिद्रा देणें | हरिद्रासह सुवर्णदान द्यावें. |
| देवीशंकरप्रीत्यर्थ दंपत्य पूजन | पार्वतीशंकराची सुवर्णप्रतिमा दान करणें |
| परान्न भोजन वर्ज करणें | सुवर्णदान,ब्राम्हणभोजन |
| प्राजापत्यें व्रतें करावीं | गोप्रदान,ब्राम्हण भोजन |
| चांद्रायणव्रत | गोप्रदान ब्राम्हणभोजन |
| लक्षप्रदक्षिणा | (व्रतकौमुदी ग्रंथांत पहावें) |

| | |
|---|---|
| तीनदिवसउपवास चौथेदिवशीं पारणें या प्रमाणें चातुर्मास्य करणें | गोप्रदान ब्राम्हणभोजन |
| तिथिपाळण ( कोणत्या तिथीस काय सोडावें ) | गोप्रदान सुवर्णदान ब्राम्हणभोजन |

| | | | |
|---|---|---|---|
| १ प्रतिपदेस | कोहळा | ९ नवमीस | भोंपळा |
| २ द्वितीयेस | डोरलीं | १० दशमीस | पडवळ |
| ३ तृतीयेस | मीठ | ११ एकादशीस | पावटे |
| ४ चतुर्थीस | तीळ | १२ द्वादशीस | मसुरा |
| ५ पंचमीस | आंबट | १३ त्रयोदशीस | वांगे |
| ६ षष्ठीस | तेल | १४ चतुर्दशीस | मध |
| ७ सप्तमीस | आंवळे | १५ पौर्णिमेस | द्यूत |
| ८ अष्टमीस | नारळ | ३० अमावास्येस | मैथुन |

कोणताही जिन्नस दान करावयाचा तो दक्षिणेसहित दान केला पाहिजे.

चातुरमास्यांत अन्यनेम धरले तर त्याच्या समाप्तीस सुवर्ण किंवा गोप्रदान करावें.

पुरुषोत्तम ( अधिकमास ) मासामध्यें जीं व्रतें करावयाचीं तीं खालीं दिलीं आहेत

| | |
|---|---|
| हविष्यान्न भक्षणकरणें | ब्राम्हणभोजन करावें. |
| दीपदान करणें | ताम्रपात्र, सुवर्णाची वात त्यांत तूप घालून दीपदान करावें. |
| नक्त भोजन | ब्राम्हणभोजन |
| अयाचित | सुवर्णदान |
| फलें वर्ज | फलदान |
| तेल सोडणें | तूप द्यावें. |
| तूप सोडणें | दूध द्यावें |
| धान्य सोडणें | सोडलेलें धान्य देणें |
| धरणें पारणें | सुवर्ण व वस्त्र देणें |

चातुर्मास्यांत जीं व्रतें सांगितलीं आहेत तीं ही या अधिक मासांत केलीं तरी चालतात. या अधिक महिन्यांत कास्याच्या पात्रांत तूप व सुवर्णाची प्रतिमा ठेवून त्यासहित ३३ तेहतीस अपूप ( अनारसे ) ब्राम्ह-

णाची पूजा करून त्यास दान करावें. ज्या विधवा किंवा पतीनें त्याग केलेल्या सधवा स्त्रिया हीं व्रतें करण्यास समर्थ असतील त्यांनीं इंद्रियनिग्रहासाठीं धारणा पारणा, हविष्यान्न, कृच्छ्रादिक व्रतें अवश्य करावी. या कृच्छ्रादिकांचें लक्षण येणें प्रमाणें सांगितलें आहे.

**पादकृच्छ्र** – पहिल्यादिवशीं मध्यान्ह कालीं हविष्यान्न, एकभुक्त, सव्विस घास घेऊन ते मुखांत घालून अनायासें चावतां येतील अशा प्रमाणानें एकेक घास घ्यावा. दुसरे दिवशीं नक्त भोजन २५ ग्रास; तिसरे दिवशीं अयाचितानें भोजन २४ ग्रास, चवथ्या दिवशीं उपोषण. असें केलें म्हणजे पादकृच्छ्र होतें. याचे तीनवार केले म्हणजे प्राजापत्य कृच्छ्र होतें. यास बारा दिवस लागतात. दोन वार केले तर अर्ध कृच्छ्र होतें.

**चांद्रायण**– शुक्लपक्षाच्या प्रतिपदेस आरंभ करावा. त्या दिवशीं मोराच्या अंड्या येवढा एक घास घ्यावा. दुसरे दिवशीं दोन घास; या प्रमाणें रोज एकेक घास वाढवीत पौर्णिमेला १५ घास घ्यावें. क्षय झाला तर १४ घास, वृद्धि झाली तर १६ घास या प्रमाणें चढवून वद्यपक्षीं प्रतिपदेला एकेक ग्रास कमी करीत जाऊन अमावास्येला उपोषण करावें. यालाच चांद्रायण व्रत म्हणतात.

## ॥ श्रावण मासांतील सात वारांचीं व्रतें ॥

**आदितवार—** श्रावण मासांत शुक्लपक्षीं, पहिले रविवारीं, प्रातःकाळीं मौनपणानें उठून, शीतोदकानें स्नान करावें. आपलें नित्यकर्म म्हणजे पूजाजपादिक जें कांहीं असेल तें नित्य नियमाप्रमाणें करून, नंतर नागवेलीचे पानावर रक्तचंदनानें सूर्य मंडळासारखे वर्तुलाकार बारा वेढे काढून तें सूर्यमंडल करावें. त्या मंडलावर सूर्यस्त्री संज्ञा देवी सहित, सूर्याचें अवाहन करून, रक्तचंदनानें त्याची पूजा करावी; मांड्या मोडून भूमीला लावून त्या बाराही मंडलांवर रक्तचंदन, आरक्त अक्षता, आणि तांबडे जासवंदीचीं पुष्पें, असे ह्या पदार्थांनीं भक्तियुक्त बारा अर्घ्य द्यावें. आरक्त अक्षता, जासवंदीचीं लाल फुलें आणि दुसरे उपचारांनीं त्याची पूजा करून, खीरबेरें आणि खडीसाखर यांचा नैवेद्य दाखवावा. सूर्याचे १२ मंत्रांनीं १२ नमस्कार आणि प्रदक्षिणा घालून, त्याचे मंत्रांनीं त्याची स्तुती करावी. नंतर ६ पदरी सुताचा दोर करून, त्यास ६ गांठी द्याव्या, आणि तो दोर सूर्यास अर्पण करून नंतर आपले गळयांत बांधावा. ब्राह्मणास १२ फलांचें वायन द्यावें. ह्या प्रमाणें चारी किंवा कदाचित् पांच पडल्यास पांचही रविवारीं हें व्रत करावें. नंतर उद्यापन करावें. या प्रमाणें हें व्रत केलें असतां, निर्धनी धनवान होतो; अपुत्रिक पुत्रवा

न होतो; कुष्टरोगी असला तर त्याचें कुष्ट जातें, बंदींत पडला असला तर बंदमुक्त होतो; रोगी असला तर त्याचा रोग नाहींसा होतो व त्याचप्रमाणें इतर सर्व मनोरथ पूर्ण होतात असें या व्रताचें महात्म्य आहे.

**सोमवार-** श्रावणमासांत शुक्लपक्षीं पहिले सोमवारीं प्रातःकाळीं उठून, शिवाचें नामस्मरण करावें व मी नक्तव्रत (सायंकाळचे ३ घटिका दिवसांपासून ३ घटिका रात्रीपर्यंत ६ घटिका) करून शिवपूजन करीन असा निश्चय करावा, आणि तें व्रत ग्रहण करावें. नंतर स्नानकरून शुचिर्भुत होऊन पांढरें वस्त्र नेसावें. व पांढरे गंध, अक्षता, बिल्वपत्र, श्वेतपुष्पें यांही करून पार्वतीसहितशिवाची पूजाकरावी. या प्रमाणें पार्वतीसहित शंकराची पूजा करणारास पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं. हें पूजेचें फल झालें. नक्त भोजन केलें असतां सप्तजन्मीचे महापातकाचा नाश होतो. दिवसभर उपोषण करून, सायंकाळचे ३ घटिका दिवसापासून रात्रीचे ३ घटिका रात्रीपर्यंत शिवपूजन कथाश्रवण इत्यादिक करून नंतर भोजन करावें. हें सोमवाराचें व्रत केल्यानें ज्यास पुत्रप्राप्तीची इच्छा असेल, त्यास पुत्र होतो; धनप्राप्तीची इच्छा करणारास धनप्राप्त होतें; सारांश मनेप्सित कामना सर्व परिपूर्ण होतात असें प्रत्यक्ष शंकरानें पार्वतीस सांगितलें आहे. म्हणून सर्वांनीं हें व्रत करावें.

**मंगळागौर—** श्रावणमासांत शुक्लपक्षीं पहिले मंगळवारीं मंगळागौरीव्रत करावें. प्रातःकाळीं उठून स्नान करून संकल्प करावा. षोडशोपचारें मंगळागौरी देवीचें पूजन करावें. पिठाचे १६ दिवे करून, त्यांत तूप वाती घालून आरती ओवाळावी. देवीच्या पूजेस आघाडयाचीं पानें १६, दुर्वा १६, धतुरपर्णे १६, पुष्पें १६ असावीं. तांदूळ, जिरे हीं ही सोळा सोळा असावीं. (व्यवहारामध्यें १६ प्रकारच्या पत्र्या मुली मिळवीत असतात पण त्याला कोठें आधार सांपडत नाहीं.) बेलाचीं पानें पांच असावीं. अशा उपचारांनीं पूजा झाल्यावर मातुश्रीस व अन्य सुवासिनीस वायन द्यावें. ते दिवे अन्य सुवासिनी सहवर्तमान खावे. अन्नभक्षण करणें तें स्त्रीनें मिठावांचून करावें. भोजनकालीं मौन करावें. रात्रौ देवीपुढें जाग्रण करून दुसरे दिवशीं देवीचें विसर्जन करावें. असे चार मंगळवार पहिले वर्षी मातोश्रीच्या घरीं करावें. दुसरे वर्षापासून पतीच्या घरीं तें व्रत करावें. अशीं पांचवेंषे एकंदर होत आलीं म्हणजे पांचवें वर्षी उद्यापन करावें. हें व्रत आपल्या पतीच्या आयुष्याची वृद्धि करून अखंड सौभाग्य व पुत्र धनादिक देणारें आहे, असें समजून प्रत्येक सुवासिनीनें हें व्रत लग्न झाल्यापासून अवश्य करावें. या व्रताचा सविस्तर विस्तार व्रतराजांत सांगितला आहे तो पाहून त्या प्रमाणें करावें.

## ॥आरती श्री मंगळागौरीची ॥

जय माय मंगळागौरी ॥ तुजला पुजूं अंतरीं ॥ नानाविधिउपचारीं ॥ दीप वोवाळूं सुंदरी ॥ध्रु०॥ मंगळागौरी नाम तूझें ॥ तुला नमन असो माझें ॥ भवदुःखाचें हें ओझें ॥ देवि उतरावें सहजें ॥१॥ गजाननाची तूं माता ॥ शंकराची प्रियकांता ॥ हिमाचलाची तूं दुहिता ॥ मज तारी नारी आतां ॥२॥ लागे तुझ्या चरणाशीं ॥ जाळी पापाचिया राशी ॥ भक्ति ठसावी मानसीं ॥ अंबे न्यावें पायापाशीं ॥३॥ गौरी ओवाळिलें दीप ॥ नेणें तुझें नामरूप ॥ वाढवावें सौभाग्य अमूप ॥ विश्वाचि तूं मायबाप ॥४॥ रिकामी ही खटपट ॥ शुद्ध मार्गी लावी नीट ॥ परब्रह्मी घनदाट ॥ द्यावी नारायणी भेट ॥ जयमाय मंगळागौरी ॥५॥

**बुधबृहस्पतिव्रत** - श्रावणमास आला म्हणजे बुधवारीं आणि गुरुवारीं या दोन्ही दिवशीं बुध व बृहस्पती यांच्या मूर्ति लिहून पूजा करावी. स्थळभेदानें मूर्ति लिहिल्या असतां त्या प्रमाणें फळ मिळतें. पाळण्यावर लिहून पूजा केली असतां सर्वगुणसंपन्न, दीर्घायु पुत्र होईल. द्रव्याचे स्थानाजवळ लिहून पूजा केली असतां भांडारांत नेहमीं द्रव्य भरलेलें राहील. स्वयंपाक घ-

रांत पूजा केली असतां अन्नाची समृद्धि होऊन नेहमीं चांगलीं चांगलीं पक्वान्नें वगैरे आवडते पदार्थ खावयास मिळतील. देवघरांत पूजा केली असतां देवाची कृपा होईल. निजावयाचे खोलींत केली असतां सदोदीत स्त्रीपुरुषांची प्रीति सदोदीत कायम राहून एकमेकांचा वियोग होणार नाहीं. धान्याचे कोठारांत पूजा केली असतां सदोदीत धान्य भरलेलें राहील. या प्रमाणें ज्या ज्या स्थानीं पूजा करतील त्या त्या स्थानाची प्राप्ती व फलें मिळतील. या प्रमाणें सातवर्षें पाचेतों पूजा करून उद्यापन करावें. या दिवशीं मामा भाच्यांस जेऊं घातल्यांचें मोठें श्रेय आहे.

**शुक्रवारव्रत-** श्रावणमास आला म्हणजे भिंतीवर बालकांनीं युक्त अशा जिवंतीच्या मूर्ति लिहून, शुक्रवारीं प्रातःकाळीं न्हाऊन त्या जिवंतिकांची पुष्पमालादिकांनीं पूजा करावीं. गव्हाच्या पिठाचे पांच दिवे करून देवीची आरती करावी, व ते दिवे आपण खावे. आरती केल्यावर देवीवर अक्षता टाकून तिची प्रार्थना करावी. हे जिवती आई, हे कल्याणदायिके अंबे, माझ्या मुलाबाळांचें रक्षण कर. अशी करद्वय जोडून एकाग्रचित्तानें तिची प्रार्थना करून नमस्कार करावा, आणि नंतर तिची कथा श्रवण करावी. हें व्रत करीत असतां हिरवें लुगडें नेसूं नये; हिरवी चोळी घालूं नये, हिरव्या बांगडया भरूं नये; तांदुळाचें धुवण ओलांडूं नये; हिरव्या वेलाखालून जाऊं नये; व हिर-

घ्या कारल्याची भाजी खावूं नये. अनुकूल असल्यास दर श्रावणी शुक्रवारीं एक सुवासिन जेऊं घा-
लावी. ह्याप्रमाणें हें शुक्रवारचें व्रत केलें असतां अखंड सौभाग्य प्राप्त होऊन पुत्रपौत्रादिकां-
ची प्राप्ती होते; त्यांना कोणत्याही प्रकारची बाधा किंवा सटवी वगैरे क्रूरदेवतांची पीडा होत
नाहीं. असें हें व्रत सर्वांनीं व विशेषेंकरून पुत्रवंती स्त्रियांनीं अवश्य करावें.

॥ आरती श्री जिवंतिकेची ॥

जयमाय जिवतीमाते ॥ आरती ओवाळूं तूंते ॥ दीनदासा कृपावंते ॥ संकटीं र-
क्षीमाते ॥ ध्रु० ॥ विप्रस्त्रीचा पुत्र नेला ॥ नसमजे मातेला ॥ सुइनीनें घालाके-
ला ॥ राजस्त्रियेशीं दिधला ॥१॥ त्यायोगें दुःखफार ॥ विप्रस्त्री सुकुमार ॥ क-
री नेमतिव्रफार ॥ व्रत शुक्रवार ॥२॥ राजपुत्र विप्रसदनीं ॥ निजला असतां
समाधानी ॥ षष्ठीदेवी ओलांडोनी ॥ जातसे अंगावरुनी ॥ ३॥ प्रगटुनी तेवेळां
॥ त्वां जाऊं नदिलें तीला ॥ वाचविलें त्या बाळकाला ॥ नेतसे सटवीजाला ॥ ४ ॥
अवचिता एके दिनीं ॥ राजा वाटतां पाहुनी ॥ दुधधारा स्तनांतूनी ॥ वाहुलागे अं-
गावरुनी ॥५॥ राजियानें तें देखून ॥ पुसिलें मातेशीं कारण ॥ माता करी समाधान

हीच तुझी माता जाण ॥ ६॥ माता आनंदानें नेली ॥ सुरवासनीं बैसविली ॥ कृपा तूझी पूर्ण झाली ॥ माय मोक्षालागीं नेली ॥ जयमाय जिवती माते ॥ ७॥

**शनिवारव्रत-** श्रावण मासांत शनिवारीं तीन देवांची पूजा आहे. नृसिंहाची, शनीची व मारुतीची. हळद मिसळलेले चंदनानें लक्ष्मीसहित श्रीनृसिंहाची मूर्ति भिंतीवर किंवा रवा-बावर काढावी. निळे, पिंवळे आणि लाल फुलांनीं त्याची पूजा करावी. खिचडी आणि कुंजराच्या भाजीचा नैवेद्य दाखवावा. त्या दिवशीं कुंटुबांतील सर्व माणसांनीं तिळाचें तेल लावून स्नान करावें; आणि सुवासिनीब्राह्मणांसही घालावें. नृसिंहाला तेलांत तळलेले उडदाचे वडे फार प्रिय आहेत. श्री शनीदेवाला तिळाचे तेलाचा अभिषेक करावा, आणि त्याच्या प्रसन्नते करितां तिळाचें तेल, लोखंड, उडीद, काळा कांबळा यांतून जें सामर्थ्य असेल तें दान करावें. श्रीमारुतीस रुद्राभिषेक करावा. तैलमिश्रित सिंदूर लावावा. जास्वंदीच्या आणि रुईच्या फुलांच्या माळा घालाव्या. मारुतीस मांदारपुष्पांच्या व उडदाच्या वडयांच्या माळा अर्पण कराव्या. या प्रमाणें शनिवारचें व्रत करणाऱ्यांस अखंड लक्ष्मी प्राप्त होते; अपुत्रिकास पुत्र होतो; धनधान्याची समृद्धी होते; सर्वजगांत कीर्ति होते; व्रतकरणारास शनिदेवापासून कधींही पीडा व्हावयाची नाहीं; त्याचप्रमाणें बल, आरोग्य, इच्छी

प्राप्ती होते, आणि अंतीं वैकुंठपद प्राप्त होतें. असें हें इहपरत्रीं सुखदायक जें शनिवारचें व्रत तें सर्वांनीं अवश्य करावें.

**पिठोरीव्रत-** हें कल्याणदायकव्रत श्रावणवद्य ३० अमावास्येस करावें. भिंतीवर ६४ योगिनी, काढून त्यादिवशीं त्यांची यथासांगपूजा करावी. नंतर त्या देवींची आरती करून, आपलीं जितकीं मुलें असतील, त्या प्रत्येकाचा एकेक नैवेद्याचा भाग हातांत घेऊन 'अतीत कोण' म्हणून विचारावें, व त्या प्रत्येक मुलानें 'मी' असें उत्तर दिल्यावर तो भाग खालीं ठेवून दुसऱ्या मुलाचा भाग घ्यावा, व पूर्ववत् विचारावें. या प्रमाणें झाल्यावर ज्याचा जो भाग असेल तो त्याच मुलानें खावा. सुवासिनीब्राम्हण जेऊं घालून सुवासिनींस सौभाग्य वायन द्यावें. असें हें व्रत केलें असतां ६४ देवता प्रसन्न होऊन पुत्रपौत्र सौभाग्यादि अखंड सौख्याची प्राप्ती करून देतात व अंतीं व्रत करणारांना वैकुंठपदाची प्राप्ती होते. याकरितां पुत्रवती स्त्रियांनीं हें पिठोरीव्रत अवश्य करावें.

**हरितालिकाव्रत-** भाद्रपद शुद्ध ३ तृतियेचे दिवशीं हें हरितालिका व्रत करावें. हें व्रत स्त्री जातीस अगदीं अवश्य असून, त्या दिवशीं अगदीं लहान मुलींपासून तों म्हाताऱ्या स्त्रियांपावेतों सर्वांनीं उपोषण करावें. पार्वती सहित शंकराची पूजा करावी. ज्या ठिकाणीं पूजा करावयाची

तें ठिकाण केळीचे खांब व तोरण वगैरे लावून सुशोभित करावें. रांगोळी काढून, वाळुकामय महादेवाचें लिंग स्थापन करून सखी, पार्वती सहित महादेवाची पूजा करावी. पूजे करितां पुढील पत्र्या मिळवाव्या. १ आघाडा २ दाळिंबी ३ रुई ४ जाई ५ बोर ६ देवदार ७ धोतरा ८मारुका ९ हदगा १० बेल ११ शतपत्र (कमलपत्र) १२ कन्हेर १३ चांपा १४ दुर्वा १५ शमी १६ तुळस १७ अर्जुनसादडा १८ विष्णुक्रांत. इ० पत्र्या व अनेकप्रकारचीं सुगंधित पुष्पें यांनीं यथासांग षोडशोपचार पूजा करावी. व नंतर पुराणिकाकडून हरितालिकेची कथा श्रवण करावी. रात्रौ देवीपुढें जागरण करावें. सुवासिनींस यथाशक्ति वायन द्यावें. दुसरे दिवशीं उत्तरपूजा करून सुवासिनीब्राम्हण जेऊं घालून पारणें करावें आणि देवीचें विसर्जन करावें. ह्या दिवशीं बायकांनीं कांहीं खाल्लें तर फार मोठें पाप लागतें. असें हें व्रत केलें असतां कुमारिका मुलींस इहजन्मीं व पुढीलजन्मीं आणि विधवा स्त्रियांसही पुढील जन्मीं सर्वगुणसंपन्न, सुस्वरूप व दीर्घायु पति प्राप्त होतो. सौभाग्यवती स्त्रियांस अखंड सौभाग्य प्राप्त होतें. आणि अंतीं पतिसहित स्वर्गाप्रत जातात. असें या हरितालिकाव्रताचें महात्म्य आहे.

## ॥ आरती श्री हरितालिका देवीची ॥

जयदेवी हरितालीके ॥ सखिपार्वती अंबीके ॥ आरती ओंवाळीतें ॥ ज्ञानदीपककळीके ॥ जय० ॥ ध्रु०॥ हर अर्धांगीं वससी ॥ जाशी यज्ञा माहेराशीं ॥ तेथें अपमान पावसी ॥ यज्ञकुंडीं गुप्तहोसी ॥१॥ रिघसी हिमाद्रीच्यापोटीं ॥ कन्या होसी तूं गोमटी ॥ उग्रतपश्चर्या मोठी ॥ आचरसी उठाउठी ॥२॥ तपपंचाग्नी साधनें ॥ धूम्रपानें अधोवदनें ॥ केली बहु उपोषणें ॥ शंभुभ्रताराकारणें ॥३॥ लीला दाखविशी दृष्टी ॥ हें व्रत करिसी लोकांसाठीं ॥ पुन्हा वरिसी धूर्जटी ॥ मजरक्षावें संकटीं ॥४॥ कायवर्णूं तवगूण ॥ अल्पमती नारायण ॥ मातेदाखवी चरण ॥ चुकवावें जन्ममरण ॥ जय० ॥५॥

**ऋषीपंचमीव्रत-** भाद्रपद शु॥ ५ चे दिवशीं हें व्रत करावें. दोन प्रहरीं नदीवर किंवा जलाशयाचे ठिकाणीं जावें. प्रथमः आघाड्याची प्रार्थना करून त्याच्या काड्या तोडाव्या. १०८, २८ निदान ७ काड्यांनीं दंतधावन करावें. अंगास माती व केंशास आंवळे व तीळ लावून स्नान करावें. शुभ्र व धौतवस्त्र परिधान करून ऋषीपूजन करावें. पूजनाचें स्थान सुशोभीत करून अरुंधती सहित सप्तऋषीचें षोढशोपचार पूजन करावें, आणि कथा श्रवण करावी. या दिवशीं

स्त्रियांनीं हळानें उत्पन्न झालेलें धान्य व पदार्थ न खातां हातांनीं लाविलेल्या शाका अगर आपोआप उत्पन्न झालेलें तृणधान्य व कंदमूल असें भक्षण करावें. असें हें व्रत केलें असतां रजस्वलादोष नाहींसा होतो, सर्व पापाचा क्षय होतो; नानातीर्थांच्या स्नानांचें फल मिळतें; व सर्व मनेप्सित कामना पूर्ण होतात. याकरितां स्त्रीजातींनीं हें व्रत अवश्य करावें.

**शिवामूठ-** कुमारिकाखेरीजकरूनसर्व स्त्रियांनीं हें व्रत करावें. श्रावणी सोमवारीं दंतधावनादि करून नदी किंवा तलावादिकांच्या ठायीं स्नान करून नित्यकर्म करून स्त्रियांनीं शिवमंदिरीं जाऊन संकल्प करून पांच वर्षांचें व्रत करावें. प्रथम गणपतीपूजन करून शिवाची पंचामृतानें षोडशोपचारें पूजा करावी. पुष्पांजली झाल्यावर पहिल्यानें भाताचे तांदूळ, सामर्थ्यानुसार घेऊनशिवाच्या मस्तकावर अर्पण करावें. दुसऱ्यानें यव वाहावें. तिसऱ्यानें गहू वाहावें. चवथ्यानें हरभरे वाहावें. पांचव्यानें मूग वाहावें. अशीं पांच धान्यें वाहून शिवाची प्रार्थना करावी. याचप्रमाणें दर सोमवारीं करावें. याप्रमाणें पांचवर्षें हें व्रत करून पांचवें वर्षी उद्यापन करावें. या योगानें शिव प्रसन्न होऊन सर्व मनकामना पूर्ण होतात.

**वसुबारसव्रत-** आश्विन वद्य १२ चे दिवशीं सायंकाळीं गाय गोऱ्ह्याची पूजा करावी. यादिवशीं

गाईचें दूध, तूप, ताक, दही, लोणी इ॰ गोरस, तेलांत तळलेले पदार्थ आणि स्थालींत (नवावैगेरे) पक्व केलेले पदार्थ खावूं नये. प्रचारांत गहू, मूग इ॰ धान्यें न खातां बाजरीच्या भाकरी, राळे गवारीच्या शेंगा, व म्हशीचें दूध वगैरे खाण्याचा परिपाठ आहे. बाजरी आणि राळे हे विळयानें कापलेले नसावें, हातानें काढलेले असावें. हें व्रत भावाच्या बहिणी व पुत्राच्या आया यांनीं अवश्य करावें; म्हणजे त्यांची मनकामना पूर्ण होऊन भावास व पुत्रास आयुष्य वृद्धि होते.

**मकरसंक्रांत-** पौषमासांत मकरराशीवर ज्यादिवशीं सूर्य येतो त्यादिवशीं हा सण मानला जातो. हा तीन दिवसांचा सण असून स्त्रियांस मोठा आनंदकारक असा आहे. पहिले दिवशीं 'भोगी' दुसरे दिवशीं 'संक्रांत' व तिसरे दिवशीं 'कर' या तीनदिवसांत हा सण वाटला गेला आहे. या दिवशीं काय करावयाचें असतें याचें दिग्दर्शन खालीं केलें आहे.

**भोगी-** यादिवशीं स्त्रिया मंगलस्नान करून, आपल्या पतीच्या आयुष्य वृध्यर्थ ब्राम्हणांस दक्षिणासहित भोगविडे देतात. धनसंक्रांतीमध्यें तूप, खिचडी व बाजरीच्या तीळ लावलेल्या भाकरी इ॰ स्निग्ध व शरीरास पुष्टीकारक अशा पदार्थांनीं मोठें महात्म्य आहे. 'भोगी' हा दिवस धनसंक्रांतीचा अगदीं शेवटला दिवस असल्यानें या दिवशीं वरिल पदार्थ अवश्य करून देवास नैवेद्य दारववावा

आणि सुवासिनी ब्राम्हणांसही जेऊं घालावें. म्हणजे मोठें पुण्य लागून, सर्व मनेप्सित कामना सूर्य नारायण परिपूर्ण करतो.

**संक्रांत**- हा या सणाचा मुख्य दिवस आहे. या दिवशीं मागें सांगितलेल्या पर्वकाळांत अंगास तीळ लावून तीर्थाचे ठिकाणीं स्नान केलें असतां महाफल प्राप्त होतें. त्याचप्रमाणें तिलदान, तिलभक्षण, शिवालयांत तिळीच्या तेलाचा दिवा लावणें, देवास तीळ वाहणें, तिळाची राशी करून दान करणें, तिळाची गाय करून देणें, तिळाचा वृक्ष करून दान करणें, इ॰ दानें केलीं असतां सर्व मनेप्सित कामना परिपूर्ण होऊन पतीचें आयुष्य वृद्धि होऊन, पुत्रपौत्रादिकांची प्राप्ती होते. सौभाग्यवती स्त्रियांनीं आपसांत एकमेकींस खणाचें (सुगडांचें) वायन द्यावें. परंतु नवीन लग्न झालेल्या सौभाग्यवती मुलींनीं पांच वर्षे पावेतों खणाचें वायन न देतां, घरोघर उसाच्या कांडया, बोरें, कापूस, हळदकुंकू, धणें इ॰ पदार्थ वाटावें, पांच वर्षा नंतर खणाचें वायन द्यावें. सौभाग्यवृध्यर्थ आणि पुत्र पौत्र, धनधान्यादिकांची प्राप्ती व्हावी म्हणून कुंभाराचे येथील आवा, उसाचा गाडा, बोरें, हळदकुंकू, पेरू, तीळ इ॰ ज्यांला जसें अनुकूळ असेल तसें त्यानीं त्या पदार्थाची पूजा करून सौभाग्यवती स्त्रियां कडून लुटवावें. आणि अनुकूलते प्रमाणें पुढील दानें करावीं. 'चिलीपिली' दान (सुगडांत ल-

ह्मान बोळकें घालून दान करणें) 'घुसळण' (दधीमंथन) 'घाणा' (उखळावर यथाशक्ति धान्याची राशी करून देणें) 'धडोती' (एकवर्षभर पुरेल असें लुगडें चोळी सौभाग्यवती स्त्रीस देणें) 'चिरचोळी' (लुगडीं चोळ्या) यथाशक्ति सुवासिनींस वाटणें. 'गुप्तदान' (तिळाच्या राशींत किंवा लाडूंत अथवा फळांत रौप्य व सुवर्णादि ठेवून दान करणें.' अवचित्‌फळ' (ब्राम्हणाचे घरीं जाऊन दक्षिणासहित जळामध्यें फळ टाकणें) 'जोडदान' (१२ ब्राम्हणांस दोन दोन नारळ देणें) 'सासर माहेर' (ब्राम्हणाचे घरीं उंबऱ्याच्या आंत व बाहेर अशा दोन धान्याच्या राशी घालून दान करणें. 'दीपदान' 'सप्तधान्य.' 'तूप.' 'तांबूल.' 'तेल.' इ० पदार्थ दक्षिणासहित ब्राम्हणास दानकरावें. आणि त्या दिवशीं सुवासिनी ब्राह्मणास जेऊं घालावें.

**कर**- यादिवशीं अदले दिवसाचीं कांहीं कृत्यें- दानें किंवा लुटविणें राहिलीं असल्यास करावीं. आणि सौभाग्यवती स्त्रियांस हळदीकुंकू द्यावें.

**रथसप्तमी**- माघशुद्ध ७ चे दिवशीं प्रातःकाळीं नदीवरून स्नान करून यावें. चार घोडे, रथ, सारथीसहित श्रीसूर्यनारायणाची मूर्ति रक्तचंदनाची किंवा रांगोळीची काढून त्याची पूजा करावी गुळखोबऱ्याचा नैवेद्य दाखवावा. घरांत असलेल्या धान्यादि पदार्थांच्या यथाशक्ति राशी करून ब्रा-

म्हणास द्याव्या. गुळाची पोळी व लोणकढें तूप वाढून सुवासिनी ब्राम्हणास व दंपत्यास जेऊं घालावें. मकरसंक्रांतीचे दिवशीं कांहीं विशेष अडचणीमुळें सौभाग्यवती स्त्रियांचीं रवणाचीं वायनें वगैरे राहिलीं असल्यास तीं या दिवशीं करावीं. या दिवशीं जोतें फिरवूं नये. हें रथसप्तमीचें व्रत केलें असतां श्री सूर्यनारायण प्रसन्न होऊन, आरोग्य, सौभाग्य व पुत्रपौत्र धनधान्यादि देतो.

**सोमवती–** हें पतीचें आयुष्य वाढविणारें व्रत होय. ज्या दिवशीं सोमवारीं आवस येईल त्यादिवशीं प्रातःकाळीं मुक्यानें उठून स्नान करावें, वस्त्र नेसावें. पिंपळाच्या पारावर जावें व श्री विष्णूची यथासांग पूजा करावी. जो पदार्थ किंवा फळ वाहावयाचें असेल, तीं १०८ मोजून घ्यावीं, पिंपळाला तितक्याच प्रदक्षिणा घालाव्या, आणि मग तो पदार्थ पिंपळाला अर्पण करून नंतरब्राह्मणाला वाटावें. सुवासिनी ब्राह्मणांसजेऊं घालावें. त्या दिवशीं आपण मुक्यानें जेवावें. असें व्रत जी करील, तिला वैधव्य प्राप्त होणार नाहीं; इच्छिलें फळ प्राप्त होईल. संतती संपत्ती वाढेल आणि अंतीं पतिसमवेत वैकुंठपदाची प्राप्ती होईल.

## ॥ गाणें रामचरित्र ॥

( लंकापुरीं. राज्यनगरीं या चालीवर )

दशरथवंशीं नाहीं संतान ॥ म्हणून मांडिलें अनुष्ठान ॥ ऋष्यशृंगानें करूनियां
यज्ञ ॥ पायस दिधलें मंत्रून ॥ तिघी स्त्रियांनीं केलें प्राशन ॥ मग प्रसवल्या पु-
त्ररत्न ॥१॥ राम अवतरला अवतरला अयोध्येसी ॥ आनंदले सर्व ऋषी ॥
रामाचें नांव स्मरा हो एकांतीं ॥ तुम्हाला देइल तो मुक्ती ॥ अ० क० ॥ राम अ-
वतरला अवतरला अयोध्येस ॥ श्रुत हें झालें देवांस ॥ बंदीची व्यथा सोसेना आ-
म्हांस ॥ येइल करुणा रामास ॥ ह्मणूनी स्तवीला क्षीरसागरवासी ॥ दुष्ट मातला
लंकेसी ॥ राम० ॥२॥ विश्वामित्रानें यज्ञ वनीं केला ॥ राक्षसांनीं विध्वंसीला ॥
ह्मणोनियां राम राम वनीं नेला ॥ आतां भय नाहीं आम्हांला ॥ वधिले राक्षस य-
ज्ञसिद्धीस नेला ॥ गेले सितेचे स्वयंवराला ॥ राम० ॥३॥ आणिली जानकी आ-
ले अयोध्येसी ॥ आनंदले नगरवासी ॥ रामाचा महिमा वर्णावा किती ॥ त्राटिके-
स दिली मुक्ती ॥ गौतम ललना पादस्पर्शें सती ॥ झाली पूर्ववत मूर्ती ॥ राम० ॥४॥
सोडवील देव बंदीचे सर्व ॥ तो यशवंत रघूवीर ॥ दशरथ मनीं आनंद थोर ॥ राम
बैसवी गादिवर ॥ करावें राज्य राज्य साचार ॥ भक्तांसाठीं अवतार ॥ राम० ॥ ५ ॥

कोसल्या म्हणे रामा राज्य करीं ॥ सर्वत्रांना सौख्य देईं ॥ तेव्हां कैकयिनें ऐकिये-
लें श्रवणीं ॥ ह्मणे वर द्यावे येक्षणीं ॥ राज्य भरतासी रामवना धाडीं ॥ दशरथ
खोंचला मनीं ॥ इतुकें ऐकूनी रामवनीं गेला ॥ दशरथ धरणीवर पडला ॥ राम०
॥६॥ सागरीं सेतू वानरांनीं केला ॥ रामाचा महिमा वाढवीला ॥ तारिल्या शीळा गु-
हक उद्धरिला ॥ गंगेचेपार राम गेला ॥ वनीं वनवास चौदा वर्षे केला ॥ दशरथस्व-
र्गावर गेला ॥ पंपा सरोवरीं सर्व क्रिया केल्या ॥ पित्याला स्वर्गी स्वस्थवीला ॥
राम० ॥७॥ राजा जनकांनीं मिथिलेस पण केला ॥ रावणाचा मान गेला ॥ ह्मणूनि
हा द्वेष रामाशीं मांडिला ॥ मारिच सुवर्ण मृग झाला ॥ भ्रमतांवनीं सीतेनें देखिला
कंचुकि द्यावी हो मजला ॥ राम० ॥८॥ इतुकें ऐकूनी चापसिद्ध केला ॥ मृगामागें
राम गेला ॥ हिंडतांवनीं बहुत श्रमी झाला ॥ मृगानें घोर शब्द केला ॥ तेव्हां सीतेनें
श्रवणीं ऐकियेला ॥ सौमित्रा रामवनीं पडला ॥ अहाग सीते भय नाहीं रामाला ॥ नऐ
के ह्मणे कपटभाव धरिला ॥ ओढुनी रेषा सौमित्रवनीं गेला ॥ कर्मगति ओढविली
तिजला ॥ राम० ॥९॥ दुष्ट रावण वेष पालटीला ॥ भिक्षेस यति होउनि आला ॥ ह्मणे

सीतेसी भिक्षा द्यावी मजला ॥ स्कंधीं घेउनि लंके गेला ॥ बिभीषण बंधु सांगे रावणाला ॥ सीता द्यावी हो रामाला ॥ रामानें थोर पराक्रम केला ॥ सागरिं सेतु बांधियेला ॥ राम० ॥ १० ॥ बिभीषण भक्त रामा शरण आला ॥ कृपेनें राज्य दिलें त्याला ॥ वीर मारूती अशोकवनीं गेला ॥ सीतेचे चरणीं लागला ॥ चला हो माते राज्यिं बैसण्याला ॥ रामानें रावण वधियेला ॥ इतुकें ऐकूनी आनंद थोर झाला ॥ ह्मणे प्रतापी राम भला ॥ राम० ॥ ११ ॥ भक्तिविरोधी रावणानें केली ॥ रामाशीं मुक्ति मागितली ॥ वधिला रावण सीता सोडवीली ॥ भक्त मंडळी आनंदली ॥ अयोध्येचें राज्य रामचंद्र करी ॥ गंगेला रामचरणिं तारी ॥ राम० ॥ १२ ॥

॥ गाणें - रुक्मिणीस्वयंवर ॥

झडकरि द्विज पाचारी ॥ सरवेग झडकरि द्विजपाचारी ॥ त्वरें करुनियां पत्र धाडि त्यें बंधू भिमका चोरी ॥ करुणानिधि श्री हरी लिहीत्यें ॥ करुणा० ॥ पत्र पाहुनी लवकर यावें रुक्मिणिच्या सेंवरीं ॥ शिशुपाळ नेमिला असे रे तो मनांत माझे नसे ॥ मम हृदयीं घननीळ वरावा निश्चय माझे मनीं ॥ सरवेग । यादव माझे मनीं ॥ शहाण्णव कुळ

रुक्मि॰
॥३६॥

भूपाळ मिळाले मनास न ये कोणी ॥१॥ वाचुनि अंतरगती॥ पत्र हें। वाचुनि॰॥ झरझर झर झर वेष घेउनी निघावें श्रीपती ॥ अवधि नसे हो तिथी। स्वामिया॰। अव॰ ॥ थरथर थरथर कर कांपती त्याहावें मी किती ॥ तूं आहेसरे सुजाण रे तुं जाणसि अंतरीखुण ॥ मम हृदयीं घननीळ वरावा निश्चय तो चरणीं॥ यदुविर माझें मनीं। सखेग यादव माझे मनीं ॥ शहाण्णव॰ ॥२॥ उपाय नदिसे मातें आणखी। उपाय॰॥ कुलस्वामिणी दर्शन घेतां हरावें मज तिथें॥ येथुनिजातां मज रे मग प्रवेश होइना तुज। तेत्ची जाणखूण कृपाळव करा वासुरमणी॥ यदुवि॰॥३॥ दीननाथ श्रीहरी सखेग दीन नाथश्रीहरी॥ येउनी करुणा आला असे तो रुक्मिणीच्या सेंवरीं ॥ राहुनि दुरच्या दुरी। हरी हा। राहुनि॰ ॥ रथारूढ होवोनि हरियेली भिमकाची कुमारी ॥ मग झाली एकचि घाई रे शिशुपाळ राहिला ठायीं ॥ धराधरा ह्मणतां घेउनी गेला चक्रपाणी ॥ यदुविर मा॰ ॥४॥ रथवेगें चालला । हरीचा रथ॰ ॥ रथारूढ होउनियां शालक श्रीहरीचा पातला ॥ मग बोलतसे रुक्मिणीरे यासि सोडावा येथुनी॥ गोविंदसुत विनवितसे याचि लिळा न नेणें कोणी ॥ यदुविरमा॰ सखेग यादव॰ ॥ शहाण्णव॰ मना॰ ॥ ५॥

गाणीं

॥३६॥

॥ गाणें केशवाचें ॥

पाप पुण्य हें समान होतां नरतनु मज लाधली ॥ बहुत सायासें गोष्ट साधली ॥ पितृवीर्य हें माते उदरीं आकृतिस भावली ॥ हस्तपादादिक वपुनिर्मिली ॥ नऊ महिने जरी गर्भी असतां दुःखें आणिक सोशिलीं ॥ मळमूत्रांत कीं घोळलीं ॥ जेव्हां सोहं शब्दानें स्तविलें सोडिं येथुनि माधवा ॥ आतां कधीं भेटशील केशवा ॥१॥ जन्ममृत्युचे फेरे फिरतां श्रम झाले या जिवा ॥ आतां०॥अ०क० उदरांतुनि बाहेरी येतां सोहंशब्द सोडिला ॥ तुझ्या नामाचा विसर पडला ॥ क्षुधा लागली त्या दुःखानें टाहो जो पसरिला ॥ जननि ह्मणे काय झालें बाळाला ॥ उदर दुःख हें ह्मणुन मातेनें गरळ रस पाजिला ॥ ज्ञान बोलाया नाहीं मला ॥ अशिं दुःखें हीं बाळपणीं सोशितां नाहिं विसावा ॥ जन्म-मृत्युचें० ॥ २ ॥ बाळपण गत होतांना तारुण्य प्राप्त झालें ॥ कसें विषयाशीं मन लुब्धलें ॥ माता पीता तुच्छ करूनी स्त्रीनें मन मोहिलें ॥ जसें कळसूत्रि हालवि बाहुलें ॥ गोड न लागे दुसरे कांहीं घे विषयाची हवा ॥ जन्ममृत्युचे० ॥३॥ तरूणपणग-

त होतांना मग वृद्धदशा पावली ॥ जरेनें अवचित माळ घातली ॥ नेत्र जा-
हलें अंध दिसेना वर्ण कांति झांकली ॥ तनु वाळली मान वांकली ॥ पुत्राशीं
काकुळती येतसे हातिं धरून वागवा ॥ जन्ममृत्युचे फेरे० ॥४॥

॥ गाणें काशीखंड ॥

काशी काशी ह्मणतां जळती पापांच्या राशी ॥ अगणित महिमा शिव तो सांगे
प्रेमें गिरिजेशीं ॥ ध्रु० ॥ भू भागीं हे असतां नाहीं भू ऐशी काशी ॥ गगनाहुनि
अति उंच मुक्तिदा केवळ सुखराशी ॥ सदाशिवानें रचिली विमुक्त करि जिवमा
त्रासीं ॥ सेवेंत गंगातटीं सुरजित ऐशी गुणराशी ॥ चाल ॥ जे त्रिपुर हरा चीरा
जधानि बोलती ॥ सर्वही अपाया वारिताप संसृति ॥ लय काल त्रयिं नाहीं इचा
निश्चिती ॥ पडतांचि तनूजिव कैवल्या पावती ॥ उपनिषदांचें सारहि कळलें
ऋषिजाबालिसी ॥ अगणित महिमा शिवतो सांगे प्रेमें गिरिजेसीं ॥ काशी का
शी ह्मणतां० ॥१॥ त्रैलोक्याची विभुती दिधली हरितें सांबानें ॥ भार्गवितें सु
स्थिर ह्मणवुनी तप करि भावानें ॥ चक्र मारुनी पाताळींचें जळ आणिलें त्यानें

॥ संवत्सर लक्षार्ध दिव्यतें क्रमिलें जिवनानें ॥ चाल० ॥ तैं सांब दयाघन वरदा
नापातला ॥ दैदिप्य तेजस हरि नयनीं पाहिला ॥ अतिविस्मित होउनी निज
माथा हालविला ॥ कर्णातिल मणि त्यास्थळीं नदां पडिपला ॥ झालें तें मन-
कर्णिक तीर्थ हें सुरनमितीज्यासी ॥ अगणित महिमा० ॥२॥ माध्यान्हीं मन
कर्णिके स्नाना येती सुरनरते ॥ कणमात्रोदक मिळतां नाचति स्वर्गि पितरग
ते ॥ जपतप अल्पहि साधन जेथें बहुतचि फळ देतें ॥ तारक उपदेशाचें फळतें जा
णावें निरुतें ॥ चाल॥ अति महिमा मोठा पंचनदाचे तिरीं ॥ सुरमुनि जन नाह-
ति जेथें कार्तिकनिरीं ॥ लाविति दीप बहु नरनारी सुंदरी ॥ पहातांचि दिसे भू
वैकुंठाचे परी ॥ भावें पूजिती बिंदुमाधव ते नर सुखवासी ॥ अगणित महिमा०
॥३॥ तिळतिळावर लिंगें जेथें पदोपदीं तीर्थें ॥ सर्व तीर्थ फळ व्हावें ह्मणवुनि
व्हावि पंचतीर्थें ॥ असंख्य लिंगां माजी शेमृश यात्रा परमार्थें ॥ कराव्या हें मत
व्यासाचें कथिलें विशदार्थें ॥ चाल॥ कळिकाळ कर्म हें कण्व ऋषी बोलती ॥
पावरीं विराजे असें मुनी वर्णिती ॥ मच्छाकृति जाणा पंचक्रोशि परम ती ॥

वरुणा असे दोन्ही भागिं नद्या मिरवती ॥ वाराणसी आनंदा करहि देती सुख राशी ॥ अगणित महिमा० ॥४॥ ज्ञानवापिका दिशाज्यानें ज्ञानराशि केली ॥ उदक प्राशितां लिंग उद्भवे भाष्यक हृत्कमळीं ॥ पूर्ण भद्रसुत दंडपाणि तो सदा द्वारपाळी ॥ नमितां त्यातें काशीफळ देता चंद्रमौळी ॥ चाल॥ शिवमात्रा पुरवी अन्न भवानी सती ॥ बहुविघ्नांटाळी धुंडीराज गणपती ॥ स्कंदोक्त सार हें वर्णि यलें निश्चिती ॥ क्षेत्र पाप हराया भावें करा पंचक्रोशी ॥ अगणित० ॥ ५ ॥

॥ गाणें त्रिवेणी ॥

धन्य त्रिवेणी तिचें निर्मळ वाहे पाणी ॥ अ० क०॥ माघमासाचा महिमा थोर ॥ करिती स्नानाचें आदर॥ तेहतिस कोटी तीर्थें थोर ॥ ठिकाणीं तिचे० ॥ धन्य० ॥१॥ माघमासाचा महिमा दावा ॥ जन्ममृत्यु नकोरे देवा ॥ आपुल्याच-रणीं ठाव द्यावा ॥ ह्मणती प्राणी तिचें० ॥ ध०॥२॥ अक्षय वटाचा थोर महिमा ॥ कितिरे वर्णूं मेघश्यामा ॥ तेहतिस कोटी देव येउनी ॥ लागति चरणीं ॥ तिचें ॥ ध० ॥३॥ अक्षयवटाचे एकच पाना ॥ निद्रा केली अनंत सेना ॥ तेहतिस

कोटी देव येउनी लागती चरणीं ॥ तिचें ॥ धन्य० ॥४॥ देह कर्वतीं घालिती ॥ त्यांच्या पुण्या नाहीं गणती ॥ गंगा यमुना सरस्वती संगमतिन्ही ॥ तिचें० ॥ धन्य० ॥५॥ ज्या नारी करिती वेणीदान ॥ पतीचे मांडीवर बैसून ॥ त्यांशीं लागे अगाध पुण्य ॥ देतां वेणी ॥ तिचें० ॥ धन्य० ॥६॥ माधवरायाचें दर्शन ॥ मुक्तीमोक्षाचें साधन ॥ आपुलेचरणीं ठाव द्यावा ॥ ह्मणती प्राणी तिचें निर्मळ वाहे पाणी ॥ धन्य० ॥७॥

॥ पाळणा दशावताराचा ॥

जो जो जो जोरे मधुसूदना ॥ बाळाजगजीवना ॥ हालवी यशोदा पाळणा ॥ निजवी नारायणा ॥ध्रु०॥ प्रथम अवतारीं श्रीधर ॥ विधीस्तवी फार ॥ मत्स्यरूप घेउनि या- सत्वर ॥ मारूनी शंखासूर ॥ जोजो० ॥१॥ द्वितीय संकटीं इंद्रासी ॥ कूर्मरूप होसी ॥ सिंधूमथुनीयाश्रमलासी ॥ सौख्यांसकळांसी ॥ जोजो० ॥२॥ तिसरा वराह हिरण्याक्षी ॥ धरणी घालुनकुसी ॥ पळतां धरियेला अनुलक्षी ॥ फोडुन त्याच्या कुशी ॥ जोजो० ॥३॥ चतुर्थ नरसिंह विशाळ ॥ अग्नीचा कोल्हाळ ॥ निवडु

निअसुरांसी तोसमूळ ॥ काढी अंतरमाळ ॥ जो० ॥४॥ पांचवा वामन सुंदर ॥ रघुजट द्विजवर ॥ तेजें बुजवीला दिनकर ॥ हरिला दानव अफार ॥ जोजो ॥५॥ षडरिपु भार्गव जिंकुनी ॥ पीता तो जमदग्नी ॥ पृथ्वी निःक्षत्री तिन्ही बाणीं ॥ दिधली विप्रा दानीं ॥ जो० ॥६॥ सप्तम अयोध्या पुरवासी ॥ राजाराम होसी ॥ पितृवचनातें पाळीसी ॥ राहुनिया वनवासी ॥ जो० ॥७॥ अष्टम अवतार गोकुळीं जन्मला वनमाळी ॥ चाणूर कंसाची मंडळी ॥ निवटुनि केली होळी ॥ जो० ॥८॥ पुतना कपटार्थी कुंडमंत्री ॥ शोधुन पाहे धात्री ॥ प्रचंड मेघातें दशसूत्रीं ॥ लक्षुनि धरिला गात्री ॥ जो० ॥९॥ बौध्य कलंकी होणार ॥ पुढील युगांतर ॥ नव्हे असत्य तत्पर ॥ दासचरणीं फार ॥ जोजो० ॥ बा० ॥ १० ॥

॥ भूपाळी गंगेची ॥

उठोनिया प्रातःकाळीं ॥ वदनीं वदा चंद्रमोळीं ॥ श्रीबिंदुमाधवाजवळीं ॥ स्नान करा गंगेचें ॥ ध्रु० ॥ भागीरथीचें स्नान करा ॥ हृदयीं स्मरा गंगाधरा ॥ चुकेल चौऱ्यांशीचा फेरा ॥ ऐसें महात्म्य गंगेचें ॥१॥ गंगा आहे स्वर्गावरुतीं ॥ पाताळीं हे

भोगावती ॥ मृत्युलोकीं हे विख्याती ॥ऐसें महात्म्य गंगेचें ॥२॥ ब्रह्माविष्णुसू-
र्यचंद्र ॥ सीतापति रामचंद्र॥ परिवारेंसी राजा इंद्र ॥ स्नान करी गंगेचें ॥३॥ नार-
दवसिष्ठ गोतममुनी ॥ अत्रि रुमंत आणि जैमिनी ॥ ध्रुवदत्त येती माध्यान्हीं ॥
स्नान करिती गंगेचें ॥४॥ मत्स्यकूर्म वराह नरहरी ॥ वामन परशुराम श्रीहरी ॥
बौद्ध कलंकी अवधारी ॥ करिती स्नान गंगेचें ॥५॥ दुर्गादिमाया सरस्वती ॥ सा-
वित्रीलक्ष्मी पार्वती ॥ गंगापूजन आदरें करिती॥ ऐसें महात्म्य गंगेचें ॥६॥ स्नान
दान जपकरी ॥ घडल्या भागीरथीचे तिरीं ॥ त्यावरी श्री हरी कृपाकरी ॥ ऐसें महात्म्य
गंगेचें ॥७॥ गंगा थोर या त्रिभुवनीं ॥ गंगा येइल ज्याचे वदनीं ॥ तो सुटेल संसा-
रा पासुनी॥ ऐसें महात्म्य गंगेचें ॥८॥ राधा ह्मणे श्री हरी चला ॥ काशी क्षेत्रीं अ-
घटित लीळा ॥ पाहूं पंचगंगेचा मेळा॥ स्नान करूं गंगेचें ॥९॥ नीरा तापी इंद्राय-
णी ॥ प्रवरा सर्वपाप हरिणी ॥ चंद्रभागा विठ्ठल चरणीं ॥ स्तवन करा गंगेचें ॥१०॥ कृ-
ष्णा वेण्या तुंगभद्रा ॥ फल्गु कावेरी नर्मदा॥ भीमा भामा मुख्य गोदा॥ स्तवन करिती
गंगेचें ॥११॥ आली आषाढी एकादशी ॥ चला जाऊं पंढरीसी ॥ भेटूं विठ्ठल रखुमा

ईसी ॥ दासविनवी यावाचें ॥१२॥

॥ गाणें-गंगोत्री॥

हरिद्वार हें द्वार हरीचें प्रथम करुनियातीर्थविधी॥ पिंडदान आणि ब्राम्हणभोजनगंगापूजन यथाविधी ॥ हरिद्वारें कुशावर्ते बिल्वतीर्थ निळधारसुधी॥ स्नात्वाचकनखलें तीर्थे त्यासि जन्ममृत्यु बाधेना कधीं ॥ तेथुनिकरुनियां प्रयाण येती ऋषिकेशाचेजलामधीं ॥ तपोवनीं ते भरतलक्ष्मण पाहतां हरती अधिव्याधी ॥ शिवकोटीचा मुकाम दुसरा पुढें लागेचाळिसीनदी ॥ हापाट्याहुनिजनतेंयेती टेरीचीती वाटसुधी ॥चाल॥ मग उत्तरकाशी नयनीं पाहिली पुढें ॥ तेथें पिंडदान मानवा कदाचित घडे ॥ शतजन्मांतरीचें किल्मिष सर्वहि झडे ॥ दरकूच चालितां भटयारी दृष्टीस पडे ॥ चालसदर॥ रामघाटीं नवकोसाची चढउतार बहु असे ॥ गंगोत्रीकेदार बद्रिनारायण पाहुं चला कसें ॥ हिमालयाचा सुंदरवारा गार शरीरा लागतसे ॥धु॰॥१॥ प्रभातकाळीं मुखमार्जन करुनी जन पंथाला लागतसे॥ कोणि झंपा कोणि कंडया कोणि ओझें झंपितसे ॥ कोठें चढाव कोठें उतार कोठें सोपा मार्गहि

असे ॥ पत्रपुष्पफळ मूल तरूवर परवत गगनाचुंबितसे ॥ ठाइंठाईं जळपुष्कळसुं
दरशिंकाळीचें कामनसे ॥ देवद्वार तरू दाट लागले पुढें बगीचारम्यदिसे ॥ सर्प व्या
घ्र वृश्चिकादिकांची भीति लवलेशहीनसे ॥ वस्त कोणाची कोठें पडो चोरतया स्वप्नीं
नपुसे ॥ चाल ॥ निवास तरूतळीं रात्रीं वास करितीवनीं ॥ परि फुकाचीं काष्टें आणु
निलाविती धुनी ॥ धुनी नव्हेती बा केवळ पातक धुनी ॥ जागतबसती कसेजसेघ
रधनी ॥ चालस० ॥ जाग्रति स्वप्न सुषुप्तिं कोणी भजनीं आनंदे गातबसे ॥ गंगोत्री
केदार० हिमालयाचा० ॥२॥ आहिल्या बाईचें पुण्य नवदवें धरमशाळा बांधिल्या
किती ॥ असरव्य शिंके सांगे झोले त्यावरतुनि येतीजाती ॥ खप्परघाटीं चढाव ब-
हुत रवालीं पाहतां नेत्रफिरती ॥ पाउलवाट कठिण मोठी भयवाटे फाटेछाती ॥ सु-
रवी झाला धरारी वरतीं धान्य रवरिदी बांधुनि घेती ॥ सात दिवस पुढें अन्न मिळेना
म्हणुनीजन संग्रह करिती ॥ भयरव घाटीं चढुनि दरशन भैरवनाथाचें घेती. पूर्वपु
ण्यतें फळासीं आलें गंगोत्री नेत्रीं पाहती ॥ चाल ॥ आचार्य स्वामीचें मर्यादास्थान
॥ बारा सूर्य तीर्थी प्रथम करूनीस्नान ॥ भगिरथ शिळेवरीं करिती पिंडदान ॥ स्थापि

ख्या०
॥४१॥

न मूर्तीचें करितीं पूजन ॥ त्रिरात्रीं राहुनी आज्ञा वंदुनि निघती जनते उल्हासें ॥ गंगोत्री० ॥३॥ गिंडे तांबे चंबू घागर गंगाजळ तीर्थ आणिती ॥ श्रीनगरीचे राज दूतने भटवारि तहसिल घेती ॥ दरकूच दरकूच चालितां प्राणि कठोड ग्रामाते येती॥ तेथुनि वृद्धकेदारानें भाविकजन दरशन घेती ॥ शिवासाठीं देवभिल्लिणी झाली म्हणुनी ग्रामभिल्लु म्हणती ॥ सायुज्य पोळयाची दांडी बर्फाची नाहीं गिणती ॥ त्रिजुगीं नारायणासी पाहतां जगातें आनंद होती ॥ नाभी पासुनी श्री मूर्तीच्या अखंडजळधारा वाहती ॥ अमृत रुद्र विधि कुंडीं नहातां पातक विलयातें जाती ॥ परमरमणीय फळतें दूजे नसे उर्वी वरती ॥ पार्वतीच्या लग्नाची धूणी अद्यापि जळती ॥ तद भस्मतें भाळीं रेखितां ब्रह्मराक्षसतें पळती ॥ चाल ॥ श्रीराम शांभ नारायण नमूं माथा ॥ झिलमेल्या पाटणी पुढें सांग्यावरीं येतां ॥ हरषतीजन गणपतीचें दरशन घेतां ॥ मुरकुट्या गणेशापुढें नमुनी जनजातां ॥ चा० स० ॥ गोरीकुंड तप्तउदकीं नहातां माहेरघर सुखभासे ॥ गंगोत्री के० ॥४॥ गोरीकुंडीं तप्तकुंडीं शीतकुंडीं नहातां तरती ॥ स्वयंभु शंभू सखिसहित ते देवीचें दरशान घेती ॥ पिंडदान आणि ब्राह्मणभोजन गंगापूजन

गाणी
॥४२॥

जनकरिती ॥ तेथुनिकरुनियां प्रयाण सारे भीमगोडयालागीयेती ॥ बर्फातीशित वाज-
तें पूर्वज मनुजा आठवतीं ॥ मंदाकिनीचें स्नान करितां सुरवर सुमनें वर्षती ॥ संध्यातर्प-
णदान करनियां नर केदारासी येती ॥ गंधपुष्प आणि पुडि मेव्याची वरच्याशिवाशीं-
अर्पिती ॥ रेतोदक आणि रुद्रतीर्थ हें सेउनि निरहारी राहती ॥ त्यायोगानें परमावती
हृदयीं वादें शिवमूर्ति ॥ सहा रात्र तेथें क्रमुनियां सप्तमदिवशीं जननिघती ॥ गौरीकुंडीं
कुरुनि पारणें सुफल व्रत साफल्य होती ॥ चाल ॥ तेथेंचि महापंथाची आहेवाट ॥ ना-
म्रांनीं चौकी बसविली अशि अडवाट ॥ कोणि देहत्यागितां बंदीं घालीलाट ॥ चाल ॥
देहत्यागितां जन्मुनि प्राणी पृथ्विपतीतो होत असे ॥ गंगोत्री के० ॥५॥ तेथुनि नि-
घतां नारायणकोटी पाहुनिया गुप्तकाशी ॥ ओरवी मठ पुढें तुंगनाथतो बहुतचढाई
आकाशी ॥ षोडशकोशी चढउतारी दुर्लभ दर्शन प्राण्याशीं ॥ गोपेश्वर पुढें आलक
नंदा यात्रायेती सांग्याशीं ॥ सेत्रपाळ आणि चट्टी ओलांडुनी हनुमंताच्या गंगेशीं ॥
पिंपळचट्टी गरूडगंगा गणेश गंगा रम्यजशी ॥ कुंभार चट्टी जोशीमठतो पाहुनिया
नारसिंहाशीं ॥ विष्णुप्रयागीं स्नान करिती धरुनी सारवळ दंडाशीं ॥ पंडुकेश्वरीं सु-

वर्णमूर्ति पृथिवीवरीं नाहीं ऐसी ॥ धरमस्थापित लक्ष्मी नारायण दर्शनदेतीं सर्वांसी
॥ चाल ॥ अलकनंदापुढें ऋषीगंगा ॥ तेथें स्नान करितां पाय जाय भंगा ॥ सरस्वतीन
दीच्याओलांडुनी सांगा ॥ कल्याणकुटीची परमरम्यजागा ॥ पर्वतशिखरा पासुनी
भूमी पाहतां अतिशय मन हर्षे ॥ गंगोत्री॰ ॥ ६ ॥ वामभागिंते नरनारायण नारदती घेसा
जतिकीं ॥ सव्यभागिंते कुबेरउद्धव अक्रुरसज्जन बैसती कीं ॥ मध्यभागीं श्री बद्रीना-
रायण श्री मूर्ति या साजती कीं ॥ कंठीं जसे मेखळा भूषण रत्नजडित किती शोभती कीं ॥
मंदीलसुंदर अखंड ज्याच्या दिपावळीच्या ज्योती कीं ॥ पूर्व पुण्यतें फळासि आलें ह्मणु-
नी प्रभुला पाहती कीं ॥ आलकनंदा नारदती र्थी तप्तकुंडिं जन न्हाती कीं ॥ इंद्रधारवसु-
धार केशव प्रयाग दृष्टि पाहती कीं ॥ वसुदेव देवकी आहे तेथें तप केलें त्या मूर्ती कीं ॥
अजुनि आढळला नाहीं कोठें याउर्वीच्या वरती कीं ॥ पाक करित कमळा तेथें ओलीं
काष्टें जळतीं कीं ॥ त्या काष्टावरती किंचित मात्र छाया नाहीं चरती कीं ॥ गरुड धनपाल
मार्तंड नारद ब्रह्मशिळा तेथें असती कीं ॥ पंचशिळेच्या मध्यें निरंतर प्रसाद सर्वहि से
विती कीं ॥ तत्प्रसादें ब्रह्मकपाटीं पिंडदान जन करिती कीं ॥ पुनः पिंड नये उर्वीवरतीं

पूर्वज मोक्षाजाती कीं ॥चाल॥ केवळ ऋषीचें असे निजस्थान ॥ षडमास राहिल्या होयतत्त्वज्ञान ॥ प्रत्यक्ष सुराचें ज्याला दर्शन ॥ चाल स० ॥ सहा महिने जन पूजन करिती सुरपूजा षडमास असे ॥ गंगोत्री० ॥७॥ नंदप्रयागीं नंदगंगा तपकेलें रविनंदनें ॥ रुद्रप्रयागीं काय महिमा वर्णावी या मतिमंदानें ॥ देवप्रयागीं आला मेळा नाचत गाती छंदानें ॥ दाशरथीनें तप आचरलें गंगा आलकनंदानें ॥ व्यास गंगेचें आरक्तपाणी बिजली घाटीं ओलांडोनी ॥ मनभंगा चित्तभंगापाहतां निजमन गेलें भंगोनी ॥ पहाडी स्त्रीपुरुष भाविक अति लंपट आनंदानें ॥ पाषाणाचीं सदनें सारीं दीपनसे त्यांचे सदनीं ॥ कांचभूषण स्त्रीपुरुषांचे कंबल भूषण परिधानें ॥ पेथुनि सरला पर्वतसारा देवभुमी सत्संगानें ॥ निरंतर निराहारी राहती जैसे योगी योगानें ॥ राजगिरा कडुचीभाजी भोजन भक्षिती भावानें ॥चाल॥ बोंबेरागड चालतां मार्ग क्रमिला ॥ लक्ष्मणझुला ओलांडुनी प्रभु नमिला ॥ ऋषीकेशी नमुनी हरिद्वारीं आला मेळा ॥ ही यथामतीनें वर्णिली प्रभुलीला ॥ चाल स० ॥ हेरंभात्मज तनमन धन साष्टांगीं प्रभुला असे ॥ गंगोत्री केदार बद्रीनारायण पाहुं चला कसे ॥ हिमालयाचा सुंदर वारा गार शरीरा लागतसे ॥८॥ ६७ ७

## ॥ स्त्रियांकरितां सवडीचेवेळीं आणि व्रतदिवशीं सत्कालक्षेपार्थ ॥ ॥ व करमणुकीसाठीं पुण्यकारक व्रतोपयोगी आणि बोधयुक्त अशा ॥

# ॥ पौराणिककथा ॥

( ह्या कथा स्वतः वाचतां येत नसल्यास आपल्या मुलामुलीकडून वाचवून ऐकण्याचें करावें )

## ॥ सावित्रीची कथा ॥

पूर्वी मद्रदेशांत अश्वपति नांवाचा एक न्यायशील राजा होता. त्याच्या स्त्रीचें नांव मालती होतें. अश्वपति राजास संतति नसल्यामुळें तिच्या प्राप्तीसाठीं त्यानें 'सावित्री' देवीची आराधना करून तिला सुप्रसन्न करून घेतलें. देवीनें त्याला पुत्रतर नाहीं, पण उभयकुलांचा उद्धार करणारी अशी रूपगुणसंपन्न एक कन्या होईल असा वर दिला. त्याप्रमाणें राजपत्नि मालती हिला उत्कृष्ट कन्यारत्न झालें. देवीचा प्रसाद ह्मणून त्या कन्येचें नांव 'सावित्री' असें ठेविलें. ही कन्या दिवसमासांनीं वाढून पुढें उपवर झाल्यावर ह्या कन्येची रूपगुणसंपन्नता अतिशय पाहून राजानें मंत्री, वृद्ध पुरोहित आणि सैन्य बरोबर देऊन कन्येसच आपल्या मनाजोगा पति पाहून येण्यास आज्ञा केली. पति पाहण्याकरितां सावित्री देशोदेशीं हिंडत हिंडत एका रम्य वनांत सैन्यासह विश्रांति करितां थांबली. त्या ठिकाणीं सावित्री ही आपल्या स-

रवीला बरोबर घेऊन वनशोभा पाहत पाहत एका सरोवराच्या कांठीं आली. तों तेथें वेषानें ऋषिपुत्रास
म पण रूपतेजानें क्षत्रिय असा एक रूपसंपन्न कुमार स्नानास आलेला तिच्या दृष्टीस पडला. त्याला पा-
हतांच सावित्री मोहित होऊन, हाच आपणास पति असावा असा विचार ती करूं लागली. नंतर आपल्या स-
खीकडून त्या कुमाराची सर्व हकीकत ऐकून घेतली व शेवटीं त्याच्याशींच विवाह करावयाचा असा
दृढनिश्चय करून ती सर्व सैन्यासह आपल्या नगरास आली, आणि पित्यास पतिनिश्चयाचा सर्व मजकूर
कळविला. पुढें फिरतफिरत नारदस्वामींची स्वारी तेथें आली. नारदस्वामींचें आगतस्वागत करून अश्वप-
ति राजानें प्रार्थना करून आपल्या कन्येची हकीकत त्यांना कळविली. राजा ह्मणाला, महाराज, ही माझी
एकुलती एक कन्या सावित्री नुकतीच प्रवासाहून पतिनिश्चय करून आली आहे. हिनें द्युमत्सेन ह्मणू-
न कोणी राज्यभ्रष्ट झालेला व अंध असा राजा आपल्या स्त्रीसह तपोवृत्तीनें वनांत राहत आहे, त्यां-
चा पुत्र सत्यवान याशीं विवाह करण्याचा निश्चय केला आहे. आपण त्रिकालज्ञ आहां, तेव्हां हा शरी-
रसंबंध आपल्या विचारास कसा काय येतो हें कळविण्याची कृपा व्हावी. नारद ह्मणाले, राजा, स्त्रियांना
विधिपूर्वक पतिलाभ हा एकवारच होत असतो. या करितां त्यांचें परिणयन करितांना वरपक्षाकडील
कुलशील वयवृत्ति वगैरे बद्दल नीट परिक्षण करून मग विवाहनातें जोडावें. राजा, हल्लीं तुझ्या या मुली

नें जो पति निश्चय केला आहे तो तुमच्या योग्यतेला फारच कमी आहे. या करितां हा मनांत आणलेला नियम मोडून टाकावा असें माझें मत आहे. नारदमुनींचें हें भाषण ऐकून सावित्री फार नम्रपणानें ह्मणाली कीं, " महाराज, आपलें वचन योग्यच आहे; व त्यांतून वडिल माणसें सांगतील तें ऐकण्याचें नातें मजकडे आहे; पण माझ्या मनांत जी प्रेमाची गांठ पडली आहे ती सुटत नाहीं याला मीं काय करूं?" यावर नारदांनीं तिला एकीकडे नेऊन सांगितलें कीं, " तूं ह्मणतेस तशी प्रेमाची गोष्ट आहे खरी; पण एखाद्या अयोग्य ठिकाणीं प्रेम ठेवून पुढें दुःखाची जोड कां करून घेतेस? तूं जो पति योजिला आहेस तो नुसता ऐश्वर्यहीनच आहे असें नाहीं, तर तो अल्पायुषीही आहे. तेव्हां अशाच्या पदरीं पडून व्यर्थ सौभाग्यहानि करून घेऊं नकोस." नारदांचें हें भाषण ऐकून एकदम सावित्रीच्या पोटांत धस्स झालें. शांत वनांत राहून पतिसमागमें सासुसासऱ्यांची सेवा करीत सुखानें आयुष्य घालविण्याचा जो तिचा मनोरथ तो एकदम नष्ट झाला. तरी थोर पुरुषांप्रमाणें तिनें विचार करून आपला दृढनिश्चय नारदमुनीस कळविला. ती ह्मणाली " मनुष्याचे प्रत्यक्ष देहव्यापार घडण्यास ज्या अर्थी मन हेंच मूळ कारण आहे, त्या अर्थी मनानें जी गोष्ट एकदां ग्रहण केली ती देहानेंही ग्रहण केल्याप्रमाणेंच आहे. तेव्हां सत्यवानास ज्या पक्षीं माझ्या मनानें वरलें आहे, त्यापक्षीं तो आतां अल्पायु असो वा दरिद्री असो तो मला सोड

नां येत नाहीं. त्याच्या ठिकाणीं माझी पतिनिष्ठा आतां कायम झाली. सावित्रीची ही सत्यनिष्ठा पाहू
न नारदमुनीला परम संतोष वाटला, व तिला ' सौभाग्य श्रीवर्धक ' असा आशिर्वाद देऊन ते निघून
गेले. पुढें सुमुहूर्तावर ' सावित्रीसत्यवानाचा ' त्यावनांतच विवाह झाला. विवाहानंतर सावित्री आपलें
राज्यवैभव सोडून पतीबरोबर सासुसासऱ्यांची सेवा करीत सुखसमाधानानें तेथें राहिली.

एके दिवशीं आपल्या पतिनिधनाचा जो काळ नारदमुनींनें सांगितला होता, त्याचें तिला सहज
स्मरण झालें, व तो अगदींच नजीक येऊन ठेपलासा पाहून तर तिनें चित्त फारच घाबरलें. तिला काम
धंदा सुचेनासा झाला. तिची उल्हासवृत्ति जाऊन तिला उदासीनता प्राप्त झाली. पतीच्या जीविन धना
च्या रक्षणार्थ ह्मणून ती निरंतर त्याच्या निकट राहूं लागली. त्याला एकक्षणही विसंबू नये. शेवटीं
ज्येष्ठ शुद्ध १५ चे दिवशीं सायंकाळीं नित्याप्रमाणें फळें व समिधापुष्पें आणण्याकरितां वनास जावया
स निघाला. त्यावेळीं सावित्रीही सासुसासऱ्याची आज्ञा घेऊन त्याजबरोबर गेली. वाटेनें तिची उदासीन
ता जाऊन, तिनें प्रसन्नचित्त व्हावें ह्मणून भोंवतालची मनोहर वनशोभा दाखवून व प्रेमळ गोष्टी बोलून
सत्यवानानें आपली पराकाष्ठा केली, पण व्यर्थ. उलटें असा आपणावर अकृत्रिम प्रेम करणारा पति आ
तां लौकरच आपणास अंतरणार हें मनांत येऊन तिला अधिकाधिक दुःखाचे उमाळे फुटूं लागले.

सायंकाळचे सुमारास एका वटवृक्षावर चढून सत्यवान समिधा तोडीत असतां सावित्री त्याच्याकडे स-
चिंत मुद्रेनें दृष्टी लावून खाली बसली होती. इतक्यांत मस्तकशुळाची व्यथा होऊं लागल्यामुळें सत्यवान
खालीं उतरला व विश्रांती साठीं सावित्रीचे मांडीवर मस्तक ठेवतो आहे, तोंच त्याला भयंकर मूर्छना
आली! हाच पतिनिधनकाल आहे असें सावित्रीस वाटलें व . ती अतिशय शोक करूं लागली. इत-
क्यांत सत्यवानाचे प्राण हरण करण्याकरितां स्वतः यमराजाची स्वारी तेथें आली. सावित्री सत्यनिष्ठ
पतिव्रता असल्यानें, तिच्या मांडीवर निजलेल्या सत्यवानाच्या प्राणास आकर्षण करण्याचें यमास सामर्थ्य
होईना ह्मणून तो प्रगट वेषानें त्याच्याकडे पाहत उभा राहिला. इतक्यांत सावित्रीची दृष्टि त्याच्याकडे
गेली. त्याला पाहतांच सावित्रीच्या मनांत धडकी भरली. नंतर हळूंच पतीचें शीर मांडीवरून खालीं ठे-
वून सावित्री हातजोडून मोठ्या नम्रतेनें यमाशीं बोलूं लागली. ही संधि पाहून यमानें सत्यवानाचे शरि-
रावर पाश टाकून त्याच्या लिंगदेहाचें ह्मणजे अंगुष्ठमात्र प्राणाचें हरण केलें आणि दक्षिण दिशेचा
मार्ग धरला. आपल्या पतीचे प्राण हरण करून यमराज चालले असें पाहतांच सावित्रीही यमाचे पा-
ठोपाठ जाऊं लागली. तिला पाहून यम ह्मणाला, सावित्री परत जा. याची क्रिया कर. त्वा भर्त्याचें
ऋण फेडलें. जितकें यावयाचें तितकें आलीस. हें यमाचें भाषण ऐकून सावित्री ह्मणाली, जेथें मा-

ह्या भर्त्यांचे प्राण तेथें त्या असावें हा सनातन धर्म आहे. तपानें, गुरुभक्तीनें, भर्तृप्रेमानें, व्रतानें आणि तुमच्या कृपेनें मला त्याच्या मागून जाण्याचें सामर्थ्य आहे. तत्ववेत्ते पंडित असें ह्मणतात कीं, मैत्री ह्मणजे सख्य हें सात पावलें बरोबर चालल्यानें होतें. मी तुमच्या बरोबर इतकी दूर आलें या करितां तुह्मास मित्र समजून थोडीशी प्रार्थना करतें ती ऐकावी. जे जितेंद्रिय नाहींत ते वनांत राहून धर्माचरण करीत नाहींत. जे संत आहेत ते आत्मज्ञानार्थ लोकांस धर्म शिकवितात. धर्म हाच सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे. ह्मणून आह्मी परमेश्वर प्राप्ति करितां सन्मान्य अशा गृहस्थाश्रम धर्मांत राहतों तो आमचा धर्म आपण कृपा करून चालवावा. यम ह्मणाला - सावित्री, परत जा. स्वर, अक्षर, व्यंजनें यांचें ज्यांत उत्तम उच्चारण आहे असें तुझें सयुक्तिक भाषण ऐकून मी संतुष्ट झालों. वर माग. सत्यवानाच्या आयुष्याशिवाय सर्व तुला पाहिजे तें देतों. सावित्री ह्मणाली - माझा अंध सासरा आश्रमांत आहे. तो स्वराज्यापासून भ्रष्ट झाला आहे. तुमच्या कृपें करून त्याची दृष्टि येऊन तो शक्तिमान व सूर्यासारखा तेजस्वी व्हावा. यम म्ह० - सावित्री, तुझ्या ह्मणण्याप्रमाणें होईल; आतां तूं मार्ग चालून दमलीस. परत जा. श्रम करूं नको. सावित्री ह्म० - पति जवळ असल्यावर मला श्रम कोठून होतील? जिकडे माझा पति तिकडे मी. जिकडे पतीला न्याल तिकडे

मी येईन. देवराज आणखी एकवार माझें भाषण ऐका. साधूंचा एकदां समागम झाला ह्मणजे
त्यांची मैत्री होते असें ह्मणतात. सत्पुरुषाचा समागम व्यर्थ व्हावयाचा नाहीं. यासाठीं त्यांपाशीं रहावें.
यम ह्म०- पंडिताची देखील बुद्धि वादविणारें असें जें सावित्री त्वां भाषण केलें, तें ऐकून मी संतु
ष्ट झालों. सत्यवानाच्या आयुष्याशिवाय दुसरा पाहिजे तो वर माग. सावित्री ह्म०- माझ्या सासऱ्या
चें राज्य शत्रूंनीं हरण केलें आहे तें त्याला पुनः मिळो. त्याच्या हातून अधर्म कधीं होऊं नये हा दु-
सरा वर मागतें. यम ह्म०- सावित्री तुझ्या सासऱ्यास पुनः राज्य प्राप्त होईल. तो स्वधर्म कधीं सोड
णार नाहीं. तुझी इच्छा पूर्ण केली, आतां परत जा. श्रम करूं नको. सावित्री ह्म०- महाराज, आपण
प्रजांचें नियमन करून त्यांना चांगल्या मार्गास लावितां ह्मणून आपणास यम असें ह्मणतात. या
साठीं मी बोलतें तें ऐका. कर्मानें, मनानें आणि वाणीनें प्राणिमात्राचा द्वेष न करणें, त्यांवर दया
करणें, यथाशक्ति दान करणें हा साधूंचा सर्वकाळ असा सत्य धर्म आहे. जग तर असें आहे; मनुष्यें
धर्माचरणास देखील दुर्बळ आहेत. यासाठीं साधु आहेत ते शत्रु ही शरण आला असतां त्यावर द-
या करतात. यम ह्म०- तहानेल्यास उदक प्राप्त झालें असतां जसा आनंद होतो, तसा मला तुझ्या भाषणापा
सून आनंद होत आहे. सत्यवानाच्या जीवाशिवाय आणखी कांहीं इच्छा असेल तर माग. सावित्री ह्म०

माझा पिता राजा आहे, पण त्यास संतति नाहीं. त्यास उत्तम शंभर औरस पुत्र व्हावे, हा तिसरा वर मागतें. यम ह्म०- तुझ्या पित्यास उत्तम शंभर पुत्र होतील. तुझी इच्छा पूर्ण झाली, आतां तूं परत जा, पुष्कळ दूर आलीस. सावित्री ह्म०- पतिजवळ असला ह्मणजे मला दूर वाटत नाहीं. माझें मन याच्यापेक्षां दूर धावतें. आपण चालतां चालतांच मी काय ह्मणतें तें ऐका. विवस्वान् ह्मणजे सूर्य. आपण त्या सूर्याचे पुत्र ह्मणून आपणास वैवस्वत असें ह्मणतात. आपल्या शासनाच्या योगानें लोक धर्माचरण करितात ह्मणून आपणास धर्मराज ह्मणतात. साधूंवर जसा मनुष्याचा विश्वास असतो तसा स्वतःवर देखील नसतो ह्मणून सर्व लोक साधूंची प्रार्थना करतात. मित्रत्वा मुळें एकमेकांवर लोक विश्वास करतात. यामुळेंच साधूंवर लोकांचा अधिक विश्वास असतो. यम ह्म०- सावित्री त्वां भाषण केलें तसें भाषण म्यां कधीं ऐकलें नाहीं. या तुझ्या भाषणानें मी संतुष्ट झालों. सत्यवानाच्या जीविताशिवाय पाहिजे तें माग आणि परत जा. सावित्री ह्म०- मला सत्यवानापासून शंभर औरस पुत्र व्हावे हा चौथा वर मागतें. यम ह्म०- सावित्री, तुला पराक्रमी असे उत्तम शंभर पुत्र होतील. आतां तूं दमलीस. फार दूर आलीस परत जा. सावित्री ह्म०- साधु सर्वदां धर्मानें वागतात. साधूला कोणती ही गोष्ट अशक्य नाहीं. साधु एकदां बोलतील तें केल्याशिवाय राहणार नाहींत. साधूंचा स-

मागम झाल्यावर कोणतेंही भय नाहीं. साधु सत्य धर्माचें आचरण करितात त्यामुळें सूर्य उगवतो. साधूंच्या तपाच्या योगानें पृथ्वी स्थिर रहाते. भूतभविष्य सर्व साधूंच्या स्वाधीन आहे. साधूंची संगती झाल्यावर कधींही नाश व्हावयाचा नाहीं. परोपकार करणें हें सज्जनाचें काम आहे असें समजून प्रत्युपकाराची अपेक्षा न धरतां साधु दुसऱ्याचें हित करितात. सत्पुरुषाचा प्रसाद कधींही व्यर्थ व्हावयाचा नाहीं. त्यापासून संपत्ति व कीर्ति यांचा लाभ होतो. यासाठीं सत्पुरुष हेच रक्षण करणारे होत.

यम ह्म०- सावित्री, जसजसें तूं धर्मयुक्त, हृदयास आनंद देणारें, व्याकरण शुद्ध, अर्थयुक्त असें भाषण करतेस तशी तशी तुजविषयीं माझ्या मनांत अधिक भक्ति उत्पन्न होते. पाहिजे तो उत्तम वर माग.

सावित्री ह्म०- तुमच्या वरांप्रमाणें मला पुत्रप्राप्तीचा वर दिला आहे तो सौभाग्याशिवाय पूर्ण होणार नाहीं. यासाठीं सत्यवान जिवंत होवो हा वर मागतें. कारण पतीवांचून मी मेल्याप्रमाणेंच आहें. पतीचा वियोग असतां मला कोणत्याही सुखाची इच्छा नाहीं. पतीवांचून मला स्वर्गाची देखील इच्छा नाहीं. पतीवांचून मला जगण्याची इच्छा नाहीं. तुला शंभर पुत्र होतील असा आपणच वर दिला आणि माझ्या पतीला तर घेऊन चाललां. आपलेंच भाषण सत्य होवो याकरितां सत्यवान जिवंत होवो हा वर मागतें. या प्रमाणें सावित्रीचें भाषण ऐकून यमानें "तथास्तु" असें ह्मणून सत्यवाना

चे पाश सोडिले. नंतर यम संतोषानें सावित्रीस ह्मणाला, हे कुलस्त्रि, हा तुझा पति मुक्त केला. निरो
गी होऊन याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तुह्मा उभयतांला चारशें वर्षे आयुष्य प्राप्त होईल. पुष्कळ
यज्ञ करून सत्यवान जगांत कीर्तिमान होईल. त्यापासून तुला शंभर पुत्र होतील, तेही कीर्तिमान पुत्र
पौत्रवान असे होतील. तुझ्या नांवावरून त्यास सावित्र असें ह्मणतील. तुझ्या बापास शंभर पुत्र हो
तील तेही पुत्रपौत्रवान होतील. हे तुझे भाऊ देवासारखे शोभतील. या प्रमाणें भाषण करून
यम सावित्रीस परत जाण्यास सांगून आपल्या स्वस्थळीं गेला. पुढें सावित्री पतीजवळ आली, तों यमा
च्या आशिर्वादाप्रमाणें सत्यवान सजीव होऊन, मनुष्य झोंपेंतून उठतो त्याप्रमाणें निजलेला जागा
झाला. नंतर तीं उभयतां आश्रमीं आलीं. पुढें लागलींच यमाच्या वरदानाप्रमाणें सर्व फळें प्राप्त झा-
लीं. सारांश- सद्गुण, सद्वर्तन, पतिनिष्ठा आणि निर्मलवृत्ति इत्यादि गुणांनीं युक्त सावित्री असल्यानें
तिनें आपली कीर्ति या जगांत अमर करून ठेविली आहे. हें वटसावित्रीव्रत स्त्रियांना सौभाग्य देणारें
असल्यामुळें स्त्रियांनीं अवश्य करावें. ही कथाश्रवण अथवा पठण केली असतां पति क्षिणायु अस-
ल्यास त्याचे आयुष्याची वृद्धि होते, आणि सर्व मनोरथ पूर्ण होतात. अशी ही सौभाग्यकारक कथा स्कंदपुरा-
णांत ईश्वरानें सनत्कुमारास सांगितली आहे. ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥

## ॥ हरितालिकेचीकथा ॥

एके दिवशीं शिवपार्वती कैलासपर्वतावर आनंदाच्या गोष्टी करीत बसलीं होतीं; त्यावेळीं पार्वतीनें शंकरास विचारलें कीं, महाराज, थोडया श्रमानें पुष्कळ श्रेय मिळणारें असें श्रेष्ठव्रत कोणतें आहे, आणि कोणत्या महत्पुण्यानें मला आपली प्राप्ति झाली तें सांगा. त्या वेळीं शंकर ह्मणाले हे पार्वती जसा नक्षत्रांत चंद्र श्रेष्ठ, ग्रहांत सूर्य श्रेष्ठ, चारवर्णांत ब्राह्मणश्रेष्ठ, देवांत विष्णु श्रेष्ठ, नद्यांत गंगा श्रेष्ठ, त्याप्रमाणें सर्व व्रतांमध्यें हरितालिकाव्रत हें श्रेष्ठ होय. बाळपणीं तूं हेंच व्रत केलेंस आणि त्या योगानें माझी तुला प्राप्ति झाली. भाद्रपद शुद्ध ३ स हें व्रत त्वां केलेंस. तें व्रत त्वां कसें केलें तें तुला सांगतों. माझी प्राप्ति व्हावी ह्मणून लहानपणीं त्वां घोर तप केलें. चौसष्ट वर्षें थंडी, पाऊस व ऊन हीं तिन्हीं दुःखें सहन करून, नुसतीं झाडाचीं पिकलीं पानें खावून तूं होतीस. हे तुझे श्रम पाहून तुझ्या बापाला फार दुःख झालें व अशी कन्या कोणास द्यावी? अशी त्याला चिंता पडली. इतक्यांत नारदमुनींची स्वारी तेथें आली. तुझ्या पित्यानें त्यांची पूजा करून येण्याचें कारण विचारलें. तेव्हां नारद म्हणाले, तुझी सुस्वरूप उपवर झालेली कन्या आपणास मिळावी अशी विष्णूची इच्छा असून, त्यानें मागणी करण्याकरितां मला तुजकडे पाठविलें आहे. विष्णु हाच तुझ्या कन्येस योग्य वर आहे. तर तु-

झी कन्या पार्वती ही त्वां विष्णूला अर्पण करावी असें माझें तुला सांगणें आहे. नारदाचें हें भाष
ण ऐकून हिमालयास मोठा आनंद झाला. त्यानें नारदाचें ह्मणणें मान्य केलें. नंतर नारद मुनी तेथू
न निघून वैकुंठास गेले आणि झालेली सर्व हकीकत विष्णूस सांगितली. इकडे नारद येऊन गेल्या
ची व आपण तुला विष्णूस देण्याचें कबूल केल्याची हकीकत तुझ्या बापानें तुला सांगितली. पित्याचें
तें भाषण ऐकून तुला अतिशय वाईट वाटलें. तुझें म्लान झालेलें मुख पाहून तुझ्या सखीनें तुला
वाईट वाटण्याचें कारण विचारलें. त्यावेळीं तूं ह्मणालीस कीं, मला महादेवावांचून दुसरा पति करणें
नाहीं असा माझा निश्चय आहे. माझ्या बापानें मला विष्णूला देण्याचें कबूल केलें याला काय उपाय क-
रावा? हा तुझा दृढनिश्चय पाहून तुझी सखी तुला एका अरण्यांत घेऊन गेली. त्या ठिकाणीं एक नदी
होती, त्या नदीचे कांठीं एक गुहा होती त्या गुहेंत जाऊन त्वां वालुकेनें पार्वतीसह माझ्या लिंगाची स्थापना केली,
आणि एकाग्रचित्तानें पूजा केली. त्या दिवशीं उपवास करून रात्रौ जागरण केलेंस. तो भाद्रपद शुद्ध तृतीयेचा
दिवस होता. त्या तुझ्या पुण्याच्या योगानें मी फार संतुष्ट झालों, आणि तुला दर्शन देण्याकरितां मी कैलास
पर्वताहून तेथें आलों. तुझ्या भक्तीनें मी प्रसन्न झालों, वर माग. असें ह्मणतांच 'माझा अंगिकार करावा'
अशी मोठ्या नम्रतेनें त्वां माझी प्रार्थना केली. त्यावेळीं मी ती गोष्ट मान्य केली. पुढें दुसरे दिवशीं ती

व्रतपूजा त्वां विसर्जन करून पारणें केलेंस. इतक्यांत तुझा पिता त्या ठिकाणीं आला. तुला पळून य-
ण्याचें कारण विचारलें. त्वां झालेली सर्व हकीकत त्याला निवेदन केली. त्यानें तुझ्या म्हणण्याप्रमाणेंच मी
करीन असें कबूल करून तुला तो घरीं घेऊन गेला. पुढें सुमुहूर्तावर तुझें व माझें लग्न झालें. ज्या व्रता
च्या योगानें तुला माझी प्राप्ति झाली त्याला 'हरितालिका व्रत' असें ह्मणतात. आतां तुला या व्रताचा
विधि सांगतों. ज्या ठिकाणीं हें व्रत करावयाचें असेल, त्याजागेवर तोरणें बांधावीं, केळीचे खांब लावावे,
उत्तम प्रकारची रांगोळी काढून पार्वती सह शंकराची स्थापना करावी. व षोडशोपचारें त्यांची पूजा करून
अनन्य भावानें त्यांची प्रार्थना करावीं; ब्राह्मणास वायन द्यावें, आणि ही कथा श्रवण करून रात्रौ मजपुढें
जागरण करावें. त्या दिवशीं उपवास करावा. या व्रतानें प्राणी पापापासून मुक्त होतो, सप्त जन्माचें पातक
नाहींसें होतें, राज्य मिळतें; अखंड सौभाग्याची प्राप्ति होते; ह्या दिवशीं बायकांनीं कांहीं खाल्लें तर सप्तजन्मीं
वंध्यत्व व विधवत्व प्राप्त होतें, आणि दारिद्र्य प्राप्त होऊन पुत्रशोक होतो. हें व्रत स्त्रियांस अवश्य आहे. ही
कथा श्रवण केल्यास सहस्त्र अश्वमेध व शंभर वाजपेय यज्ञ केल्याचें फल प्राप्त होतें. या प्रमाणें शंकरांनीं
पार्वतीस भविष्योत्तर पुराणांतील व्रत आणि कथा सांगितली आहे. ॥ श्री पार्वती शंकरार्पण मस्तु ॥

## ॥ ऋषिपंचमीचीकथा ॥

श्रीकृष्ण सांगतात हे धर्मराजा, पूर्वी कृतयुगीं श्येनजित राजाच्या विदर्भ नगरींत सुमित्र नांवाचा एक ब्राह्मण राहत होता. तो शेतीभाती करून आनंदानें कालक्रमणा करीत होता. पुढें एके दिवशीं त्याची स्त्री अस्पर्श झाली. तिनें त्या ऋतुदोषाचा विचार न करितां घरांत कामधंदा करून सर्वत्र विटाळ कालविला. या योगानें तिला मोठा दोष लागला. पुढें तीं उभयतां स्त्री पुरुषें मरण पावलीं. त्या स्त्रीस कुत्रीचा व तिच्या नवऱ्यास बैलाचा जन्म प्राप्त झाला. परंतु हीं उभयतांही स्वधर्माचरणी होतीं म्हणून त्यांना पूर्वजन्माच्या स्मरणाची विस्मृति झाली नाहीं. ईश्वरेच्छेनें तीं उभयतां आपल्या पुत्राच्या घरींच होतीं. यांच्या पुत्राचें नांव सुमती होतें. हा मोठा धर्मज्ञ व देवब्राह्मणांची पूजा करणारा होता. पुढें एके काळीं सुमतीच्या पित्याची श्राद्ध तिथी आली; म्हणून त्यानें आपली स्त्री चंद्रवतीईस सांगितलें कीं, आज माझ्या बापाचें श्राद्ध आहे. तर उत्तम प्रकारचा स्वयंपाक कर. चंद्रवती ही पतिव्रता होती, तिनें खीरपुरी, चारभाज्या, कोशिंबिरी वगैरे करून स्वयंपाकाची सिद्धता केली. इतक्यांत त्या खिरीमध्यें सर्पाची गरळ पडली. ती त्या कुत्रीच्या पाहण्यांत आली. ती कुत्री ज्ञानी असल्यानें तिच्या मनांत आलें कीं, ही खीर भक्षण केल्यानें ब्राह्मण मरतील. व त्या योगानें आपल्या सुनेस फार

पातक लागेल. असें तिच्या मनांत येऊन ती जाऊन त्या खिरीच्या भांड्यास शिवली. हें पाहतांच चंद्रव
तीस अतिशय राग येऊन तिनें त्या कुत्रीचे पाठींत जळकें लांकूड मारलें. व नंतर तो सर्व पाक टाकून दे-
ऊन दुसरा पाक तयार केला. यथाविधि श्राद्ध होऊन ब्राह्मण जेऊन आपापल्या घरीं गेले. कुत्रीनें स्वयंपाक
विटाळल्याचा संताप त्या स्त्रीस आल्यामुळें तिनें त्या कुत्रीस त्या दिवशीं कांहींच खावयास टाकलें ना-
हीं. दिवसभर खावयास न मिळाल्यानें ती कुत्री भुकेनें फार व्याकुळ झाली. रात्र होतांच ती बैलाच्या खुं-
ट्याजवळ गेली, आणि दिवसास झालेली सर्व हकीकत तिनें त्याच्याजवळ सांगून, सुनेनें आज मला मु-
ळींच खावयास दिलें नाहीं या योग्यानें माझे प्राण कासाविस होत आहेत असें ती म्हणाली. हें त्या कु-
त्रीचें भाषण ऐकून बैल ह्मणाला, पूर्वजन्मीं त्वां घरांत विटाळ कालविला त्या पातकाच्या योगानें तुला
कुत्रीचा व मला बैलाचा जन्म प्राप्त झाला. तुला मार बसून खावयास मिळालें नाहीं. तसेंच आज माझें
श्राद्ध असून, माझ्या मुलानें मला दिवसभर नांगरास जुंपिलें आणि तोंड बांधून मला फार मारलें. याये
गानें मीही आज भुकेला आहें. तुझ्या त्या पापाचेंच फळ हें आपणा उभयतांस भोगावें लागत आहे. मी आ-
ज उपाशी असल्यानें मुलानें केलेलें श्राद्ध अगदीं निर्फळ झालें. हा त्या बैलाचा व कुत्रीचा झालेला संवा-
द पुत्रानें ऐकिला. त्यावेळीं त्याला फार वाईट वाटलें. त्यानें लागलींच त्या बैलास चारा व कुत्रीस अन्न घा-

लून त्या उभयतांना पाणी पाजलें. आपल्या मातापित्याची ती अवस्था पाहून सुमतीस फारच दुःख होऊं लागलें. दुसरे दिवशीं प्रातःकाळ होतांच तो अरण्यांत गेला. त्या ठिकाणीं त्याला महान् महान् तपस्वी, ज्ञानी, धार्मिक व वयोवृद्ध ऋषि दृष्टीस पडले. सुमतीनें जाऊन त्यांना साष्टांग नमस्कार घातला. त्याची उदासीन व दुःखी मुद्रा पाहून ऋषींनीं त्याला त्याचें कारण विचारलें. सुमती ह्मणाला माझ्या आईस कुत्रीचा व बापास बैलाचा जन्म प्राप्त झाला आहे. त्यांची ती पशुयोनि नाहींशी होऊन त्यांचा उद्धार होईल असा एखादा उपाय सांगावा. सुमतीची लीनता व पितृनिष्ठा पाहून ऋषीस मोठी दया आली. ऋषींनीं त्याला ऋषिपंचमीनें व्रत करण्यास सांगितलें. सुमतीनें याचा विधि कसा म्हणून प्रार्थना केली. ऋषि ह्मणाले भाद्रपद शुद्ध पंचमीस हें व्रत करावें. ऐन दोनप्रहरीं नदीवर जावें. तेथें आघाड्याची प्रार्थना करून त्याच्या काड्यांनीं दंतधावन करावें, व तीळ आणि आंवळकटी केंसास लावून स्नान करावें; नंतर स्वच्छ पांढरें वस्त्र नेसावें. पवित्र अशा ठिकाणीं अरुंधती सहित सप्तऋषींची स्थापना करून त्यांची यथासांग षोडशोपचारें पूजा करावी. यादिवशीं शाका, तृणधान्य, (वन्या सांवे) कंदमुळें भक्षण करावीं. नांगरलेल्या जमिनींत उत्पन्न झालेले पदार्थ खावूं नये. या प्रमाणें सात वर्षें हें व्रत करून नंतर यथाशक्ति उद्यापन करावें. असें हें व्रत केल्यानें रजस्वला दोष नाहींसा होतो; पापाची निवृत्ति होते; नाना तीर्थीं स्नान केल्यानें फल प्राप्त होते

तें. सुमती तूं स्त्रीसह वर्तमान हें व्रत कर, ह्मणजे तुझे सकल मनोरथ पूर्ण होतील. ऋषींची आज्ञा घे-ऊन सुमती घरीं आला, आणि ऋषींनीं कथन केल्याप्रमाणें त्यानें स्त्रीसह 'ऋषीपंचमी' व्रत केलें. या व्रताचें सर्व पुण्य त्यानें आपल्या भाई बापांस अर्पण केलें. त्या पुण्यानें ती कुत्री व तो बैल हीं उभयतां दिव्य रूप होऊन विमानांत बसून स्वर्गाप्रत जाती झाली. असें सांगून श्रीकृष्ण म्हणाले हे धर्मराजा, हें ऋषिपंचमीचें व्रत सर्वांस संपत्ति देणारें असून स्त्रियांचें पापनाशन करणारें आहे. तुसतीकथाच श्रवण केली तर धन, यश, स्वर्ग व पुत्र यांची प्राप्ति होते. याप्रमाणें भविष्योत्तर पुराणांतील व्रत व कथा श्रीकृष्णानें धर्मराजास सांगितली आहे. ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## ॥ सीतेची पत्येकनिष्ठा ॥

श्रीरामचंद्राची पत्नि सीता इची आपल्या पतीच्या ठिकाणीं एकनिष्ठ भक्ति कशी होती, हें याखालीं दिलेल्या सितेच्या भाषणावरून ध्यानीं येईल.

श्रीरामचंद्र हे पित्याच्या आज्ञेवरून वनवासास जावयास निघाले, त्यावेळीं त्यांनीं सीतेस सांगितलें कीं, तुला रानावनांतून फिरणें व कंदमुळावर निर्वाह करणें फार जड जाईल. या करितां तूं येथेंच रहा. किंवा पाहिजे तर माहेरीं पित्याचे घरीं जा. आम्ही पित्याच्या आज्ञेप्रमाणें चौदा वर्षें वनवा

स करून परत येऊं त्यावेळीं तुला घेऊन येऊं. हें रामचंद्रांचें भाषण श्रवण करून सीता ह्मणाली-
महाराज, दीपास सोडून प्रभा कधींतरी राहते काय? तसेंच कनकास कांति सोडीत नाहीं; सूर्यास कि
रणें सोडीत नाहींत; साधु सद्विवेकास सोडीत नाहींत, रत्नें कळेस सोडीत नाहींत; गूळ गोडीस सो-
डीत नाहीं; आणि कस्तुरी सुवासास सोडीत नाहीं. तद्वत मी आपल्याहून निराळी नाहीं. तर मला बरो
बरन्यावें. श्रीरामचंद्रानें सीतेची आपल्या ठिकाणीं असलेली एकनिष्ठा पाहून बरोबर नेण्याचें केलें

ज्या सीतेस कधींही ऊन किंवा वारा माहित नव्हता, व जी अत्यंत सकुमार राजैश्वर्यांनीं युक्त
अशी असतां एकदम पतीबरोबर तिला अरण्यवास करण्याचा समय आल्यानें तिला फारच त्रास व
दुःखें सोसावीं लागलीं. परंतु सितेच्या एकनिष्ठ पतिभक्ती मुळें तिला अरण्यवास मुळींच कठीण गे-
ला नाहीं. हें सितेनेंच आपले मुखानें लोपामुद्रेस सांगितलें आहे तें असें:-

रावणाचा वध करून रामचंद्राची स्वारी सीतेसहवर्तमान आगस्ती ऋषीच्या आश्रमास आ-
ली. आगस्ती ऋषीची पत्नि लोपामुद्रा, इनें सीतेचें पुष्कळ आगतस्वागत केलें. नंतर सीतेला ए-
कंदर वनवासाची हकीकत विचारीत असतां रामाचें तुजवर प्रेम कसें काय आहे, हें ही विचारलें.
त्यावेळीं सीता ह्मणाली, लोपामुद्राबाई, काय सांगावें. वनवासांत रामचंद्राच्या सहवासांत अ-

सल्यानें वनवास मला अत्यंत सुखाचा गेला. मला ज्या ज्या गोष्टीची गरज लागे ती ती त्यांनीं तात्काळ पुरविली. उन्हांतून आलेल्यास जशी सावली गोड वाटते तसाच. वनांत रामचंद्राचा सहवास मला गोड वाटत असे. मेघाला समोर पाहिलें म्हणजे मोर जसे आनंदानें नाचतात, तसें रामचंद्राच्या सान्निध्यानें मी आनंदानें वागत असे. मार्गानें चालतांना रामचंद्रानें वरचेवर थांबून प्रेमानें मागें पहावें, व मी जवळ आल्यें म्हणजे चालूं लागावें. माझी माता पृथ्वी ही मला दुःख देत नसे. व आमचा कुळपति सूर्यनारायणतर मजसाठीं चंद्राप्रमाणें शीतळ होत असे. रामचंद्राबरोबर असल्यानें भूमीवरील शयन सुद्धां आह्मास सुखकर वाटे.

सारांश पतीच्या ठिकाणीं एकनिष्ठा ठेवणाऱ्या ज्या स्त्रिया आहेत त्या किती ही सुकुमार असोत किंवा ऐश्वर्य संपन्न असोत, त्यांना पतिबरोबर कसाही समय प्राप्त झाला तरी तो त्यांना सुखाचाच वाटतो, हें सीतेच्या उदाहरणावरून स्पष्ट होतें. याकरितां ज्या स्त्रिया आपल्या पतिसमागमें एकनिष्ठेनें हरएक प्रसंगीं सादर राहतील त्यांना सौख्य आणि सीते प्रमाणेंच धन्यताही प्राप्त होणार आहे. ॥ श्री सीताराम चंद्रार्पणमस्तु ॥

## ॥ पातिव्रत्यपराक्रम ॥

ब्रह्मपुत्र अत्रिऋषि यांची भार्या अनसुया हिच्या पातिव्रत्याची ख्याति दिगंत गाजत आहे. या एकनिष्ठ पतिव्रतेच्या तपोबलानें तेहतीस कोटि देवांना भीति उत्पन्न होऊन त्यांना आपापल्या स्थानाची काळजी उत्पन्न झाली. त्यावेळीं ब्रह्माविष्णु रुद्र हे त्रिवर्ग तिचा तो पातिव्रत्यपणा भ्रष्ट करण्या करितां अतिथिवेषानें तिच्या दारीं आले, व नग्न होऊन भिक्षा घाल अशी तीस आज्ञा केली. तिनें तें मान्य करून त्या त्रिवर्गांना आसनें देऊन आपण स्वयंपाक घरांत गेली. व मनामध्यें अंतःकरणपूर्वक पतिचरणाचें स्मरण करून ह्मणाली ‘ माझें मन निर्मळ आहे तर मला कोण काय करणार आहे? अतिथी माझ्या मुलाप्रमाणें आहेत.’ असें ह्मणून वस्त्राचा त्याग केला व नग्न झाली; आणि भिक्षा घेऊन बाहेर आली-तों ते अतिथि बाळ झालेले तिनें पाहिले! काय हा तिच्या पातिव्रत्यचरणाचा पराक्रम! जे ब्रम्हाविष्णु महेश सृष्टीची उत्पत्ति स्थिति लय करणारे ते तिचें सत्व पाहण्या करितां आले होते, त्यांचा तो अभिमान लयास जाऊन त्यांना तिच्या बोला प्रमाणें- अर्थात् ‘ अतिथि माझे बाळ होत ’ हें जें ती पति चरणाचें स्मरण करून ह्मणाली त्या प्रमाणें त्यांना बालस्वरूपच धारण करावें लागलें. असा ह्या सतीचा पराक्रम आहे. हिच्या पातिव्रत्या संबंधानें दुसरी एक गोष्ट वाल्मिकी रामायणांत आहे ती अशी

पूर्वी पैठण नगरामध्यें एक ब्राह्मण राहत असे. पूर्वकर्मानुसारें या ब्राह्मणास गलितकुष्टाची व्याधि उत्पन्न होऊन सर्वांग नासलें; शरीरास दुर्गंधी सुटत असे. जागेवरून हालण्याचें ही त्याला सामर्थ्य नसे. या ब्राम्हणाची पत्नि महान् पतिव्रता असून ती एकनिष्ठेनें पतीची सेवा करीत असे. त्याच्या अंगास जरी दुर्गंधि येत असे तरी ती तिला मुळींच न कंटाळतां, आपला पति हाच शंकर आहे असें समजून रात्रंदिवस त्याच्या सेवेमध्यें निमग्न असे. तिला पतिसेवे वांचून दुसरा दानधर्म मुळींच सुचत नसे. याप्रमाणें ती सत्यनिष्ठ पतिव्रता पतिसेवा करून आनंदानें कालक्रमणा करीत असे. एके दिवशीं सायंकाळीं तिचा पति रस्त्याच्या बाजूस खिडकींत बसला असतां राजमार्गानें एक अति सुस्वरूप व नवयौवन वेश्या जातांना त्याच्या दृष्टीस पडली. तिला पाहतांच या ब्राम्हणाच्या मनांत तिच्या विषयीं कामवासना उत्पन्न झाली. पण तो शरीरानें अगदीं अपंग असल्यानें मनांत चिंतातुर होऊन त्यानें उदासवृत्ति धारण केली. पतीची औदासिन्यवृत्ति पाहून, त्या कुलस्त्रीनें अति नम्रतेनें, पादसेवन करीत असतां, उदासीनतेचें कारण विचारलें. त्यावेळीं तो ब्राम्हण म्हणाला 'मला त्या वेश्येची प्राप्ती झाली तरच माझे प्राण वांचतील.' असें पतीचें वाक्य श्रवण करून तिला आपल्या पतीची मनकामना कशी पूर्ण होईल, अशी चिंता उत्पन्न झाली. तथापि तिनें धैर्य धरून आपल्या कृपेनें ही गोष्ट मी शेवटास नेईन असें कबूल केलें. नंतर ती

विप्रपत्नि प्रतिदिवशीं उत्तररात्रीं उठून त्या वेश्येच्या घरीं जाई व तिच्या अंगणांत सडासंमार्जन करू न रांगोळी घालून ती परत येई. हिचें तें कृत्य त्या वेश्येस मुळींच माहीत नसे. हा त्या विप्रस्त्रीचा क्रम बरेच दिवस चालला होता. एकेदिवशीं ती वेश्या टपून बसली. नियमाप्रमाणें ही सती आली व नित्यकृत्य उरकून परत जाऊं लागली. त्यावेळीं त्या वेश्येनें जाऊन तिचे पाय धरले व असे कष्ट करण्याचें कारण वि-चारलें. तेव्हां तिनें आपल्या पतीचा हेतु व त्याची स्थिती कळविली. त्या वेश्येनें तिचें तें ह्मणणें मान्य क-रून आजरात्रीं पतीस घेऊन ये असें तीस सांगितलें.

सायंकाळ झाल्यावर ती विप्रपत्नी नित्यविधि उरकून, पतीस खांद्यावर घेऊन त्या वेश्येच्या घरीं ना वयास निघाली. रात्र काळोखी असून बारीक बारीक पाऊस पडत असे. त्यादिवशीं तेथील राजानें मां-डव्य ऋषीस चोरीच्या आरोपावरून सुळावर दिलें होतें. याच ठिकाणावरून त्या वेश्येच्या घरीं जाण्या चा मार्ग होता. ही विप्रस्त्री पतीस खांद्यावर घेऊन मार्ग चालत असतां मांडव्य ऋषीस दिलेल्या सु ळाच्या खांबा जवळून जाऊं लागली. गर्द काळोख असल्यानें तिला तो खांब दिसला नाहीं. व त्या मुळें त्या ब्राम्हणाचा धक्का मांडव्य ऋषीस लागला. या धक्क्यानें मांडव्यऋषीस अधिक वेदना झाल्या कारणानें त्यांना अतिशय क्रोध आला. व त्यावेळीं त्यांनी 'मला ज्या कोणा दुष्टाचा धक्का लागला तो सूर्योदय होतां-

च मरण पावेल.’ अशी शापवाणि मुखांतून काढिली. ही शापवाणि ऐकतांच त्या ब्राम्हणाची त्याविषये
विषयीं असलेली कामवासना लयास जाऊन ‘आतां आपले प्राण वाचीव’ असें त्यानें स्त्रीस सांगितलें.
पतीची ही भयप्रद स्थिती पाहून ती पतीस घेऊन परत घरीं आली. व पतीस म्हणाली कीं, ऋषीच्या
शापाप्रमाणें आपणास सूर्योदयीं मरण यावयाचें. ऋषीचा शाप अन्यथा व्हावयाचा नाहीं, हें खरें. तथापि
ज्या सूर्योदयीं आपणास मरण यावयाचें तो प्रसंगच येणार नाहीं. अर्थात सूर्य हा उदयाचलावरच ये-
णार नाहीं, मग आपणास मरण तरी कसें येईल? या प्रमाणें बोलून ती सत्यनिष्ठ पतिव्रता निर्धारक-
रून पतिसेवेंत तत्पर राहिली. ह्या पतिव्रतेची ही अघोर प्रतिज्ञा पाहून सूर्य चळचळा कापूं लागला.
उदयाचलावर जाण्याचें त्याला सामर्थ्य होईना. या प्रमाणें कित्येक दिवस गेले. सूर्योदय बंद झाल्यामु-
ळें सृष्टींतील सर्व कर्में बंद राहिलीं. यज्ञयागादिकर्में मुळींच होईनाशीं झालीं. त्या योगानें देवतांस आ-
पापला हविर्भाग मिळेनासा झाल्यामुळें सृष्टिक्रम बंद पडला. तेव्हां देवांस मोठें संकट पडलें. सर्व देव मि-
ळून ब्रम्हदेवासह वैकुंठास गेले. व हा सर्व प्रकार महाविष्णूस कळविला. महाविष्णु म्हणाले कीं, ज्या
विप्रपत्नीच्या वाणीनें सूर्योदय बंद झाला आहे, ती महान् पतिव्रता असल्यानें याचा प्रतिकार तिच्याकडूनच
करविला पाहिजे. ही विप्रपत्नि अनसुयेची सखी आहे. अनसुयाही एकनिष्ठ पतिव्रता असल्यानें ती

च या विप्रपत्नीचें वाक्य टाळण्यास समर्थ आहे. असें ह्मणून महाविष्णु हे सर्व देवांस घेऊन अत्रिऋषी
चे आश्रमीं आले. श्रीमहाविष्णूनें अनसुयेची मोटी स्तुती करून प्रार्थना केली कीं, हे माते आतां या सं
कटांतून पार पाडण्यास तुझ्या शिवाय इतरांचें सामर्थ्य नाहीं. सूर्योदय बंद झाल्यामुळें सृष्टिक्रम बंड प
डला आहे. करितां यावेळीं कांहीं तरी उपाय योजावा. अनसुया ह्मणाली, हे महाविष्णो, विप्रपत्नि ही एक
निष्ठ प्रतिव्रता असल्यानें तिचें वाक्य टाळणें फार कठीण आहे, तथापि मी प्रयत्न करून पाहतें. असें ह्म
णून सर्व देवांसह पैठण नगरांत त्या विप्रपत्नीच्या घरीं गेली. तेहतिस कोटि देवतांचा समुदाय घेऊन
अनसुया आपल्या घरीं आल्याचें पाहून त्या विप्रपत्नीस मोठी धन्यता वाटली. तिनें सर्वांनें आदराति-
थ्य करून मोठया विनयानें अनसुयेस आपलें गृह पवित्र करण्याचें कारण विचारलें. अनसुया ह्मणा
ली हे सखे, सूर्यास उदयाचलावर न येऊं देण्याची तूं जी घोर प्रतिज्ञा केली आहेस तिच्या योगानें सूर्यास
मोठें भय उत्पन्न झालें आहे. सूर्योदय होत नसल्यानें सर्व यज्ञयागादि कर्में बंद पडलीं व त्यामुळें सृष्टिक्र
म बंद पडला आहे. तर कृपा करून सूर्यास उदयाचलावर येण्याची आज्ञा दे. हें अनसुयेचें वाक्य श्रव-
ण करून ती स्त्री ह्मणाली अनुसये, स्त्रियांचें आदिदैवत पति आहे. पति वांचून स्त्रियांस सर्व जग शून्य
वत होय. पति सेवेंत निरंतर तत्पर राहण्यांत मला विशेष समाधान असल्यानें सूर्योदयाशीं व सृष्टिक्रमाशीं

मला कांहींच कर्तव्य नाहीं. सूर्यानें उदयास येऊन मला वैधव्य प्राप्त होणें हें मला मुळींच संमत नाहीं. हें त्या स्त्रीचें निर्वाणीचें भाषण ऐकून अनुसुया ह्मणाली सखे, प्राणीमात्रांचीदया घेऊन सूर्यास उदयाचलावर येण्याची आज्ञा दे. तुझ्या पतीच्या जीविताची व आरोग्याची जबाबदारी मजकडेस आहे. तुझ्या पतीच्या केंसासही धक्का येणार नाहीं. अनसुयेचें भाषण ऐकून व तिनें पातिव्रत्य सामर्थ्य लक्षांत आणून तिनें सूर्यास उदयाचलावर येण्याची आज्ञा केली. ती आज्ञा प्राप्त होतांच सूर्यनारायण प्रदिप्त झाले. सूर्येदय होतांच मांडव्य ऋषीच्या शापा प्रमाणें तो कुष्टी ब्राम्हण मृतप्राय होऊन जमिनीवर पडला. त्याची ती झालेली अवस्था पासून सर्व देवांस मोठी भीति उत्पन्न झाली. व हा ब्राम्हणजर मरण पावला तर ही पतिव्रता काय करील याचा नेम नाहीं. अशा भीतीनें पुढील चमत्कार पाहत तटस्थ उभे राहिले. आपला पति मृतप्राय होऊन पडल्याचें पाहून ती पतिव्रता स्त्री अनसुयेच्या मुखाकडे पाहूं लागली. त्यावेळीं अनुसुया ह्मणाली, सखे घाबरूं नको, ऋषीच्या शापा प्रमाणें याला मरण तर आलेंच आहे, पण याला सजीव करून दिव्यदेही करण्याचें काम मजकडेस आहे. असें ह्मणून अनसुयेनें अंतरयामीं पतिचरणांचें ध्यान करून, आपलें पुण्य त्या मृतब्राम्हणाचे हातावर ओतलें. हें पुण्य प्राप्त होतांच झोंपेंतून जागा झाल्या प्रमाणें तो ब्राम्हण दिव्यदेही होऊन उठून बसला. त्याची ती कुष्टी व्यथा अगदीं नाहींशी होऊन

त्याला आरोग्य प्राप्त झालें. हा त्या अनसुयेचा तपसामर्थ्य चमत्कार पाहून सर्व देवांनीं त्या उभयतां प-
तिव्रता स्त्रियांवर पुष्पवृष्टि करून आपापल्या स्वस्थानीं निघून गेले. ७

## ॥ कथा २ री ॥

महाभारत वनपर्व अध्याय २०६ यांत मार्कंडेय ऋषींनीं धर्मराजास सांगितलें कीं, हे धर्मरा-
जा, कोणी एक द्विजश्रेष्ठ वेदाध्ययन करणारा, धर्मशील, सांगोपांग वेद, उपनिषदें यांचा ज्ञाता होता; त्या-
चें नांव कौशिक असें होतें. हा एका वृक्षाखालीं वेदाध्ययन करीत बसला असतां, त्या वृक्षावर एक
बगळी बसली होती, तिनें वरून मलोत्सर्ग केला तो या ब्राम्हणाचे अंगावर पडला; तेव्हां यानें क्रोधयु-
क्त नजरेनें वर तिच्याकडे पाहतांच ती बगळी गतप्राण होऊन खालीं भूमीवर पडली. हें पाहतांच त्याला
फार वाईट वाटलें. नंतर तो ब्राह्मण गांवांत भिक्षेकरितां गेला. नित्यांच्या संप्रदायाप्रमाणें तो एका ब्रा-
म्हणाचे घरीं गेला. या अतीथीस पाहतांच आंतून स्त्रीनें सांगितलें कीं, महाराज उभे असा, मी पात्रशु-
द्ध करून आपणास भिक्षा घालतें. इतक्यांत क्षुधेनें श्रांत झालेला तिचा पति बाहेरून आला. त्याला पा-
हतांच ती स्त्री पतिसुश्रुषेस लागली. तिनें पतीस पाद्य, आसन व भोजन देऊन संतुष्ट केलें. राजा, ती
पतिव्रता स्त्री आपले भर्त्यास साक्षात् देवच समजून ती एकनिष्ठेनें त्याची सेवा करीत असे. पति से-

या करून राहिलेला काळ ती कुटुंबाच्या हिताकडेस घालवीत असे. पतीची सुश्रुषा केल्यानंतर ती बा-
हेर येऊन पाहते तों तो अतीथी उभा असलेला तिच्या दृष्टीस पडला, तेव्हां ती चकित होऊन भिक्षा घे-
ऊन बाहेर आली. तेव्हां तो ब्राह्मण ह्मणाला हे वरांगने, मला उभा रहा असें सांगून भिक्षा न घालतां
इतका वेळ उभें केलेस. हें त्या ब्राह्मणाचें क्रोधयुक्त भाषण ऐकून ती पतिव्रता शांततेनें ह्मणाली महारा
ज क्षमा करावी. माझें परमदैवत कायतें पति आहे. त्यांच्या सुश्रुषेंत लागल्यामुळें थोडा विलंब लागला.
हें ऐकून तो ब्राह्मण ह्मणाला हे स्त्रिये, तूं पतीला श्रेष्ठ मानून ब्राम्हणाचा अवमान करतेस काय? अगे
या ब्राह्मणास इंद्रही नमस्कार करतो, मग मनुष्याची कथा काय? ब्राह्मण अग्नि सारखे तेजस्वी आहेत
पृथ्वीस दहन करण्याचेंही त्यांच्या ठिकाणीं सामर्थ्य आहे. हें त्या ब्राम्हणाचें भाषण ऐकून, ती स्त्री ह्मणा-
ली, महाराज क्रोध करण्याचें कारण नाहीं; मी कांहीं बगळी नाहीं. आपल्या क्रोधी दृष्टीनें माझें काय हो-
णार आहे? मी ब्राम्हणाचें तेज समग्र जाणतें. आपण क्रोधयुक्त दृष्टीनें बगळीस दग्ध केलें हें जें मला कळ
लें तें पतीसेवेनेंच कळून आलें. सारांश स्त्रियांनीं पतीच आपलें मुख्य दैवत आहे अशा निष्ठेनें राहि-
ल्या तर वेदवेत्ते ब्राह्मणासही त्या अजिंक्य होतात हें वरील इतिहासावरून उघड लक्षांत येईल. ॐ

॥ कथा २ री

शर्याती नांवाचा राजा एकेदिवशीं शिकारीस गेला होता. त्याच्या सैन्यानें ज्या वनांत तळ दिला होता,
त्याच वनांत च्यवन भार्गव नामक एक ऋषी तपश्चर्या करीत होता. तो ऋषी समाधी लावून पुष्कळ
काळ पावेतों एकेच ठिकाणीं निश्चल बसल्यामुळें, त्याच्या सर्वांगावर वारूळ वाढून त्यानें त्याचें शरीरस
र्व झांकून गेलें होतें. एके दिवशीं शर्यातीराजाची मुलगी सुकन्या त्या वनांत मौजेनें फिरत अस-
तां त्या वारुळापाशीं आली व त्याचे छिद्रांत कांहीं चमकल्यासारखें तिला वाटल्यावरून तिनें त्यांत
एक कांटा टोंचला; त्याबरोबर त्या ऋषीने डोळे फुटून एकाएकीं रक्त बाहेर आलें. तें पाहून सुकन्या
भ्याली, व सुकाट्यानें तडक राजाच्या तंबूकडे निघून गेली. इकडे नेत्राच्या वेदनेनें ऋषी देहभाना
वर येऊन त्या अनर्थाचें कारण कोण असावें हें अंतर्ज्ञानानें पाहतो तों त्यांस हें शर्यातीराजाच्या क-
न्येचें कृत्य आहे असें समजलें. तेव्हां त्यानें क्रोधानें त्या राजाच्या सैन्यांतील सर्व लोकांचा एकदम म-
लमूत्रनिरोध केला. त्यामुळें राजासहित सर्व लोकांस पीडा होऊं लागली. त्या वनांत च्यवनभार्गव ऋषि
तप करीत आहेत हें त्यास माहीत असल्यामुळें त्या ऋषीचा तर कांहीं कोणी अपराध केला नाहीं ना
असें राजाच्या मनांत येऊन त्यानें त्याजबद्दल आपल्या सर्व सैन्यांत शोध केला. तेव्हां त्यास आप-

त्याच कन्येकडून ही नसमजून घडलेली चूक समजली. मग तो तिला हातीं घेऊन त्या ऋषीकडे गे
ला व त्यास साष्टांग दंडवत घालून पोरबुद्धीनें नसमजतां झालेल्या आपल्या कन्येच्या अपराधाची
क्षमा मागितली. त्यावर ऋषींनीं सांगितलें कीं, मी आतां अंध झाल्यामुळें माझ्या तपश्चर्येस अडचण
न व्हावी म्हणून तूं आपली ही सुकन्या माझ्या सुश्रुषेकरितां पत्नी करून देत असला तर मी ति
चा अपराध सहन करीन. राजानें ऋषीचें वार्धक्य, अंधत्व, व अरण्यवास पाहून व आपल्या कन्ये
चा सुकुमारपणा व ऐश्वर्य इ॰ लक्षांत आणून हा संबंध कसा व्हावा ही त्यास मोठी चिंता पडली.
त्यावेळीं सुकन्येनें हातजोडून बापाची विनंती केली कीं, 'तुम्ही खुशाल या ऋषी महाराजांचे प
दरीं मला घालावें. मी शुद्ध अंतःकरणानें यांची रात्रंदिवस सेवा चाकरी करीत आनंदानें कालक्र
मणा करीन. वनामध्यें एकटी आणि असल्या दीन ऐश्वर्यांत राहिल्यानें माझ्या शीलभ्रष्टतेची आप
णास कदाचित् चिंता वाटत असेल, तर आपणास मी खात्रीनें सांगतें कीं, पतिव्रता धर्मांतून माझें
पाऊल यत्किंचित् सुद्धां मी ढळूं देणार नाहीं. कन्येचें हें निश्चयपूर्वक भाषण ऐकून राजानें त्या ऋ
षीस आपली ती सुकन्या अर्पण करून तो आपल्या नगरास चालता झाला.

इकडे त्या कन्येनें राजकीय वस्त्राभरणांचा त्याग करून ऋषिपत्नीस साजेल अशीं वल्कलांबरें

धारण केली व मोठ्या आनंदानें आणि प्रेमपूर्वक आपल्या वृद्ध व अंध पतीची ती मनोभावें सुश्रू-
षा करूं लागली. अंधत्वामुळें त्यांस आलेली पराधीनता हिनें सर्वस्वी आपण संभाळून त्यांच्या स्ना-
नसंध्याजपहोमादि नित्यनैमित्तिक कर्मांत तिनें किंचित्‌ही व्यंग होऊं दिलें नाहीं. याप्रमाणें ती प-
तैकनिष्ठ स्त्री पतिसेवातत्पर असतां एके दिवशीं जवळच्या एका सरोवरांतून स्नान करून आश्रमांत
परत येत होती, तों मार्गांत सूर्यपुत्र व प्रसिद्ध रूपवान् देवांचे वैद्य अश्विनीकुमार तिला भेटले. त्यां-
नीं या रूपयौवनसंपन्न सुकन्येला वनांत एकटी पाहून अभिलाषबुद्धीनें ते तिला आपलें ऐश्वर्य प्रभा-
व सांगून अनुकूल करूं लागले. परंतु त्या पतिव्रतेनें त्यांची उलटी निर्भर्त्सनाच करून आपल्या धर्म-
न्यायप्रचुर भाषणानें त्यांसच उलटें लाजविलें. "हे सूर्यपुत्रहो, माझ्या पित्यानें ज्या पतीस माझें दा-
न केलें आहे, तो कसाही असला तरी त्याशींच सत्यनिष्ठेनें वागणें माझें मुख्य कर्तव्य आहे. कुमा-
र्गाचें सेवन माझे हातून कदापि होणार नाहीं. लोकांच्या सदसत्कर्माचा साक्षी जो हा भगवान् सूर्य-
नारायण त्याचेच तुम्ही पुत्र असून मला सन्मार्गभ्रष्ट करण्याची इच्छा बाळगितां हें तुम्हांस अगदीं
उचित् नाहीं. मी स्वत्याधर्मानें वागत असतांही ज्या अर्थी तुम्ही मला असें भ्रष्ट करूं पाहतां त्या अर्थी
मजपासून कांहीं तरी शापवचन घेण्याची तुम्हांस इच्छा झाल्यासारखी दिसते." सुकन्येचें हें भाषण

ऐकून अश्विनीकुमार निरुत्तर झाले व त्यांनीं तिची क्षमा मागून तिच्या संतोषाकरितां आपल्या वैद्यकीय सामर्थ्यानें तिच्या पतीस तारुण्य आणि दृष्टि देऊन ते मार्गस्थ झाले.

सारांश- स्त्रियांना जो पति मिळतो तो चांगला किंवा वाईट हें त्यांच्या पूर्व कर्मानुसार जसा ईश्वरीनेमानेम असेल तसें घडून येतें; कारण मुलीच्या लहानपणीं तिचे मातापिता अगर पालन करणारे यांना तिचें चांगलें असावें अशी अंतःकरणापासून इच्छा असते, त्या प्रमाणें ते योजना करितात. परंतु असें पाहण्यांत येतें कीं, लग्नसमयीं जे कित्येक चांगले दिसून येतात ते पुढें भाग्यहीन होतात व कित्येक सामान्य दिसून येतात ते भाग्यवान होतात, यावरून उघड आहे कीं, हा संबंध प्राक्तनानुसार ईशेच्छेनेंच घडून येतो. परंतु तो चांगला किंवा वाईट याचा विचार न करितां आपल्या प्रारब्धानें ज्याच्याशीं आपला संबंध घडला असेल, तेंच आपलें मुख्य दैवत, असा त्याठिकाणीं निश्चय ठेवून ज्या स्त्रिया पातिव्रत्य धर्मानें वागतात, त्यांना सर्वेश्वर उत्तम फल देतो हें वरील तिन्ही कथांवरून सिद्ध होतें:- सावित्रीला आपला भावी पति अल्पायु व राज्यभ्रष्ट आहे असें कळून आलें असतां मनाच्या निश्चयामुळें तिनें त्याच्याशींच लग्न केलें. तसेंच आपला पति गलितकुष्टी असतां कोणत्याही रीतीनें तिरस्कार न करितां, परमदैवत समजून त्याची स्त्री सेवा करीत असे. त्याच प्रमाणें सुकन्या ही रा

जैश्वर्य भोगणारी असून ऋषीनें तिची मागणी केली तरी असाच आपला प्रारब्धयोग असें समजून तिनें आ-
पल्या पित्याची प्रार्थना करून ऋषीस वरलें, व एकनिष्ठेनें त्याच्या सेवेंत तत्पर राहिली. तरी या योगानें
या तिन्ही कष्टांत स्त्रियांना परमेश्वर साह्य राहून सावित्रीस यम प्रसन्न होऊन इच्छित कल्याण झा-
लें. विप्र पत्नीस अनसुयेच्या योगानें इच्छित फल मिळालें आणि सुकन्येस अश्विनी कुमाराच्या व-
रप्रसादें करून तरुण आणि रूपसंपन्न पति प्राप्त झाला. हें स्त्रियांनी प्रत्यक्ष उदाहरण मनांत आ-
णून त्या प्रमाणें ज्या आपलें वर्तन ठेवतील त्यांना तो सर्वेश्वर अशाच रीतीनें साह्यता देऊन त्यां-
ची ह्या जगांत अजरामर कीर्ति होत जाईल. ॥ ❀ ❀ ❀ ❀ ❀

## ॥ लक्ष्मीगर्वपरिहार ॥

एकदां पार्वती सहज वैकुंठास गेली होती. त्यावेळीं लक्ष्मीनें तिचें आगत स्वागत केलें; परंतु
आपल्या ऐश्वर्य भावाच्या तोऱ्यानें लक्ष्मीनें पार्वतीची जरा अवगणना करून, तिच्या पतीच्या भिक्षु-
कवृत्तीचा, स्मशानवासित्वाचा व दिगंबरपणाचा पुष्कळ उपहास केला. आपला पति भिकारी ह्मणून
लक्ष्मीनें आपला असा उपहास केला; हें मनांत येऊन पार्वतीला पुष्कळ वाईट वाटलें व परत आ-
ल्यावर तिनें तो सर्व वृत्तांत श्रीशंकरास सांगितला. तेव्हां तिचें समाधान करण्याच्या उद्देशानें ते नि-

ला ह्मणाले कीं, कांहीं हरकत नाहीं, तुला पाहिजेत कां डागडागिने ? तर जा कुबेराकडे आणि वाटेल तशी डागडागिन्यांनीं मढून ये कशी ? हा घे एक केंस. असें ह्मणून आपल्या जटेचा एक केंस शंकरांनीं तिच्या हातीं दिला, आणि याचे भारंभार लागतील तितके दागिने घेऊन ये ह्मणून सांगितलें.

पार्वतीला प्रथम ही थट्टाच वाटली, परंतु पतीच्या शब्दावर विश्वास ठेवून ती तो केंस घेऊन कुबेराकडे गेली. कुबेरापाशीं केंसाच्या भारंभार सुवर्णालंकार मागतां त्यालाही आश्चर्य वाटलें. पण शंकराची आज्ञा, तेव्हां मुकाट्यानें त्यानें तो केंस लहानशा ताजव्यांत घालून गुंजभर सोनें वजन करूं लागला. परंतु गुंज तर काय पण दहा तोळे सोनें टाकून पाहिलें तरी केंसाशीं तें भारंभार होईना, तेव्हां त्यानें जरा मोठा तराजू आणून त्यानें वजन करूं लागला. दहावीस शेर सोनें घालून पाहिलें तरी केंसाची तुलना होईना. तेव्हां त्याला ज्यास्तच विस्मय वाटून त्यानें मोठ्या कांट्यांत खंडी दोन खंडी सोनें भरलें व त्या केंसानें वजन करूं लागला. तरी देखील केंसाचें पारडें हालेना ! सारांश त्यानें आपले नवनिधि भांडार त्या पारड्यांत ओतलें, परंतु केंसाची तुलना नाहीं. शेवटीं सत्यलोक, इंद्रलोक, यमलोक, मृत्युलोक, पाताळलोक सर्व ठिकाणें धुंडाळून आणिलीं. फार तर काय, पण खुद्द वैकुंठलोक सुद्धां घेऊन आला तरी केंसाचे भारंभार सोनें होईना. तेव्हां मात्र

कुबेरानें बद्धांजुली करून पार्वतीची प्रार्थना केली व ह्या केंसाची तुलना आपल्याच्यानें होत नाहीं ह्मणून क्षमा मागितली.

पार्वती तशीच निघाली ती कैलासास परत आली. शंकरास वाटलें कीं, एका केंसानें द्रव्यें समाधान झालें नाहीं ह्मणूनच ही रिकाम्या हातानें परत आली, ह्मणून त्यांनीं आणखी एक केंस पाहिजे कीं काय? असें विचारून जटेस हात घातला. तेव्हां पार्वती हास्यमुख करून पतीचे मांडीवर जाऊन बसली. आणि त्यांचे गळ्यांत हात घालून ह्मणाली कीं, आपण मला आहांत हेंच सर्व रत्नालंकारांच्या ठिकाणीं आहां. ज्यांच्या एका केंसाच्या पासंगाला सुद्धां वैकुंठ आदिकरून सर्व त्रैलोक्यांतील सुवर्णरत्न भांडारें पुरत नाहींत असे मला पति असतां मग मला काय कमी आहे?

## ॥ शांडिली आणि सुमना यांचा संवाद ॥

सुमना ह्म०- हे कल्याणि कोणत्या प्रकारांचें आचरण केल्यानें आज तूं विमानांत बसून देवलोकास चालली आहेस? व अग्निज्वालेप्रमाणें ही तेजस्विता तरी तुझ्या अंगीं कशानें आली आहे? खचित् सांगतें कीं, केवळ कांहीं व्रतनेमादि आचरल्यानेंच हें ऐश्वर्य तुला प्राप्त झालेलें नाहीं. तुझा तो कल्याणप्रद मार्ग ऐकण्यास मी इच्छितें तर तो मला तूं कृपा करून सांग.

शांडिली ह्म०- बाई सुमने, हा मार्ग अगदीं सुलभ आहे. याच्या प्राप्ती करितां फार प्रयास न-
को, आपण आपलें कर्तव्य ओळखून तें कंठगत प्राण झाला तरी सोडावयाचें नाहीं असा निश्चय
केला ह्मणजे पुरे. बाई, आपलीं स्त्रियांचीं कर्तव्यकर्मे मी थोडक्यांत तुला सांगतें. आपण स्त्रियांनीं
कधीं कोणाशीं उन्मत्तपणानें वागूं नये. कठोर आणि अहितकारक असें भाषण पतीशीं त्याचप्रमा
णें इतरही कोणाशीं करूं नये. देव, पितर आणि ब्राम्हण यांच्या पूजेविषयीं सर्वदा तत्पर असावें. सा
सू, सासरा इत्यादि वडिल माणसांची नेहमीं सेवा करावी; त्यांचा कदापि अपमान करूं नये. वडिल मा-
नसांशीं दुर्लक्ष्यपूर्वक वर्तन ठेवल्यानें आपलें कधींही कल्याण व्हावयाचें नाहीं; हें तूं पक्कें लक्ष्यांत ठे
व. पतीचा देवाप्रमाणें सन्मान राखावा. त्याशीं भक्ष्यभोज्यादिं पदार्थांत कदापि वंचना करूं नये. तो घ-
रीं असतां त्याच्या सन्मुख प्रसन्नतेनें व सालंकृत होऊन वागावें. शृंगारादि गोष्टी त्याच्या पश्चात् व-
र्ज्य कराव्यात. संपत्काल किंवा विपत्काल कोणताही काल असला तरी पतीशीं अनुकूल वृत्तीनेंच अ-
सावें. पतीचें वित्त व जीवित या दोहोंचें संरक्षण करण्याविषयीं सदा दक्ष असावें. या प्रमाणें पतिव्रता
स्त्रियांचे जे धर्म आहेत तेच स्त्रियांनीं पाळले म्हणजे, त्यांस सद्गति होते. सुमने, आपणा स्त्रियांना
श्रेयस्कर असा आचरणाचा श्रेष्ठ प्रकार हाच आहे. एवढं लक्ष्यांत ठेवून तूं आपल्या वागण्यांत

तो आण, ह्मणजे भगवत्कृपेनें जो लोक हल्लीं मला प्राप्त झाला आहे तोच तुलाही प्राप्त होईल.

## ॥ द्रौपदी आणि सत्यभामा यांचा संवाद ॥

सत्यभामा ह्म०- बाई द्रौपदी, लोक कांहीं ही म्हणोत, परंतु मी तुला खरेंच सांगतें कीं, माझ्याकडे श्री कृष्णाचें मन क्षणभर देखील लागत नाहीं. आणि तेंच तुझें पहावें तों तुला पांच भ्रतार असून त्या पांचां चेंही प्रेम तुजवर इतकें कांहीं आहे कीं, मेघाला पाहतांच मयूर जसे आनंदानें नाचूं लागतात, त्याहून देखील ज्यास्त तुझ्यावर तुझे पति लुब्ध आहेत. तर तूं कोणत्या वशीकरणानें किंवा मणिमंत्रौषधींनीं आपल्या पतीचें मन आपणाकडेस आकर्षून घेतलें आहेस ? तें मला सांग.

द्रौपदी ह्मणाली-( हंसून ) सत्यभामे, असें कां म्हणतेस ? आपल्या पतीचें मन आपणाकडे ओढून घेण्यास मणिमंत्रादि उपाय लागत असतात ? इश्श ! मला तर तें ऐकण्यास सुद्धां लाज वाटते. प्रेमानें आपल्या पतीची सेवा करून त्याला आपण प्रिय व्हावें; असें न करितां जी स्त्री अंगारे धुपारे करून त्याला आपणास वश करून घेण्यास पाहते अशी साहसी बायको खचित् निंदेसच पात्र होय. मला असलें कांहीं माहीत नाहीं. माझें वशीकरण कोणतें ह्मणून विचारतील, तर ज्या आपल्या आचरणानें पतीस राग येणार नाहीं, असें आचरण ठेवणें, हेंच होय. पतीशीं गर्वानें, उद्धटपणानें व तसेंच मत्सरानें

व कपटानें कदापि वागलें नाहीं, ह्मणजे आपलें अचरण पतीच्या कोपास कारण होत नाहीं. तसेंच पतिव्रता स्त्रियांना पति हाच परमेश्वर असल्यानें त्याच्या चरणाची सेवान करितां त्यानें प्रेम आपणावर असावें ह्मणून जी स्त्री अन्य देवांस नवससायास करीत फिरते ती फारच मूर्ख समजली पाहिजे. सत्यभामे, तुला मीं सांगतें कीं, आपल्या पतीची प्रसन्नता संपदन केल्यानें साध्वी स्त्रियेला जी सद्गति मिळते, ती मोठया एखाद्या योगयागानेंही मिळत नाहीं. पार्वती पहाना, गंगेविषयीं सवती मत्सर टाकून तिला आपल्या माथ्यावर घेण्यास जेव्हां तयार झाली, तेव्हांच ती आपल्या पतीला अत्यंत प्रिय व त्याची खरी अर्धांगी होऊन बसली आहे. याकरितां वेडे, असलें उत्तमाचरणच आपल्या पतीचें मन आपणाकडे वेधलें जाण्यास उत्तम वशीकरण आहे. ० ० ० ० ०

## ॥ सुभद्रागर्वहरण ॥

परमेश्वराच्या ठिकाणीं निर्मळ अंतःकरणयुक्त सत्यनिष्ठा असल्यावांचून त्याची कृपा होत नाहीं या विषयींचा एक दृष्टांत येथें देतोंः- एकेवेळीं सुभद्रा श्रीकृष्णास ह्मणाली, - कृष्णा! खरें ह्मटलें तर मीं तुझी सख्खी बहीण असतां मजपेक्षां द्रौपदीवरच तुझें प्रेम अधिक कां बरें? द्वारकेहून येण्याबाबतीर, आधीं तिच्या मंदिरांत जाऊन तिचा समाचार घेतोस, भूक लागली तरी खाण्यास तिच्याच जवळ मा-

गतोस, तिला लागलेला जिन्नस पाहिजे तेथून आणून देतोस, तिच्या संकटकाळीं लागलींच धांवतये तोस तर याचें कारण काय? कृष्ण ह्मणाला ताई! रागाऊं नकोस, खरें सांगूं? तिचा लोभच मजवर नसा आहे. याची प्रचीति एखादे वेळीं तुला दाखवीन. या गोष्टीस बरेच दिवस गेल्यावर एके दिवशीं मोठ्या उत्सवाचा दिवस आला, त्यादिवशीं चोहींकडे रोषणाई केली होती; सर्व लहान थोर माणसांनीं उंची वस्त्रें व किमती दागिनें अंगावर परिधान केले होते. त्या दिवशीं सहज शस्त्रांशीं खेळतां खेळतां कृष्णानें आपला हात कापून घेतला. मग तो तसाच दुसऱ्या हातानें धरून रक्त गळत असतांच सुभद्रेकडे जाऊन ह्मणाला- ताई, माझा हात कापला आहे, एखादी चिंधी ओली करून माझ्या हाताला लौकर बांध. रक्त गळून माझा जीव कासावीस होत आहे. तें ऐकतांच सुभद्रा लगबगीनें चिंधी शोधूं लागली; पण तिला कोठें सांपडेना. तेव्हां कृष्ण ह्मणाला ताई, तुला चिंधी देखील सांपडत नाहींना? बरें! असें ह्मणून धांवतच द्रौपदी कडे गेला, व तिलाही त्याच प्रमाणें सांगितलें. तिनें श्रीकृष्णाची होत असलेली ती अवस्था पाहून, चिंधी वगैरे शोधण्याचे भानगडींत वेळ न घालवितां तावडतोब आपल्या अंगावरील अमूल्य शालू फाडला व पाण्यांत भिजवून कृष्णाच्या हातास बांधला. सुभद्रा कृष्णाचे मागोमागच तेथें आली होती. तिला कृष्ण ह्मणाला- ताई! पाहिलेंस कां हें? एव

ध्यान करितां द्रौपदीवर माझी ज्यास्त प्रीति आहे. तुझ्याजवळ नवतें कां लुगडें? हें ऐकून सुभद्रा अगदींच खजील होऊन गेली.

## ॥ एकादशीव्रतकथा ॥

पूर्वी कांतिपुर नगराचे ठिकाणीं सूर्यवंशी रुक्मांगद नांवाचा एक राजा होता. हा मोठा धार्मिक, न्यायी व विष्णुभक्त होता. विष्णु अर्चनेवांचून हा अन्नग्रहण करीत नसे. या राजानें आपल्या नगराबाहेर एक पुष्पवाटिका लाविली होती. एकेदिवशीं नारदस्वामीची स्वारी फिरत फिरत इंद्रलोकीं गेली. इंद्रानें नारदाचा उत्तम प्रकारचा सत्कार केल्यावर त्रिभुवनांतील नवल विशेष विचारलें. नारद ह्मणाले इंद्रा कांतिपूर नगरामध्यें रुक्मांगद नांवाचा राजा आहे. त्यानें एक रम्य अशी पुष्पवाटिका लाविली आहे. तींत नानाप्रकारचीं पुष्पें असून तशीं पुष्पें त्रिभुवनांतही नाहींत. त्या वाटिकेच्या संरक्षणार्थ त्यानें रक्षक ठेविले आहेत. नारदाचें हें भाषण ऐकून इंद्रास तीं पुष्पें मिळविण्याची इच्छा उत्पन्न होऊन, त्यानें आपल्या दुतांस तीं पुष्पें गुप्तपणें आणण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें इंद्राच्या दुतांनीं त्या वाटिकेच्या रक्षकास नकळत पुष्पें तोडून विमानांत घालून इंद्रलोकीं आणलीं. तीं पाहून इंद्रास मोठा संतोष झाला. व याच प्रमाणें नित्यशः हीं पुष्पें आणीत जा अशी त्यानें आपल्या दुतांस ताकीद दिली. ह्या इंद्र

आज्ञेनुसार ते दूत प्रतिदिवशीं फुलें तोडून नेत. इकडे राजास विष्णुपूजेस फुलें मिळेनाशीं झाल्यामुळें त्यानें वाटिकेच्या रक्षकांस फुलें तोडणारांचा तपास लावण्याविषयीं ताकीद दिली. परंतु देवदूत हे गुप्तपणें फुलें तोडून नेत असल्यामुळें ते यांच्या हातीं येईनात. शेवटीं पाहतां पाहतां झाडांवरून फुलें नाहींशीं झालीं असें पाहून अंधारांत लांकडें पेटवून प्रकाश केला. त्यावेळीं असा चमत्कार झाला कीं, तीं पेटविलेलीं लांकडें यांच्या त्या झाडाचीं होतीं. त्या लांकडांचा धूर वर जातांच फुलें तोडून जात असलेल्या दूतांचे विमानास तो लागल्यामुळें तें विमान खालीं येऊन ते देवदूत ऐतेच त्या राजदुतांच्या तावडींत सांपडले. राजदुतांनीं त्यांना धरून राजाकडे नेलें. राजानें त्यांची हकीकत ऐकून घेऊन त्यांना परत जाण्यास सांगितलें. तेव्हां दूत ह्मणाले राजा, तंग्याचा धूर लागल्यामुळें त्या पातकाच्या योगानें आतां आह्मास वर जातां येत नाहीं. एकादशीचें पुण्य मिळेल तर त्याच्या योगानें आह्मास वर जातां येईल. त्यावेळीं एकादशीव्रताचें महात्म्य काय आहे असें विचारल्यावरून देवदुतांनीं राजास कथा सांगितली ती अशीः–

राजा, मुरू नांवाचा एक दैत्य होता. तो त्रिभुवनास अजींक्य होता. त्याचा धाकटा भाऊ कुंभ यास विष्णूनें मारलें. त्यामुळें मुरूस अतिशय संताप येऊन त्यानें शंकराची उग्र तपश्चर्या केली. त्यावरून भोळानाथ प्रसन्न होऊन वर माग ह्मणून ह्मणाले. मुरू ह्मणाला देवा तूं जर प्रसन्न झाला आहेस तर ज्यानें बंधूस मारलें आहे, त्याचा

सूड उगविण्याचें सामर्थ्य मला द्यावें. हें ऐकून शंकर हंसले व मनांत ह्मणाले-विष्णु हा त्रिभुवनास अजिं-
क्य तो याच्यानें कसा जिंकला जाईल? नंतर विचार करून म्हणाले, राक्षसा! विष्णूस तूं अजिंक्य होशी-
ल, पण त्याच्या श्वासापासून उत्पन्न झालेली कुमारी मात्र तुला अजिंक्य होईल. हें शंकराचें वचन ऐकून
मुरू ह्मणाला अशा स्त्रियांना मी मुळींच जुमानणारा नाहीं. असें बोलून व संतोष पावून तो चालता झाला.
नंतर त्यानें सर्व मृत्युलोक पादाक्रांत करून तो इंद्रलोकीं गेला. शंकराच्या वरदानानें अजिंक्य झालेल्या
दैत्यापुढें इंद्राच्यानें दम न धरवला गेल्यामुळें सर्व देवांसह इंद्र पळून सत्यलोकीं गेला. इंद्र ब्रम्हदेवापु-
ढें गाऱ्हाणें सांगत आहे तोंच तो दैत्य तेथें आला. त्याला पाहतांच ब्रम्हदेवानेंही पलायन केलें, व सर्व
देवांसह कैलासास गेले; दैत्य त्यांच्या पाठोपाठच गेला. शंकरापाशीं जाऊन मुरू म्हणाला, शंकरा! त्वां
सर्व देवांस पाठीमागें घातलें आहेस, त्यांना सोड नाहीं पेक्षां युद्धास सिद्ध हो. त्यावेळीं शिवास आपल्या
वराचें स्मरण होऊन, त्यांनीं ही पळ काढून वैकुंठाचा मार्ग धरला; त्यांच्या पाठोपाठ देवही पळाले. दैत्य त्यां-
च्या पाठीमागेंच होता. वैकुंठास जातांच विष्णूचें व मुरूचें युद्ध जुंपलें. शिवाच्या वरानें विष्णूस मुरू आ-
टोपेना जाईना, तेव्हां विष्णूसही पळ काढण्या वांचून दुसरा उपाय सुचला नाहीं. विष्णूस पळालेलें पाहून
मुरूनें त्रिभुवनांत आपली सत्ता स्थापन केली व विष्णूचा पाठलाग केला. विष्णु पळत पळत मेरूपर्वताच्या

गुहेंत जाऊन लपला. त्या ठिकाणीं दैत्य जाऊन पोंचला व ह्मणाला, माझ्या भावास मारणारा तूंच ना? आतां माझ्या तावडींतून कोठें जाशील? हें त्या दैत्याचें आवेशयुक्त भाषण ऐकून विष्णूनें दीर्घ श्वास सोडला. त्या सरशीं आपल्या तेजें करून त्रिभुवनास दिपविणारी व अजिंक्य अशी एक कन्या प्रगट झाली. ती कन्या दैत्यापुढें उभी राहून म्हणाली, प्रथम मला जिंक व मग विष्णूकडे पहा. हें त्या सुंदरीचें भाषण ऐकून, दैत्यास शंकराच्या वराचें स्मरण झालें व तो मनांत खोंचला. शेवटीं निरुपाय होऊन तिच्याशीं युद्ध करूं लागला. उभयतांमध्यें ११ दिवस युद्ध झालें. त्या शक्तीनें त्याचा वध केला. तेव्हां तेहतीस कोटि देवांनीं तिच्यावर पुष्पवृष्टि करून, तूं कोण आहेस ह्मणून तीस प्रश्न केला. ती ह्मणाली, मी हरीच्या श्वासापासून प्रगट झालें असून माझें नांव 'हरिदिनी' ह्मणजे एकादशी होय. नंतर विष्णु प्रसन्न होऊन तीस ह्मणाले कीं, तूं मोठा पराक्रम करून या दैत्याचा नाश केल्यामुळें आम्हां सर्वांवर तुझे मोठे उपकार झाले आहेत तर कांहीं तरी वर माग. हरिदिनी ह्मणाली माझें व्रत आजपासून सर्व जगांत प्रगट व्हावें. हें ऐकून विष्णूनें तथास्तु ह्मटलें आणि व्रत कसें करावें त्याचा विधि व फळ सांगितलें. विष्णु म्हणाले — दशमीचे दिवशीं एकवेळ भोजन करावें आणि एकादशीचे दिवशीं उपोषण करून, दिवसां सत्कर्म आचरावें व रात्रौ हरिकीर्तनानें युक्त असें जागरण करावें. नंतर द्वादशीस ब्राम्हण भोजन करून पारणें करावें. हें एकादशी व्रत सर्व व्रतांमध्यें श्रेष्ठ असून

मला तें अत्यंत प्रिय आहे. बुद्धिपुरस्सर व्रत करणारास तर माझी प्राप्ति होईलच, पण सहजगत्या जरी एखाद्यास एकादशीचे दिवशीं उपोषण घडलें तरी त्याला एकादशीचें पूर्ण फळ प्राप्त होईल. एकादशीचे दिवशीं उपोषण न करितां धान्याहार करणारास अघोर नरकाची प्राप्ति होऊन ते पुनःपुनः जन्ममरणास पात्र होतील. अशक्त, वृद्ध किंवा बाळ असतील व जे निराहार करण्यास असमर्थ असतील त्यांनीं फळाहार करावा. हें एकादशीचें व्रत करणारा माझ्या अत्यंत प्रीतींतला असून त्याच्यावर माझी अत्यंत कृपा राहून, अंतीं त्याला माझ्या परमपदाची प्राप्ति होईल. हें महाविष्णूचें वाक्य ऐकून सर्व देवांस मोठा संतोष झाला. नंतर ते सर्व आपापल्या स्थानाप्रत निघून गेले. त्यादिवसांपासून महाविष्णुसह सर्व लोक एकादशी व्रत करूं लागले. आपणासही या व्रत दिवसाचा कांहीं अंश मिळावा अशी शंकरानीं विष्णूची प्रार्थना केल्यावरून, महाविष्णूनें संपूर्ण तिथी महादेवास अर्पण करून शेष तिथीचें आपण ग्रहण केलें. त्यादिवसापासून 'स्मार्त' व 'भागवत' अशा दोन एकादशा प्रगट झाल्या. असें हें एकादशीचें व्रत महात्म्य आहे. ही कथा जे एकादशीचे दिवशीं भक्तिपुरस्सर श्रवण किंवा पठण करतील त्यांना इहलोकीं अखंड सौख्य व अंतीं महाविष्णूच्या परमपदाची प्राप्ति होईल. ॥ श्रीकृष्णार्पण मस्तु॥ ૭ ૭ ૭ ૭ ૭ ૭ ૭ ૭

॥ इति स्त्रियाचारं समाप्तं ॥

## ॥ स्त्रियाचाराचें शुद्धिपत्र ॥

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ४ | पतिसाक्षात् वैकुंठ | पतिःसाक्षात् वैकुंठं | ५ | ४ | द्वेप | द्वेष |
| २ | ६ | देवांच्या | देवांचीं | " | ५ | तसेच | तसेंच |
| " | १२ | पति दुःखीत | पति दुःखित | ६ | १ | भार्तृजाया | भ्रातृजाया (भावजय) |
| " | १६ | कर्ते | करते | " | ४ | वासमा | वाससा |
| " | २० | कडून प्रतिव्रता | करून पतिव्रता | " | ५ | नाप्रियं | न्नाप्रियं |
| ४ | १२ | बहुवचों | बहुवचो | " | १३ | प्रीति | प्रीतिं |
| " | १३ | भर्तृविद्देषिणीं | भर्तृविद्वेषिणीं | " | १५ | पत्याना | पत्यानां |
| " | १५ | मंथिनो | मथिनो | " | १६ | दुरवो | दुःरवो |
| " | १७ | त्यत्वा | त्यक्त्वा | " | २० | भुक्ते | भुंक्ते |
| " | २० | दास्यं | दास्य | ७ | २ | क्षेत्त | क्षेत |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ७ | ४ | निःसंशय प्राप्त होते | हें वाक्य वाचूं नये. | ११ | ११ | असनार्थे | आसनार्थे |
| " | २० | मुलाप्रमाणें | मुळीप्रमाणें | १२ | १० | कञ्चुकी | कञ्चुकीं |
| " | " | हिं वनवास | हा वनवास | १४ | १० | पतिव्रतांना सर्वांसा | पतिव्रतानां सर्वासां |
| " | २३ | सागावें | सांगावें. | " | १६ | पतिस्तोरत्र | पतिस्तोत्र |
| " | २६ | महात्म्य | माहात्म्य | १५ | २४/२५ | मध्यान् | मध्यान्ह |
| ८ | १० | उक्तवान्याप | उक्तवान्पाप | १७ | २४ | हाविष्याचीं | हविष्याचीं |
| " | ११ | स्थिता ॥ | स्थिताः ॥ | १८ | ८ | अपत्ति | आपन्ति |
| ९ | १५ | यथेच्च | यथेच्छ | " | २६ | तृतिया | तृनीया |
| " | २५ | संभाळून | सांभाळून | १९ | १ | आयाचित् | अयाचित् |
| १० | ४ | स्थानदेवना | स्थानदेवना | २१ | १५/१९ | चातुरमास्य | चातुर्मास्य |
| ११ | ६ | अवाहयामि | आवाहयामि | २७ | २५ | चारी | चार |
| " | ७ | कांक्षं | काक्षं | २८ | ६ | शुचिर्भुत | शुचिर्भूत |

॥१॥

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २८ | १७ | धतुरपर्णे | धत्तूरपर्णे. | ५४ | १ | अंगणांत | आंगणांत |
| २९ | ४ | पुत्रंवती | पुत्रवती | ५५ | ३ | बंड पडळा | बंद पडळा |
| " | १२ | दुधधारा | दुग्धधारा | " | २६ | कुष्टी व्यथा | कुष्ट व्यथा |
| ३३ | २ | गवारीच्या | गोंवारीच्या | ५६ | २३ | क्रोधीदृष्टीनें | क्रोध दृष्टीनें |
| ४८ | १ | कुळस्त्रि, | कुळस्त्रिये, | ५७ | ११ | मूत्रविरोध | मूत्रनिरोध |
| " | ७ | अशिर्वाद् | आशिर्वाद | ६० | ७ | आहां. | आहांत. |
| ४९ | २३ | विध्वत्व | वैधव्य | " | ८ | भांडोरें | भांडारें देरवील |
| ५१ | १२ | खावूं नये | खाऊं नये. | " | १७ | उन्नतपणोनें | उन्मत्त पणानें |
| ५२ | ६ | सकुमार | सुकुमार | ६१ | १२ | विचारसीळ | विचारशीळ |
| " | १०/११ | आगस्ती. | अगस्ती | " | १७ | संपदन | संपादन |
| " | ११ | सीतेचें सीनेळा | सितेचें सितेळा | ६४ | २० | आंपणासही | आपणासही |
| " | २३ | आम्हाला | मला | " | २४ | ईहलोकीं | इहलोकीं |

## ॥ सद्धर्मवर्तनाचें शुद्धिपत्र ॥

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २१ | सज्जन | हितेच्छु | २ | ९ | करूंनये | त्याचीईर्षा करूंनये. |
| ३ | २५ | काढूंनये | काढूंनयेत. | ४ | ११ | कधींही | नेहमीं |
| ५ | १७ | आणूंनये. गोष्ट | आणूंनयेत. गोष्टही | ५ | २१ | निद्राकेले | निद्रिस्त |
| ६ | २२ | पर्जन्याचेंनिवारणहोतें | निवारणकेलाजातो. | ७ | १२ | दारिद्रे | दारिद्र्ये |
| ७ | १४ | यस्तिष्ठन्समित्रःस | यस्तिष्ठन्सन्मित्रंसच | ८ | १ | पापात्पाप | पापात्पापं |
| ८ | ५ | पुण्यात्पुण्य | पुण्यात्पुण्यं | ८ | ६ | सुरवं | सुरव |

## ॥ ग्रहस्थाश्रमीयांचे विचारोक्त विषयांचें शुद्धिपत्र ॥

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १९ | समृद्धिं | समृद्धि | १ | २२ | अर्थ | अर्थे |
| २ | २ | बुद्धिर्बुद्धिनो | बुद्धिर्बुद्धिमतो | ३ | १२ | रासैव | रात्मैव |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३ | १९ | तन्मित्रयस्य | नतन्मित्रंयस्य | ३ | २० | तदैमित्रं | तद्वैमित्रं |
| ५ | ४ | असत्यागा | असंत्यागा | ६ | १७ | क्षमावशीलति | क्षमावशीकृति |
| ७ | १ | त्रीनेत्रा | त्रीनेता | ७ | ८ | सदर्त्तनं | सद्वर्त्तनं |
| ७ | ११ | कैतवः ॥ | कैतवम् ॥ | ९ | ३ | त्रिवर्ग | त्रिवर्ग |
| ९ | ८ | नासाह | नात्याह | ९ | १२ | भाषितु ॥ | भाषितुम् ॥ |
| ९ | २० | वंनपरशुनावनपरशुनाह | वंनपरशुनाहतम्॥ | ९ | २२ | कर्णिनालीकनारा | कर्णिनालीकनाराचा |
| | | तम् ॥ | | ९ | २४ | निर्हितु शक्ये | निर्हितुं शक्यो |
| १० | २ | परस्यनामर्म | परस्यवैमर्म | ११ | १२ | ध्ययन | ध्ययने |
| ११ | २७ | कृत्यामाता | कृत्यात्माता | १२ | ३ | पक्षवीर धनांहि | पक्षवीर धनानांहि |
| १२ | १० | तंतयोयदि | तंतवोयदि | १३ | ५ | नज्ञात्वा | नाज्ञात्वा |
| १४ | २ | परिन्हिया | परिन्हिया | १४ | १० | अन्यंपुंसां | अन्यपुंसां |
| " | १६ | पश्चान्निंदा | पश्चान्निंदां | १५ | ११ | हूनलोकान् | हून् लोकान् |

॥१॥

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १६ | २० | यानानिश्वासस्यांग | काञ्चनिवासादंग | १७ | १२ | तस्यदत्वा | तंनरंम्रा |
| १७ | २१ | धनीत्पुण्य | धनीत त्पुण्य | १८ | ३ | तथैवच | तथैवच |
| १८ | २३ | मृष्य | मृश्य | | | | |

## ॥ मातृपितृ महात्म्याचें शुद्धिपत्र ॥

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ८ | पृथिवीची | पृथ्वीची | १ | ५ | तस्मात | तस्मात् |
| १ | १५ | आपत्यें | अपत्यें | २ | २० | सुश्रूषा | सुश्रुषा |
| ३ | ७ | शरीरकांती कडून | शरीरकांती करून | ३ | १७ | तीन लक्ष प्रदक्षिणा | तीन प्रदक्षिणा |

## संक्षिप्त पंचविषयाचें शुद्धिपत्र

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | ५ | तीं | ती | ४ | ७ | आयोध्येस | अयोध्येस |
| ४ | १२ | कैकईनें | कैकयीनें | ४ | ११ | चित्रकुट | चित्रकूट |

| ४ | २० | आगस्त्य | अगस्त्य | ४ | २६ | शूर्पणरवेचे | शूर्पनरवेचे |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ५ | ८ | हाजर झाला | प्राप्त झाला | ५ | १ | बध्वो | बध्वो |
| " | १६ | कर्मान्विता | कर्मान्वितः | ६ | २ | विजयकृष्णनचराज्य | विजयंकृष्णा नचराज्यं |
| ८ | २० | त्स्वनुस्थितात् | त्स्वनुष्ठितात् | ११ | ६ | भवेदैत्वरितं | भवेद्दैत्वरितं |
| ११ | ७ | न्नियं | न्निसं | १२ | ३ | सस्त्रजातातं | सहस्त्रजातात् |
| १२ | १० | वराहपुराणांत | वाराहपुराणांत | १० | २ | नमकार | नमस्कार |

सूचना नित्याचार व स्त्रियाचार यांचीं शुद्धिपत्रें त्या त्या प्रकरणांसच जोडलीं आहेत तीं तेथेंच पहावीं.

